श्री

# शांतिपर्वांतर्गत

1277

# आपद्धर्म.

श्रीनारायण, नरांत उत्तम जो नर, सरस्वती देवी व व्यास यांस नमस्कार करून जयकारक ग्रंथास आरंभ करितों. युधिष्ठिर प्रश्न करितो. हे भीष्मा पूर्वी राजधर्म प्रकरणीं शेवटचे अध्यायांत सांगितलें कीं, राज्याधिकारावर असून कोशांत द्रव्य नाहिंसें होऊन विपत्ती प्राप्त झाली असतां राजानें प्रजांपासून करदंडादि अनेक उपायानीं प्रजांचा नाश न करितां द्रव्य संपादन करून विपत्ती घालवावी. हें श्रवण केलें. आतां जो धान्य व कोश संग्रहरहित, आळसी, आप्तादिकांच्या क्षयानें भयाभीत होऊन मित्रांतून बाहेर निघाला, अमात्यादिक हेच माझा नाश करतील कीं काय असी शंका करणारा, आपण गुप्त केलेली मसलत लोकांत प्रख्यात होऊन त्यांच्या साहय्यानें शत्रूनीं सर्व राज्याचें विभाग करून घेतल्यामुळें निर्द्रव्य झाला. या योगानें मित्रादिकांचा व सैन्याचा संग्रह करणें न होऊन शत्रूसीं युद्ध करण्याचें सामर्थ्य नाहिंसें झालें तेव्हा बलाढ्य शत्रूनें ज्या प्रधानादिकांस हि अनुकूल करून पराभूत केलें, तेणे करून व्याकुळ चित्त झालेला असा दुर्बल जो राजा त्यानें काय करावें ? भीष्म सांगतात. बाहेर निघालेला असून धर्मेंकरून अर्थ संपादन करण्याविषयीं राजा वर कुशल आहे. तर त्यानें शत्रूसीं लवकर संधी करून त्यानें घेतलेलें जें राज्य तें त्यापासून सामोपचारें करून सोडवून घ्यावें. व जो बलवान् असून अधर्मानें अर्थ संपादन करण्याची इच्छा करणारा, असा जर राजा असेल तर त्यानें स्वराज्यापैकीं कांहीं गावें शत्रूस देऊन संधी करावा. अथवा शत्रु जर दुष्ट आहे तर राजानें राजधानी टाकून आपल्या राजगुणानीं पुनः द्रव्य संपादन करून शत्रुला जिंकण्याविषयीं यत्न करावा. शत्रू अति दुष्ट असून आपला नाश करितो व अंतःपुरांतील स्त्रियादिकांस नेतो असें झालें तर राजानें सैन्य व कोश यांचा त्याग करून आपण आपल्यास

वांचवून निघून जावें. युधिष्ठिर प्रश्न करितो, राजानें आपल्या राजधानीं त असून शत्रूस जिंकावें तर प्रधानादिकांस शत्रूनें फितविलें तेव्हां तेच नाश करण्यास प्रवृत्त झाले. बरें बाहेर निघून जावें तर किल्ला व देश याचा शत्रूनें रोध केला. व द्रव्यानें कांहीं उपाय करावा तर तें हि नष्ट झालें व मसलतहि बाहेर परिस्फोट झाली अशा संकटांत सांपडल्यावर त्यानें काय करावें? भीष्म म्हणतात. धर्मिष्ठ जर शत्रू आहे तर त्याच्याशीं लवकर संधि करावा. दुष्ट असला तर तीक्ष्ण पराक्रमानें लवकरच जिंकावा. असें केलें असतां शत्रूचा लवकरच पराजय होईल किंवा त्याच्याशीं युध्द करतांना मरण प्राप्त झालें तें हि परलोकीं हितकारक होईल. अथवा आपला अंतर्भाव न कळूं देतां शत्रूशीं मोठ्या प्रीतीनें स्नेह करावा म्हणजे अल्प सैन्यानेंहि शत्रूस पराजित करून राजा, गेलेलें स्वराज्य पुनः संपादन करणारा होतो. किंवा युध्दांत मरण पावेल तर इंद्र लोकांत इंद्रा प्रमाणें ऐश्वर्य भोगणारा होईल अथवा शत्रूचा वध केला तर पृथिवीचें अधिपत्य प्राप्त होईल. जर युध्दानें शत्रू जिंकला जात नाहीं तर युध्द सोडून सर्व लोकांसमक्ष प्रसिध्द शपथ करावी कीं आम्हीं आजपासून तुम्हाशीं युध्द करणार नाहीं असा विश्वास दाखवून व मृदुत्व स्वीकारून उगीच जय कालाची प्रतिक्षा करीत पडून असावें. शत्रूस वश झालेल्या प्रधानापासून अंतस्थ भीति व बाहेर युध्दाचा व सामोपचाराचा उपाय नाहीं असें झालें असतां राजानें युक्तीच्या वाटेनें निघून जावें व उदयकाल प्राप्त होई तों पर्यंत कोणत्या तरी देशांत जाऊन तेथें गुप्त रीतीनें शत्रूच्या पराजयाविषयीं उद्योग करीत असावें. नंतर कांहीं कालानें कोशादि संग्रह करून पुनः शत्रूवर स्वारी करावी. असा विषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दुसरा.—युधिष्ठिर प्रश्न करितो. हे भीष्मा, राजा राज्य भ्रष्ट झाल्यावर चोरांचा उपद्रव होऊन त्यानीं ब्राम्हणांचें सर्वस्व हरण केल्यावर त्या पुत्रपौत्रादि कुटुंब वत्सल ब्राम्हणानीं काय करावें? भीष्म म्हणतात. तसा विपत्काल प्राप्त झाला असतां ब्राम्हणानीं स्व-

धर्मांचे ठिकाणीं स्थित असून ज्ञानबलाच्या आश्रयानें जीवन पावानें व राजानें नीचापासून द्रव्य हरण करून साधू व योग्य अशा ब्राम्हणांस द्यावें ब्राह्मणांच्या संरक्षणार्थ नीति नष्ट झालेल्या राजापासून सर्वस्व हरण केलें असतां त्यास दोष नाहीं. तसेंच राजाला राज्य प्राप्तीची इच्छा असली तर त्यानें राज्यांतील लोकांस त्रास देऊन क्षोभ न करितां युक्तीनें राज्य संपादन करावें. राजास विपत्काल प्राप्त झाला असतां त्यानें स्वराज्यांतून व पर राज्यांतून द्रव्य संपादन करून स्वकीय कोश वृद्धी करावी असें सामान्य प्राकृत शास्त्र आहे. परंतु बुध्दिमान् जो त्यानें स्वदेशांतील जे मोठमोठाले-कोट्याधीश सावकार असून सत्कारणीं द्रव्याचा व्यय न करून कृपणपणानें वागणारे असतील त्यांस लुटून द्रव्य आणावें. असें विशेष शास्त्र आहे याचाच राजानें अभ्यास ठेवावा. राजास अत्यंत जरी विपत्ती प्राप्त झाली तरी त्यानें ऋत्विज, पुरोहित व गुरु आदि ब्राह्मण हे श्रीमंत जरी असले तरी त्यांपासून द्रव्य हरण करूं नये. त्यांच्या आज्ञेप्रमाणें सर्वांनीं वागावें. ग्रामवासी लोकानीं परस्पर द्वेषबुध्दीनें सांगितल्यावरून राजानें कोणाचा सत्कार किंवा कोणाचा घात करूं नये. तशाच ऋत्विजादि ब्राम्हणांच्या निंदा आपण करूं नये व कोणीं करूं लागेल तर श्रवण करूं नये. दुसऱ्याची निंदा व वऱ्हाडी करणें हें दुर्जनाचें शील आणि सज्जनांचे गुण वर्णन करणें हा स्वभाव सज्जनाचेच ठिकाणीं असतो. तस्मात् धर्मरक्षणार्थ जसजसे बहुत लोकसाह्य होतील तसतसें राजानें वागावें हेंच श्रेष्ठ धर्म लक्षण होय. कोणीं मात्सर्यानें असें म्हणतील कीं, शंखऋषीनें आपल्या लिखित नामक भ्रात्याचें सुध्दां हस्त छेदन केलें मग राजानें ऋत्विजादिकांना दंड करण्यास काय प्रत्यवाय आहे! व कोणी निर्मत्सर असे जे संभावित असतात ते कांहीं राजाच्या संतोषा करितां लोभानें ब्राम्हणांस दंड करावा असें भाषण करणार नाहींत. अथवा कार्याकार्य न जाणणारा व गर्विष्ठ होऊन दुर्मार्गानें वागणारास असा जरी गुरु असला तरी त्यासहि शासन करावें. असें सामान्य वाक्य आहे. परंतु तादृश प्रमाण सर्वत्र आहे असें दिसत नाहीं. दुष्कर्म करणाऱ्या अधम ब्राम्हणास दंड करण्याविषयीं देव समर्थ आहेत.

च असें असतां जर ब्राम्हणांस राजानें कपटादिकें करून द्रव्यहरणादि शिक्षा केली, तर तो धर्मापासून भ्रष्ट होईल. सर्वतः (सर्वत्र, श्रेष्ठानीं) सत्कृत श्रौतधर्म, मन्वादिकानीं सत्कृत स्मार्त धर्म, कुलपरंपरागत व ज्या ज्या देशांतील जीं जीं ऐश्वर्यानीं श्रेष्ठ देवस्थानें त्यांच्या निमित्तानें मन्वादिकानीं सांगितला नसून शिष्टानीं आचरित व हीं तीन कारणें न समजून स्वतः हाच उत्कृष्ट धर्म म्हणोन निश्चित केलेला असा जो धर्म त्यांत या चार कारणावरून ब्राम्हणास दंड करावा असें दिसत नाहीं हें मनांत आणून जो वागेल त्याचा धर्म सिद्धीस पावेल. अन्वीक्षिकी, त्रयीवार्त्ता, दंड व नीति या चार गुणानीं संपन्न जो धर्म, यातें कथन करणाऱ्यानेंहि या गुणानीं संपन्न असावें म्हणजे त्यास धर्मवेत्ता असें म्हणतात. वस्तुतः धर्माचें तत्व सर्पाच्या चरणाप्रमाणें पाहणें दुर्घट आहे. जसा सज्जनानीं शिक्षित असून आपल्यास आचरण करण्यास योग्य व भोगले राजर्षी जे तेहि याच मार्गानें वागतात यास्तव तूं याचाच स्वीकार कर. असा धर्मविचार या अध्यायांत आहे.

३. अध्याय तिसरा— भीष्म म्हणतात हे धर्मा, स्वराष्ट्रांतून व परराष्ट्रांतून पूर्वोक्त प्रकारें द्रव्य आणून राजानें आपला कोश संग्रह करावा. कोश हाच धर्माची व राज्याची वृद्धी होण्यास कारण आहे. यास्तव राजानें कोश वृद्धी करून प्रजांचें यथा योग्य पालन करावें. हा सनातन धर्म आहे. तस्मात् केवळ धर्मानें किंवा अत्यंत क्रूरपणानें कोश वृद्धी होणार नाहीं. तर मध्यम स्थितीनें कोश संग्रहाचा उद्योग करावा. बरें क्रश्च दुर्बलाच्यानें कोश वृद्धी करण्याचें असो परंतु कोश रक्षण करणेंहि कठीण तसेंच कोशरहिताला सैन्य कोठून मिळणार, सैन्य नाहीं त्याला राज्य कोठचें व राज्य हीनास संपत्ती कोठून येईल? तस्मात् जे नामांकित व गर्भश्रीमंत असून त्यांची संपत्ती जर गेली तर त्यांस मरणातुल्य दुःख होतें यास्तव राजानें कोश, बल व मित्र यांची वृद्धी अनेक उपायानीं करीत असावी. राजा कोशहीन झाला असतां त्याचा सर्व प्रजा अवमान करितात व त्यानें आपल्या कार्या करितां अल्पद्रव्य दिलें असतां

कोणांस संतोष होत नाहीं आणि त्याचें कार्य करण्याविषयीं कोणी उत्साह पावत नाहींत. संपत्तीच्या योगानेंच पुरुषास सर्व लोकांत सत्कारप्राप्त होतो आणि जसें स्त्रियांचें गुह्य उत्तम वस्त्रानें आच्छादित होतें तशीं पुरुषाचीं पापकर्मे संपत्तीनें झाकून जातात. लांडगे जसे आपल्यास मारणाऱ्या मनुष्यास हाच आमचा वैरी म्हणोन ओळखितात तसे पूर्वींचे विरोधी पुरुष, संपत्ती प्राप्त झालेल्या राजास ओळखून त्याच्या संपत्तीचा क्षय करण्याविषयीं उद्युक्त होतात. एतादृश जर राजा असेल तर त्यास कोठून सुख होईल? तस्मात् वृक्षाचें छेदन करूं लागलें असतां तो जसा नम्र होतो तसें राजानें कोणीं हि शत्रु ईर्षेनें नाश करण्याला प्रवृत्त होऊं लागला तर त्यास नम्र न होतां पराक्रमाचा उद्योग करीत असावें म्हणजे कोणत्या हि वेळेस कोणी विरोधी सांपडेल, तत्काल त्यास धरून मारावें. हें न होईल तर सुखें करून अरण्यांत जाऊन मृगादिकांसहित संचार करावा हा बरा, परंतु मर्यादा सोडून चोरासारखे वागणारे जे अमात्यादिक त्यांच्याशीं सहवास करूं नये. त्यापेक्षां विपत्तीनें ग्रस्त झालेल्या राजास अरण्यांत प्रत्यक्ष चोरांच्या सेना साहाय्य करतील हें फार बरें होईल. परंतु जेथें अमर्यादा उत्पन्न झाली असतां तेथें सर्व हि जन उद्विग्न होतात. फार काय सांगावें मर्यादा सोडून निर्दयपणानें वागणाऱ्या मनुष्यापासीं चोरानां ही शंका प्राप्त होत्ये. तस्मात् लोकांच्या चित्तास आनंद देणारी राजानें मर्यादा स्थापन करावी. कां, अल्प जरी कार्य असलें, तरी त्यांत मर्यादा असावी, म्हणजे लोकांत पूज्यत्व प्राप्त होतें. तसाच नास्तिक व भयानें शंकित झालेल्या मनुष्याचा या लोकीं कोणी अत्यंत विश्वास मानीत नाहींस व परलोकीं हि तो मान्य होत नाहीं. चोरानीं मर्यादपणानें परद्रव्य हरण केलें असतां त्यांस हिंसा घडत नाहीं. आणि लोक हि त्यांचे ठिकाणीं अनुरंजन पावतात. (आसक्त होतात. ) युद्ध न करणाराचा वध, भार्याहरण, कृतघ्नता, ब्रह्मस्वहरण, सर्वस्वहरण, अन्य कन्यादि स्त्रियांचें हरण, अत्यंत परपत्नीचा रोध करून त्याचित्त हरण व परस्त्रियांस आलिंगन हीं अत्यंत निंद्य कर्मे आहेत यांचा चोरानीं त्याग करावा. हा नकरितां

ज्यांनें स्त्री व द्रव्यादि सर्वस्व हरण केलें असेल ते आपलें दुःख न दाखवितां चोराशीं विश्वासानें सख्य करून युक्तीनें चोरांच्या निःशेष धन संतानादिकांचा निश्चयें करून नाश करतील. यास्तव जरी सर्वही आपलें स्वाधीन असलें तरी माझ्या सारिखा कोणी बलाढ्य नाहीं म्हणून चोरानीं अत्यंत क्रूरत्वानें निःशेष न करितां सशेष द्रव्यादि हरण करावें. सशेष करणाराचें शेष राहिलेलें पाहून प्रजा समाधान पावतात आणि निःशेष केलेलें पाहून अत्यंत भयाला पावतात. असा विषय या अध्यायांत आहे.

४. अध्याय चवथा.— भीष्म सांगतात हे धर्मराजा, सत्यस्त धर्मार्थ जाणणारा जो क्षत्रिय त्यानें धनाढ्य असून कृपणानें वागणाराचें सर्वस्व हरण करून दुःख देणें हा त्याचा धर्मच आहे. आणि दैवानें प्राप्त झालेल्या सुखाचा उपभोग करावा. तेथें धर्माधर्मविचारानें उपभोगास विघ्न करूं नये. भूमीवर उमटलेलें पाऊल, हें लांडग्याचें किंवा व्याघ्राचें व श्वानाचें याचा विचार करणें हें जसें व्यर्थ तसें हें सुख भोगणें यांत धर्म आहे किंवा अधर्म आहे म्हणणें हें व्यर्थ होय. कां, धर्माधर्माचें फल कधींहि कोणांस दृष्टी पडत नाहीं. या करितां विद्या, अभिजन, मित्र, बुद्धी, सत्व, धन, तप, साहाय्य, वीर्य, आणि दैव, असें दाहा प्रकारचें बल आहे याचा आश्रय करावा. कां, बलवानास सर्व कांहीं अनुकूल होतें. हें बल तरी संपत्तीच्या योगानें व बलाच्या योगानें अमात्यादिक हे प्राप्त होतात. जो द्रव्यहीन आहे तो या लोकीं नीचत्वास कारण होतो. मग शारीर बल व द्रव्य बल इत्यादिकानीं जो अल्प तो त्याहीपेक्षां नीच हें तर उघडच दिसतें. बलवंताचे ठिकाणीं कांहीं अकर्म दृष्टीपडलें तरी त्याच्या भीतीनें त्यास कोणी हा पतित म्हणून बहिष्कृत करीत नाहीं. कां, सत्यरूप अधिकारावर स्थित असतां बल किंवा धर्म हे त्यास महद्भया पासून संरक्षण करितात. किंबहुना धर्मापेक्षां बलच अधिक आहे असें वाटतें कां, बलापासूनच धर्माची प्रवृत्ती व बलाचे ठिकाणींच प्रतिष्ठा होत्ये. धूर जसा वायूच्या आधीन तसा धर्म हा बलाच्या आधीन होऊन राहातो. बलाच्यापुढें धर्माचें कांहींच चालत नाहीं. वृक्षाचा आश्रय करून जसी वल्ली तसा केवल बलाच्या आ

भयानेंच धर्म राहतो. जसें उपभोग करणारास ऐश्वर्यापासून सुख होतें तसा बलाढ्यास धर्म घडतो. फार काय सांगावें बलवंतास कोणतेंहि असाध्य आहे असें नाहीं. बलहीन पुरुषास दुराचारी असें म्हणतात आणि त्यास कोणी आश्रयहि देत नाहीं. जसे लांडग्याला पाहून व्याकूल होतात तसे त्याला पाहून लोक त्रास पावतात. ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेला मनुष्य लोकांत अमान्य व निंदित होऊन जो वांचतो तें त्याचें वाचणें मरणतुल्य दुःखरूपी होतें. आणि त्याचा सर्व बांधव त्याग करितात मग तो जरी धर्मानें वागूं लागला तरी त्यास पापाचारी असें म्हणूं लागतात अशा लोकांच्या वाग्बाणानीं तो अत्यंत पापाते पावतो. असें दुःख होणें हें सर्व पापाचें फल होय. या पापांतून मुक्त होण्याविषयीं ज्ञान्यानीं सांगितलें आहे तें असे कीं, ( ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद ) त्यांचें अवलोकन करावें आणि उत्तम ब्राम्हणाची सेवा करावी. ती अशी, नेत्रानीं दर्शन, मधुर वाणीनें स्तोत्रादि व शरीर कष्टानें कामें हें करणें आणि प्रसन्न मनानें ब्राम्हणसमुदायांत प्रवेश करून या प्रकारचा मी आहें म्हणून आपल्या दुर्गुणांचें युक्तीनें अति बडबड न करितां कथन करावें. व उदकाच्या आश्रयानें जप करावा. तसाच बहु दुष्कृत कर्म करणाऱ्या ब्राम्हणानें राजसभेंत प्रवेश करावा. तेथें अनेक लोकानीं अनेक उपहासास्पद भाषणें जरी केलीं तरी तीं मनांत आणूं नये. आणि तेथील सभासदानीं सांगितल्या प्रमाणें करावें. म्हणजे तो निष्पाप होऊन लवकर सर्व लोकांत बहुमान्य होतो. आणि सत्कर्माचरणानें सुखाचा उपभोग करितो परंतु केलेलें पुण्यकर्म गुप्त ठेवावें म्हणजे त्यास या लोकीं पूज्यत्व प्राप्त होऊन परलोकींही तो उत्तम फल भोगणारा होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

५. अध्याय पांचवा:— भीष्म सांगतात. हे धर्मा, दस्यूनांहि स्वर्गप्राप्ती आहे याविषयीं इतिहास सांगतों. कोणी एक अरण्यांत राहणारा, बुद्धिमान्, शूर, शास्त्रज्ञ, सौम्य, क्रूर, चारी आश्रमांचा धर्मरक्षण करणारा, ब्राम्हणावर दया करणारा, गुरुपूजक, क्षत्रधर्माचें पालन क-

रणारा, अनेक मृगजाती जाणणारा व त्यांस कोपविणारा निषाद (भिल्ल) जातींत श्रेष्ठ असा निषादीचे ठिकाणीं क्षत्रियापासून झालेला काय व्यनामक नैषादि होता तो चौर्य कर्मानें सिध्दी पावला. ती अशीकीं, तो सर्व भूतांचे धर्म जाणणारा असून व्यर्थ न होणारें बाण व दृढ आयुधें यानें धारण करून पारियात्रनामक पर्वतावर वास करीत असे, त्या एकट्यानें अनेक सेना जिंकून अपार द्रव्य संपादन केलें. त्या द्रव्यानें वृद्ध, अंध, बधिर असे जे स्वकीय मातापितर यांस अरण्य संबधी मधु, मांस, मूल, फलें आणि विविध अन्नें याहीं करून सत्कार पूर्वक भोजन घालून त्यांची सेवा करीत असे. तसेच अरण्यांत संचार करणारे जे ब्राम्हण त्यांचेंही पूजा सत्कार व त्यांस भोजनार्थ मृग मारून त्यांचें मांस आणून देत असे. ते दस्यूचें पदार्थ म्हणून भोजन करण्यास शंकित होऊं लागले असतां त्यांस एक रात्र सुखरूप निवासस्थानीं ठेऊन घेऊन प्रातःकालीं त्यांच्या समीप जाऊन आपणास काय अपेक्षा आहे अशी हस्त जोडून प्रार्थना करी, तेव्हां ते ब्राम्हण, त्यापासून अनेक वस्तु, इच्छे प्रमाणें मागून घेत असत परंतु त्यानें कधीं ब्राम्हणांस नाहीं असें म्हटलें नाहीं. कोणी एके कालीं अन्य जे चोर, त्यां मध्यें परस्पर अमर्यादा होऊन अत्यंत निर्दयपणानें कलह होऊं लागला. तेव्हां ते सर्व मिळून काय व्याकडे येऊन त्यास प्रश्न करितात कीं, तूं मुहूर्त, देश व काल यांचा जाणता आणि शूर व दृढव्रत असून आम्हां सर्वांमध्यें मुख्य आहेस. यास्तव जसे माता व पिता तसा आमचें पालन करणारा अधिपती तूं हो? मग जसजसें सांगशील तसतसें ऐकणारे तुझे किंकर होऊन राहूं असें त्या चोरांचें वाक्य ऐकून कायव्य, सांगतो अरे, श्रवण करा. स्त्री, भ्याले ला मनुष्य, शिशु, तपस्वी व युध्द न करणारा यांस कधींहि मारूं नये. आणि कोणत्याहि जातीच्या स्त्रियानीं अपराध केला तरी त्यांस बलात्कारानें धरूं रूध्दू नये, मग मारणें हें तर कोठून? ब्राम्हणाच्या कल्याणाविषयीं नित्य चिंतन करावें. आणि त्याच्या कार्यार्थ इतरांशीं युध्द करावें. आपलें सत्य घालवूं नये. ब्राम्हणाच्या विवाहादिकांस विघ्न करूं नये.

कां, ब्राम्हणाचे ठिकाणीं देव, ऋषी, पितर व अतिथी यांच्या पूजा होतात. यास्तव सर्व भूत मात्रांत ब्राम्हणच मोक्षास अधिकारी आहेत. या करितां सर्वस्वें करून सर्वदां संतोषानें त्यांची वृध्दी होईल असें आचरण करावें. जर ब्राम्हणाच्या कोपानें नाश होऊं लागला तर त्यास रक्षण करणारा त्रैलोक्यांत हि कोणी नाहीं असें असून जो ब्राम्हणास दुःख देतो त्यास जसा सूर्योदयानें अंधःकाराचा नाश होतो तसा विनाशकाल प्राप्त झाला म्हणोन समजावें. या करितां ब्राम्हणांस लेशमात्र न दुःख देतां द्रव्य प्राप्ती रूप फलाचा उद्योग करीत असावा. तो असा कीं, वणिजादि लोक व्यापारी असून आपल्यास द्रव्य न देतील तर त्यांपासून बलात्कारानें अथवा चौर्यानें हरण करावें. कारण दुष्टांच्या शासनार्थ दंड धारण व शिष्टांच्या रक्षणार्थ व्रत धारण, करावें. हें मान्य न करील तो वधरूप दंडास पात्र होईल. तसेच जे कोणी देशांत उपरोध करून लोकांस उपद्रवाची वृध्दी करितील तर जसें शरीरास क्षत पडून त्यांत कृमी होतात आणि त्यांपासून अत्यंत दुःख होऊं लागलें असतां त्या कीटकांचा नाश करावा लागतो तसें त्या उपद्रव करणारास मारिलें पाहिजे. जे दस्यू असून धर्म शास्त्रानुसार वागतात, त्यांस सत्वर सिध्दी प्राप्त होत्ये. भीष्म म्हणतात. या प्रकारें त्या सर्व दस्यूनीं कायव्याची आज्ञा घेऊन तदनुसार ते आचरण करूं लागले तेव्हां त्यांची वृध्दी होऊन ते सर्व पापापासून मुक्त झाले. तसेच आपल्या सारखे इतरांपासून धर्म आचरण करविले या योगानें तो कायव्य हि परम सिध्दीला पावला. कारण साधूचें क्षेम करणारा व चोरांना दुर्मार्गांतून काढून सन्मार्गास लावणारा असा कोण सिध्दीस पावणार नाहीं? या कायव्य चरित्राचें जो चिंतन करील त्यास अरण्यांत व कोठेंहि भूतमात्रांपासून भय होणार नाहीं. व तो असन्मार्गांत प्रवृत्त होणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

६. अध्यायसाहवा:- भीष्म सांगतात. हे धर्मा, राजानें कोणत्या मार्गानें कोशांत द्रव्य संचय करावा याविषयीं ब्रम्ह गीता म्हणोन एक गाथा

पूर्वी विद्वानानीं कथन केली आहे. कीं, राजानें यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांचें व देवांचें द्रव्य हरण करूं नये. दस्यूंचें व कुलाचारादि क्रिया त्याग करणारांचें हरण करावें. कारण त्या प्रजा, हें राज्य व तत्संबंधी भोग आणि संपूर्ण द्रव्य हें क्षत्रियांचेंच आहे यांचा अधिकारी दुसरा कोणी नाहीं. तें राजानें हरण केलें असतां प्रजा संरक्षणार्थ सैन्याचा संग्रह व यज्ञादि सत्कर्मे, त्या द्रव्यानें होतात, यास्तव अरण्यांत कोणांस अभोग्य ( अनुपयोगी ) असे जे वृक्ष, त्यांचें छेदन करून त्याइं धनानीं भोग्य जे श्री त्यादि त्यांचा पाक करावा. म्हणजे त्यापासून बहुतांचें जीवन होतें. तसें जो देव, पितर व मनुष्यें यांस अन्नवस्त्रादि देऊन ज्या द्रव्याचा विभाग करीत नाहीं तें द्रव्य अनर्थास कारण होतें. यास्तव जो असाधु व अधार्मिक यांपासून द्रव्य हरण करून व आपण आयास भोगून साधु व धार्मिक जे लोक त्यांस देऊन त्यांचें संरक्षण व त्यांस संतुष्ट करितो त्यालाच धार्मिकवेत्ता असें म्हणावें. उद्भिज्ज ( भूमीचा भेद करून उत्पन्न होणारे ) जे पिपिलिकादि ( मुंग्या ) जंतु ते जसे हळु हळु चालून दूर देशास गमन करितात; तसें जस जसी आपल्यास शक्ती असेल तस तसे युक्तीनें लोक जिंकावे. तसेंच गुरुनां व मनुष्यानां त्रास देणारे दंश मशकादि ( रानमाशी, गांधीण, डास ) डासणारे जंतु त्यांचें जसें निवारण केल्यानें सर्वांस सुख होतें तसें निर्निमित्त लोकांस उपद्रव देऊन यज्ञादि करितात ते यथाविधि यज्ञ न होतां त्यांपासून प्रजांस अधीक दुःखमात्र होतें यास्तव राजानें त्यांचें निवारण करावें. आणि प्रजेस विनाकारण दुःख होऊं देऊं नये. हा राजाचा धर्म होय. जसे मार्गातील रजःकण, रथादिकांच्या घर्षणानें व मनुष्यांचा चालण्यानें अत्यंत सूक्ष्म होतात तसा धर्म जो जोणहवा तो अति सूक्ष्म आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७. अध्याय सातवा:— भीष्म सांगतात. हे धर्मा, सुख किंवा दुःख प्राप्त होण्याच्या पूर्वींच असें पुढें प्राप्त होणार आहे म्हणोन अनुमानानें धोरण बांधणारा व कर्मच्या विषयीं बुद्धीचा निश्चय करणारा हे दोघे मात्र सुख पावतात. या शिवाय जो दीर्घसूत्री तो नाश पावतो.

या विषयीं दीर्घसूत्राचा उद्देश करून कार्य कोणतें व अकार्य कोणतें यांचा निश्चय समजण्या करितां आख्यान सांगतों कोणे एका देशांत एक स्वच्छ उदकाचा डोह होता त्यांमध्यें अनेक मत्स्य असून त्यांत दीर्घदर्शी, वउद्योगी व दीर्घसूत्री असे तिघे मत्स्य परस्पर मित्र होते. त्या डोहांतील उदक कमी झालेलें पाहून तेथें मत्स्यधरणारे प्राप्त झाले तेव्हां सर्व मत्स्यांचा नाशकाल प्राप्त झाला असें समजून त्या तिघांतील जो दीर्घदर्शी मत्स्य होता तो त्या दोघांस म्हणतो कीं, हा मार्ग या मत्स्य धरणाऱ्यांनीं बंद केला नाहीं तों इतक्यांत लवकर येथून अन्यत्र निघून जावें. हें माझें वाक्य तुम्हीं मान्य करावें हें ऐकून दीर्घसूत्री म्हणतो सावकाश, असें ऐकून ते उद्योगी मत्स्य म्हणतात ज्याज्या कालीं जेंजें होणार त्याचें कोणाच्यानें निवारण होत नाहीं. अशीं दोघांचीं वाक्यें श्रवण करून दीर्घदर्शी, त्याजला शाप्याचा व त्यांचा त्याग करून त्या जल मार्गानें दूसरें गंभीर सरोवर होतें तेथें तत्काल गेला. नंतर तें उदक चहूंकडे पसरलेलें पाहून त्या धीवरानीं त्याचें स्तंभन केलें आणि जाळें टाकून अनेक उपायानीं सर्व मत्स्य धरिले त्यांत तो दीर्घसूत्री मत्स्यहि सांपडला. तसाच त्या सर्व मत्स्यांच्यामध्यें कांहीं उदकाचा अंश होता त्यांत उद्योगी मत्स्य जीवंत राहिला होता. असे सर्व मत्स्य त्यानीं त्या जळांत बांधून दुसऱ्या मोठ्या सरोवरांत नेले. तेथें ते सर्व मेले असें समजून त्यांस धुण्या करितां मोकळे केले तों त्यांतून उद्योगी हा, एकमात्र जिवंत निघून त्या सरोवरांत जाऊन मुक्त झाला. आणि तो मंदबुद्धी व स्वतः ज्ञानहीन असून दुसऱ्याचें न ऐकणारा असा मूर्ख जो दीर्घसूत्री तो मरण पावला. तस्मात् प्राप्त झालेल्या समयास जो मोहानें स्वतः न जाणणारा व दुसऱ्या सूज्ञानें कोणीं सांगितलें तरीहि न मान्य करणारा तो दीर्घसूत्री मत्स्या सारखा नाश पावेल. तसाच पुढचा विचार मनांत न आणितां मला सर्व कळतें कोणाचें सांगणें नको म्हणोन अगोदर कल्याण होण्याचा दुर्धर मार्ग न पाहणारा जो, तो संप्रतिपत्तिमान् मत्स्या सारखा संशय पावतो. पुढें जें होणार तें अगोदर जाणणारा व ज्याची निश्चित बुद्धी आहे तो, हे दोघे मात्र सुख पावतात, आणि दीर्घ

सूत्री हा नाश पावतो . कला, काष्ठा, मुहूर्त, दिवस, रात्री, पक्ष, मास, ऋतु, अयन, संवत्सर व कल्प हे कालाचे अवयव व पृथिवी आणि देश यांचे अभिप्राय सिध्दी करितां जसजसें चिंतन करावें तसतसें कार्याकार्य ज्ञान होतें दीर्घदर्शी व उद्योगी हे दोघे मनुष्यास धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थ प्राप्ती विषयीं मुख्य आहेत म्हणोन ऋषीनीं सांगितलें आहे. परंतु या पूर्वोक्त दोघां पेक्षां देशकालाचे अभिप्राय जाणून परिक्षा करणारा व युक्तीनें वागणारा उत्तम फलातें पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

८. अध्याय आठवा :– युधिष्ठिर प्रश्न करितो. अहो भरतर्षभा, दीर्घदर्शी व संप्रतिपत्तीमान् या दोघांचें श्रेष्ठत्व सांगून बुध्दीनें नीचत्व टाकून श्रेष्ठत्व धारण करावें. म्हणोन आपण सांगितलें. परंतु धर्मार्थ कुशल व धर्म शास्त्रवेत्ता असा राजा असून त्यास ज्यानीं पूर्वी फार तापविलें होतें अशा बहूत शत्रूनीं वेढा घालून व त्यास स्थान भ्रष्ट करावें म्हणोन ग्रासून टाकलें असतां त्या एकट्यानें अशा संकटांतून मुक्त होण्यास काय उपाय करावा व पूर्वीच्या लक्षणावरून मित्र ओळखावा तर तो अमित्र पणानें वागूं लागला अशा विषमकालीं मित्र कोण. व शत्रू कोण हें कसें समजावें आणि विग्रह कोणाशीं व संधी कोणाशीं करावा ? कारण मित्र आणि शत्रु हे एकसारखेच दिसूं लागले असें झालें असतां राजा बलवान् असला तरी काय करावें. व त्यास सुख, कशानें होईल ? या सर्व कृत्याची आपण व्यवस्था करून सांगावें. याचा कोणी वक्ता नाहीं व श्रोता तर अति दुर्लभच आहे. असें ऐकून भीष्म म्हणतात. युधिष्ठिरा, ज्यांत सुखाचा उदय असा तूं प्रश्न केलास त्याचें उत्तर सांगतों. कार्याच्या सामर्थ्य योगानें मित्राचा अमित्र व अमित्राचा मित्र होतो कारण कोणाचीहि सर्वदां एकसारखी स्थिती राहात नाहीं. तस्मात् कार्याकार्य याचा निश्चय करण्या विषयीं देशकाल पाहून कोणावर विश्वास व कोणाशीं विग्रह करणें तो करावा. कीं, हेच आमचें हित करणारे आ-

हेत असा सूक्ष्म बुध्दीनें निश्चय करून ज्ञात्यांशीं सख्य करावें तसेंच शत्रू शीं हि प्रसंगोपात सख्य करून आपले प्राण वांचवावे. कारण जो,शत्रू शीं संधी, न करील त्यास किंचित् अर्थ प्राप्ती न होतां अनर्थ मात्र होतो. आणि लोकांत अपंडितत्वहि प्राप्त होतें. कदाचित सन्मित्राशीं विरुध्दप- णानें वागला तरी कांहीं अनिष्ट होणार नाहीं परंतु शत्रूशीं जर विरुद्द वा- गेल तर अनर्थाशी गाठ पडेल यास्तव अर्थावर दृष्टी ठेवून शत्रूशीं मित्रा प्रमाणें वागावें. म्हणजे महत्फल प्राप्त होतें. याविषयीं मार्जार व मूषक यांचा संवाद सांगतों कोणी एक महा अरण्यांत मेघा सारखा शी तल छाया करणारा असा मनोहर मोठा एक वटवृक्ष होता त्याच्याम्रू लाच्या आश्रयानें शत सुखाचें मोठें बीळ करून त्यांत महाज्ञान संपन्न पलित नामक एक मूषक राहत असे तसाच पूर्वीपासून त्यावृक्षाच्या शाखेवर पक्ष्यांचें भक्षण करणारा लोमश नामक एक मार्जारहि असे. असें असतां त्या अरण्यांत राहणारा चांडाळ त्यानें रोज अस्तमानश्या त्यावर त्या वृक्षा खालीं जाळें पसरून द्यावें आणि घरीं जाऊन सुखशा- ल निजावें तों रात्रौ त्या जाळ्यांत बहूत मृगादिक गुंतून पडत नंतर प्रातः काळीं त्या चांडालानें ते घेऊन जावें असें होतां होतां एके दिवशीं तो मार्जार असावधपणानें त्या जाळ्यांत सांपडला. हें त्या पलितना- मक मूषकानें पाहिलें आणि हा आमचा शत्रु या कालपाशांत सांप- डला हें बरें झालें म्हणोन निर्भयपणानें चहूंकडे संचार करूं लाग ला. तों त्यास मिळालें तें घेऊन तो शत्रूच्या मस्तकावर बसला वतृ णवर्ण युक्त असा हरिण नामक ( मुंगुस ) हा मूषकाच्या गंधानें त्यास भक्षण करण्या करितां प्राप्त झाला. तेव्हां हा दुसरा भयंकर शत्रु म- ला गिळूं पाहतो असें त्या मूषकानें पाहिलें तसाच वृक्षावर बसलेला, तीक्ष्ण मुखाचा रात्रिंचर असा चंद्रक नामक उलूक ( घुबड ) हा तिस- रा शत्रु पाहिला त्यांत एक तर पाशांत सांपडला परंतु हे दोघे मला भक्षण करतील आतां काय करावें अशा प्राणांत संकटांत पडून तो विचार करितो कीं जर एकाएकीं भूमीवर जाईन तर नकुल आहे येथें

व असलों तर हा उलूक व कदाचित् दैववशें करून अशा प्रसंगांत आ ह्मांतून मुक्त झाला तर मार्जार हे, मला भक्षण करण्यास जपले आहे त. तस्मात् माझ्या सारख्या ज्ञात्यानें मोहांत पडून शोक करणें हें योग्य नाहीं. यास्तव युक्ति बलानें जीविता विषयीं यत्न करून पाहवा, तो सिद्धीस न गेला तर उपाय नाहीं. कारण बुद्धिमान् व नीतिशास्त्रसंप न्न यानें कशी जरी भयंकर विपत्ती प्राप्त झाली तथापि धैर्य त्याग क रून खिन्न होऊं नये. असें मनांत समजून मूषक पुनः विचार करि तो कीं, ज्याला बहूंकडून शत्रूनीं पीडित केलें त्यानें शत्रूशीं संधी क रून आपले प्राण रक्षण करावें. तसेंच पंडितांशीं शत्रुत्व बरें परंतु मूर्खाशीं मित्रत्व नसावें. असें नीति शास्त्राच्या आधारावरून थोर ज्ञान्यांचें संमत आहे. तस्मात हा मार्जार मोठ्या व्यसनांत सांपड ला असून यांतून मुक्त होण्यास इच्छितो यास्तव याच्याशीं वंच ना बुद्धीनें आपलें रक्षण होण्या करितां सख्य करावें. म्हणजे यास आपलें बोलणें सत्य वाटून विश्वास पूर्वक मान्य करील यांत आ पलें कार्य व याचा नाश असें होईल. या प्रमाणें त्या संधि विग्रहा चा काल जाणणाऱ्या मूषकानें विचार करून सामोपचारानें तो मार्जा राशीं बोलूं लागला. कीं, हे लोमशा, मीं, तुला वाचवावें अशी इच्छा क रितों यांत तुझें व माझें हित आहे. तूं भिऊं नको मी निश्चयें करून तुझा उद्धार करितों परंतु मजला मात्र तूं मारूं नयेस म्हणजे मीं एक दुष्कर उपाय मनांत योजिला आहे त्यानें उभयतांचेंहि कल्याण होईल. नकूल व उलूक हे पाप बुद्धीनें मला मारण्या करितां प्राप्त झाले आहेत हे मला न धरतील तर सांप्रतकालीं मी वांचून तुला हि वांचवीन तुझा व आमचा तर बहूत दिवसांचा सहवास अस न परस्परांत अत्यंत मित्रत्व आहे. या करितां सहवासाचें फल, प्रा प्त होण्याचा समय येऊन पोहोंचला असून जर परस्परांच्या का र्या विषयीं उद्योग न करावा तर या लोकीं व पर लोकीं निंदास्पद होऊं यास्तव जर माझी हिंसा न करशील तर आगोदर या पाशांचें रवंड

मीं करितों नंतर तूं मजला केवळ प्राण मित्र व प्रिय बंधु असें समजून आपण भय न देतां या शत्रूं पासून अभय द्यावेंस. असें झालें असतां हे पाश आतां तोडून तुला यांतून मुक्त करितो. जसें महानदींत काष्ठाला आपण तारलें असतां तेंहि आपणास तारतें तसें मीं तुलाभारतों आणि तूं मला तारावेंस. या प्रकारें करून सहेतुक, कालानुरूप त्या पलितानें भाषण केलें तें सुभाषण श्रवण करून मार्जार म्हणतो कीं, हे सौम्य, माझें हें प्राणांत व्यसन पाहून तूं दयेनें मला जीवदान देण्याकरितां उद्युक्त झालास? तस्मात् निःशंकपणानें माझा उद्धार करून श्रेय संपादन कर. यास विलंब करूं नकोस. कारण मीहि अत्यंत पीडित होऊन या पाशांतून मुक्त होण्याची इच्छा करीत आहें इतक्यांत तूंहि अनुकूल झालास हें फार उत्तम झालें. तूं आणि मीं उभयतां एका व्यसनांत सांपडलों हें परस्परांचें व्यसन दूर झालें असतां उभयतांचा स्नेहभाव निरंतर राहील. कारण प्राण दाना सारखें दुसरें कोणतेंहि उत्तम दान नाहीं. यास्तव मी तुला शरण आलों आहें. असें ऐकून मूषक म्हणतो अरे, तूं भाषण केलेंस हें कांहीं आश्चर्य नव्हे, कारण तुझ्या सारख्यास हें उचितच आहे. आतां परस्पराच्या हिता विषयीं जो मार्ग मी मनांत योजिला आहे. तो असा कीं, या जाळ्या मध्यें तुझ्या सन्निध येऊन बसावें म्हणजे उलूक व नकूल या दोघांचा भया पासून मुक्त होईन परंतु तूं मात्र माझें प्रीतीनें रक्षण कर. म्हणजे हे सख्या मी शपत पूर्वक या पाशांचें छेदन करून तुला मुक्त करीन हें त्याचें वाक्य ऐकून मार्जार, मोठ्या हर्षानें बोलतो कीं, निःशंकपणानें तूं लवकर प्रवेश कर. तूं माझा प्राण सखा आहेस तुझें कल्याण असो. तुझ्या प्रसादें करून मित्र बांधवांस ह्व वर्तमान बहूतकालपर्यंत मी जीवन पावेन. असें मार्जाराचें भाषण ऐकून मूषकानें त्या जाळ्यांत प्रवेश केला आणि पुत्रानें मातापितरांच्या अंकावर शयन केल्या सारखें त्या मार्जाराच्या पोटाशीं त्यानें शयन केलें हें अद्भुत आश्चर्य पाहून नकूल व उलूक तेथून आपआपल्यां स्थानीं गेले.

इकडे मूषकानें हळुहळु ते पाश छेदन करण्यास आरंभ केला हें पाहून मार्जार मूषकास म्हणतो कीं, या कालपाशांतून लवकर मुक्त होण्याची मी इच्छा करितो आणि तूं तर सावकाश छेदन करीत बसलास हें काय? त्यात हे सख्या, तो चांडाल आला नाहीं तों यांतून आपण उभयतां निघोन जावें. या करितां सत्वर याचें छेदन कर. असें ऐकून मूषक म्हणतो कीं, हे सौम्य, तूं त्वरा न करितां मुकाट्यानें बईस. तुला कालज्ञान नाहीं. आह्मी देशकाल जाणून तदनुरूप वागणारे आहोंत चांडाल आलेला पाहतांच तुला मुक्त करीन. मार्जार म्हणतो कीं ही कांहीं मित्र कार्य करण्याची रीति नव्हे. कारण जसें तुला त्वरेनें संकटांतून मी मुक्त केलें. तसें तूं मला कां करीत नाहींस? अथवा पूर्व वैर स्मरून जर काल हरण करीत अससील तर तुझ्या आतांच आयुष्याचा क्षय झाला असें समज कदाचित् पूर्वीं माझ्या कडून तुझा अन्याय झाला असेल तर तो तूं मनांत न आणितां क्षमा करून माझ्यावर प्रीतीनें सुप्रसन्न व्हावेंस. असें ऐकून शास्त्र बुद्धि युक्त मूषक भाषण करितो हे मार्जारा, स्वार्थ गृहण करणारा जो तूं तुझें वाक्य मीं श्रवण केलें तसेंच स्वार्थाचें ग्रहण करणारा जो मी या मलाहि तूं जाणतोस परंतु जो मित्र, भयानें पीडित झाला असेल, त्याचें रक्षण करावें. बलवानाशीं सख्य करून जो आपलें रक्षण करीत नाहीं तो रोग्यानें अपथ्य भोजन केल्याप्रमाणें नाश पावतो. कोणी कोणाचा मित्र व कोणी कोणाचा शत्रु हा मुळचाच असतो असें नाहीं कांहीं अर्थाच्या कारणावरून मित्रत्व व शत्रुत्व घडतें. तसेच अर्थापासून च अर्थ आणि अनर्थहि घडतात. तूं स्वस्थ राहा! मायश: या पाशाचें छेदन केलेंच आहे एक तंतु मात्र राहिला त्याचें इतक्यांत छेदन करतों अ सें दोघांचें भाषण होत आहे तों प्रातःकालचा समय प्राप्त झाला तेव्हां तो लोमश भिऊं लागला इतक्यांत स्थूल पाश धारी, बहूत श्वानगणानीं वेष्टित, असा परिघनामा चांडाल आला तेव्हां मूषकालाहि भीति पडली. नंतर त्यानें पाश तंतूचें छेदन करून आपल्यासहित मार्जारास मुक्त केलें असतां मार्जार मोठ्या त्वरेनें त्या वृक्षाच्या अग्रावर जाऊन बसला आणि

मूषकहि आपल्या बिळांत गेला. मग त्या चांडालानें तें जाळें पाहिलें तों त्यांत कोणीहि श्वापद नाहीं व इतस्ततः कोणी नाहीं असें पाहून तो निराश झाला आणि तें रिकामें जाळें घेऊन आपल्या घरास गेला. नंतर लोमश भाषण करतो हे मूषका ! कांहींएक माझ्यापासून न घेतां तूं अकस्मात् माझें रक्षण केलेंस हे तुझे उपकार मी जाणत आहें; परंतु तूं तर आतां मजविषयीं शंका करीत नाहींस ना ? तूं मला जीवदान केलेंस आणि मीहि तुझ्या म्हणण्या प्रमाणें तुझें रक्षण केलें या योगानें तुझें आमचें अत्यंत मित्रत्व झालें आतां तूं आणि मीं एकत्र वास करून उभयतांच्या मित्रत्वाचा उपभोग घडावा व तुझ्या बांधवांसहवर्तमान तुझा पूजा सत्कार केलेला माझ्या बांधवानीं पाहवा अशी मी इच्छा करितों. माझें शरीर, गृह व द्रव्यादि सर्व पदार्थ यांचा पालन करणारा व शासन करणारा असा तूं अमात्य हो. तुझे आम्हीं सर्व सेवक व पुत्र या प्रमाणें आहोंत आम्हा पासून तुला भय होईल तर आमच्या जीवित्वाची व आत्म्याची शपथ. या प्रमाणें मार्जाराचें भाषण ऐकून मूषक म्हणतो हे लोमशा, मित्र आणि शत्रु हे सूक्ष्म रीतीनें जाणावे असें ज्ञान्यांचें संमत आहे. तें असें कीं, शत्रुरूप मित्र व मित्ररूप शत्रु असे असतात त्यांच्याशीं कामक्रोधाच्या स्वाधीन होऊन संकटवशात् कारण परत्वें संधी केल्यानें त्यांचें स्वरूप ज्ञान होतें असें नाहीं. कोणी एखाद्याशीं स्वार्था करितां सख्य करितो त्यांत व्यत्यय आला नाहीं, तावत्कालपर्यंत मित्रत्व असतें पुढें कांहीं विपर्यास दिसूं लागल्याबरोबर विरुद्ध होऊन उभयतांत शत्रुत्व उत्पन्न होतें. तस्मात् मित्रता व शत्रुता स्थिर राहात्ये असें नाहीं मित्र आणि शत्रु हे अर्थाच्या कारणावरून होतात. कृत्य विपर्यासानें मित्र असतां तो शत्रु होतो तसाच शत्रु असतां तो मित्र होतो तस्मात् स्वार्थ हा बलवान आहे. मित्राचे ठिकाणीं विश्वास व अमित्राचे ठिकाणीं अविश्वास अशी साधारण लोकरीति आहे परंतु अर्थशुद्धी नजाणून शत्रु किंवा मित्र यांचे ठिकाणीं जो प्रीति विषयीं मन, ठेवितो तेंहि कालवशो करून चंचल होतें. या करितां कोणीं विश्वासू असो किंवा अविश्वासू असो त्याचे ठिकाणीं चांगला विचार केल्याशिवाय एकाएकीं विश्वास

करूं नये कारण विश्वासानें महद्भय उत्पन्न होऊन समूल नाश होतो. माता, पिता, सुत, मातुल, भागिनेय, संबंधी व बांधव हे सर्व परस्पर अर्थाव-रच दृष्टी देणारे असतात. कशावरून म्हणशील तर, अर्थ संपादन क-रणारा असा दुष्ट पुत्र असला तर त्याचा त्याग व प्रीय असला तर त्याचें रक्षण करितात. पूर्वी तूं वृक्षाच्या अग्रावर असून चंचलपणानें जसा जाळ्यांत सांपडलास तशी चंचलता इतरांस व मजला तरी कोठून अ-सेल? या वरून ज्याचे ठिकाणीं चांचल्य दोष आहे त्याचीं सर्व कार्ये विप-रीत होतात. असें असून आमचा प्रिय सखा व अमात्य तूं हो म्हणून मधुर वाणीनें माझी प्रार्थना करितोस, हें कसें घडेल? या विषयीं मि-त्रत्वाचीं कारणें सांगतों सहोदर बंधु व स्त्री पुरुषें यांची सुध्दां पर-स्पर कारणा वांचून प्रीति नसत्ये. मग इतरांची तर कोठून असेल? तस्मा-त् सर्व लोक हे अर्थार्थी आहेत निष्कारण कोणी कोणाचा प्रिय किंवा द्वेषी होत नाहीं. कांहीं कारणानें कदाचित् भ्राते व दंपती यांत कलह झाला त-री पुनः त्यांच्या जन्माच्या गांठी असतात या मुळें प्रीति घडेल परंतु इतर लोकांत असें होणार नाहीं. आतां कोणी दान, प्रिय भाषण, हित-कारक मसलत, प्रसंगीं सहाय्यता, जप, होम व हितोपदेश इत्यादि-कानीं प्रिय होतो. तशी तुझी आमची प्रीति कारणा पुरती, कारण निवृ-त्ती झाली तशी प्रीतिहि उडाली. आतां तुझें माझें स्वाभाविक शत्रुत्व असून जो तूं प्रिय म्हणून मजला बोलावितोस हें केवल भक्षणार्थच आ-हे हें आम्हांस कळत नाहीं कीं काय? तूं जसा आपला स्वार्थ पाहतोस तसा मी हि जाणत असून स्वार्था पासून भ्रष्ट होणार नाहीं. या करितां तूं विद्वान असतां असें बोलतोस हें योग्य नव्हे. अभ्राचीं रूपें जशीं क्षण क्षणा विपरीत होत असतात तसें एका दिवसांतच अगोदर शत्रुत्व असून नंतर मित्रत्व आणि पुनः शत्रुत्व असें वरचेवर कारणपरत्वें होत असतें तस्मात् ज्या कार्यास्तव तुझें माझें मित्रत्व झालें होतें तें कार्य नि-वृत्त झालें तसें मित्रत्वहि सरलें आतां तुझ्याशीं समागम करणें हें केव-ळ हितादिकांची आशा सोडून मृत्यूच्या मुखांत प्रवेश केल्या प्रमाणेंच आ-

हे कारण मी दुर्बल व त्यांत तुझें भक्ष्य आणि तूं बलवान असून भोक्ता आतां माझीच इच्छा जर करशील, तर सर्वस्व हि तुला देतों परंतु मीपा ण तुझ्या स्वाधीन होणार नाहीं. कारण आपल्या करितां संतती, राज्य, स्त्री, रत्नें व अनेक द्रव्यें गेलीं तरी चिंता नाहीं. कांहीं सर्व पुनः मिळतील परंतु आपलें शरीर हें पुनः मिळावयाचें नाहीं. यास्तव सर्वदां आपलें आपणाच रक्षण करावें. आत्मरक्षण करणारा, कोणतेंहि कार्य परीक्षा करून करणारा जो त्यास भायशः स्वदोषापासून होणाऱ्या विपत्ती प्राप्त होत नाहींत. तसा च जो दुर्बल असून बलवान शत्रूस चांगलें जाणतो, त्याची शास्त्रार्थाविष यीं निश्चित झालेली बुद्धी कधींही चंचल होत नाहीं. असें ऐकून मार्जार भाषण करितो हे मूषका, मी सत्य शपथ पूर्वक सांगतों तू माझा मित्र व हि त करणारा असून तुझ्याशीं द्रोह करणें हें कधींहि माझ्यानें होणार नाहीं. यास्तव हे साधो, माझ्या ठिकाणीं तूं अन्यथा भाव मानूं नको. तूं मला सर्व दानां मध्यें श्रेष्ठ असें प्राणदान केलेंस म्हणोन मित्रत्वास कारण झालें. त- स्मात् धर्मज्ञ, गुणज्ञ, कृतज्ञ, आणि विशेषेंकरून तुझा भक्त असा मी अ सतां माझ्याशीं सहवास करण्याला कां शंकित होतोस? तुझ्या आज्ञेनें मी प्राणत्याग सुध्दां करीन मग बांधवादिकांचा त्याग करीन हें काय सांगावें. तस्मात स्वाधीन चित्त असा जो मी या माझे ठिकाणीं साधु हि विश्वास पाव तात. असें असतां तूं धर्मतत्व जाणणारा असून माझे ठिकाणीं कोणती हि शंका करण्यास योग्य नाहीस. असें मार्जारानें भाषण केल्यावर मूषक म्हणतो. अरे तूं साधू आणि धर्मज्ञ आहेस असें असून तूं कितीहि स्तवन केलेंस तथापि तूं मुळचा शत्रु आहेस यास्तव कशास्तव स्नेह करावा? जर विश्वास पूर्वक दुर्बलानें बलवानाशीं स्नेह केला, तर त्याचा नाश हो ण्या करितां तुझ्या पासून मीं आपलें रक्षण करावें आणि तूंहि चांडा लापासून आपलें रक्षण करावेंस. असें त्या मूषकाचें वाक्य ऐकून मार्जार, वृक्षाग्रावरून खालीं आला इतक्यांत त्या मूषकानें बिळांत प्रवेश केला. भीष्म म्हणतात. हे धर्मा, या रीतीनें दुर्बल असून ज्ञानी मूषकानें शत्रूशीं संधी व वंचना करून आपण आपल्यास मुक्त केलें. तसें क्षत्रियानीं परस्पर

जरी वैर असलें तरी प्रसंगोपात्त संधी करून प्रीति उत्पन्न करावी. तस्मात् शत्रु जो त्याशीं न भ्याल्या सारखें व अविश्वासी जो याचे ठिकाणीं विश्वास केल्या सारखें दाखवावें. तसें ज्ञान्यानीं कदाचित् शत्रूशीं संधी व कदाचित् मित्राशीं विग्रह असेंहि प्रसंग पाहून करावें यावरून शत्रूचें भय प्राप्त झाल्या पूर्वीं त्याच्याशीं संधी करावा. म्हणजे त्यास कधींहि भय प्राप्त होत नाहीं. जर विश्वास ठेवील तर महद्भय प्राप्त होईल. तस्मात् जसा कार्य प्रसंग येईल तसें आचरण करावें. शत्रु व मित्र यांतहि संधि विग्रह काल जाणून आपल्यास बंध न होईल अशा रीतीनें वागावें. तसेच त्रिवर्ग मार्गासहि विरुद्ध नसावें. अशा नीतीनें प्रजांचें रक्षण कर. म्हणजे ब्राम्हणांच्या सहवासानें तुझ्या जन्माचें साफल्य होईल. कारण हे ब्राह्मण या लोकीं व परलोकींहि श्रेयस्कारक आहेत आणि सर्व धर्म जाणणारे, सर्वत्र पूज्य व शुभ फल देणारे यांची नित्यशः तूं पूजा करीत जा. म्हणजे तुझें राज्य यथास्थित चालून उत्तम कल्याण व सर्व कार्यांत यश प्राप्ती व संतती आणि लोकांत अक्षय्य कीर्तीहि होईल. तशीच हे भारता, संधि विग्रहा विषयीं हें आख्यान राजानें श्रवण करून यांत सांगितलेल्या नीतिप्रमाणें वागलें असतां शत्रु मंडलांत असूनहि त्यास भय होणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

९. अध्याय नववा:- युधिष्ठिर प्रश्न करितो हे महाबाहो, शत्रुशीं विश्वास धरल्यानें राजास भय उत्पन्न होतें तर सर्वत्र विश्वास न ठेवतां राजानें कसें वागावें व कसें जयी व्हावें? या संशयाची निवृत्ती करावी. भीष्म म्हणतात. हे राजा, या विषयीं ब्रम्हदत्त राजा आणि पूजनी यांचा संवाद सांगतों कांपिल्य देशांत कोणी एक ब्रह्मदत्त राजा होता त्याच्या अंतःपुरांत पूजनी नामक ( चिमणी ) जी सर्व भाषा समजणारी सर्वज्ञ अशी होती म्हणोन त्या राजानें तिला ठेविली. असें असतां कोणे एके दिवशीं तिला पुत्र झाला त्याच वेळेस राजपत्नीलाहि पुत्र झाला. त्या दोघांस बल, पुष्टी व तेज यांची वृद्धी होण्याकरितां त्या पूजनीनें अमृता सारखीं गोड दोन फळें दोघांस दिलीं या प्रमाणेंच नित्यशः ती देत असे. त्या योगें राजपुत्र परम

पुष्ट व तेजःपुंज दिसूं लागला. त्यास एके दिवशीं धात्रीनें पूजनीचा बालक दाखविला तो पाहून तो कडेवरून उतरला आणि त्याच्याशीं क्रीडा करूं लागला. असें असतां त्यास राजपुत्रानें नेऊन त्याचा वध केला आणि तो धात्रीकडे गेला. तों ती पूजनी फलें घेऊन आली आणि पहाते तों राजपुत्रानें आपला पुत्र मारिला तेव्हां ती अत्यंत दुःखानें संतप्त होऊन म्हणते. क्षत्रियाशीं कधींहि मित्रत्व करूं नये. कारण ते आपल्या मतलबापुरते असतात आणि कृतकार्य झाले म्हणजे त्याचा घात करितात. आतां मीहि याकृतघ्नाला स्वतुल्य यातना द्यावी; परंतु ज्याचें बरोबरीनें जन्म, वृध्धी व भोजन झालें असेल त्याचा व शरणांगताचा वध करणें हें समान पातक आहे. असें म्हणोन तिनें आपल्याचरणानीं राजपुत्राचे नेत्र फोडोन ती आकाशांत उडोन गेली व बोलते तुझें पाप तुला फलद्रूप झालें हें या पुत्राचे ठिकाणीं न होतें तर तुझे नातु पणतू व निपणतू यानीं तरी भोगावें लागतें; यास्तव आतांच याचा वध करावा तो न करितां नेत्रमात्र हरण केले. हें ऐकून ब्रम्हदत्त राजा पूजनीस म्हणतो कीं, आम्हीं तुझा पुत्र घात केला आणि तूंहि आमच्या पुत्राचा नेत्र घात केलास आतां तूं जाऊं नको. पूजनी म्हणते एकदां ज्यानें अपराध केला त्याजपाशीं पुनः वास करूं नये केला तर दिवसेंदिवस वैर वाढून अनर्थ प्राप्त होतात. विश्वासापासून महाभय उत्पन्न होऊन समूल नाश होतो. यास्तव स्वकीयाचाहि विश्वास धरूं नये. स्वकीय बांधवांमध्यें मातापिता मात्र श्रेष्ठ आहेत कारण. ते पुत्राचें पालन करितात आणि भार्या, ही, वीर्य हरण करून जरा उत्पन्न करिते. तसाच पुत्र तरी बीजापासून बीज झाल्यासारखा जन्मास येतो. आणि भ्राता, हा, द्रव्याचा मात्र विभागी होतो. तसाच आपले हातून उपकार होत असेल तरच मित्राचें मित्रत्व समजावें. परंतु यांतून दुःखाचा विभागी कोणी होत नाहीं. आपणाच दुःख भोगणारा होतो. हे राजा, आजपर्यंत मीं तुझ्या गृहीं वास केला. त्यांत अकस्मात वैर उत्पन्न झालें. तस्मात् आतां गमन करितें. ब्रम्हदत्त म्हणतो उभयतांच्या कर्मांची फिटाफिट झाली आतां तूं येथें वास कर. पूजनी म्हणते परस्परांपासून झालेल्या-

कर्मांचें दुःख मनांतून कधींहि जाणार नाहीं. ब्रह्मदत्त म्हणतो. श्वानमांस भक्षण करणाऱ्या चांडालाशींहि सहवासानें श्वानाचें सख्य होतें. मग तुझा आमचा स्नेह राहील हें काय सांगावें. तुझें आमचें वैर, हें कमलपत्रावरच्या उदकबिंदुसारखें अस्थिर आहे. पूजनी म्हणत्ये. वैर, हें पांच प्रकारचें आहे. स्त्रीनिमित्य कृष्णशिशुपालाचें वैर, सभास्थानसंबंधीं कौरवपांडवांचें, बोलण्याच्या निमित्तानें, द्रोणाचार्य द्रुपदाचें, सवतिसवतीच्या संबंधानें व जाति संबंधानें, मूषक मार्जाराचें, अपराधापासून झालेलें तुझें आमचें हीं सर्व वैरें समानच आहेत्यांत जो द्रव्यादिकानीं बहुतांचें संरक्षण करितो त्यास मारूं नये. त्यांत क्षत्रियानें तर सर्वथा न मारावें असें आहे. तस्मात् ज्यापेक्षां रोज फलदानें करून तुझ्या पुत्राचें मीं संरक्षण केलें त्यापेक्षां तूं मला मारणार नाहींस हें मीं जाणत्ये. आणि कदाचित् जरी परस्पर स्नेहानें वागूं लागले, तत्रापि उभयतांच्याहि मनांत निरंतर वैर असतें तें एखादे दिवशीं महा अनर्थास कारण होतें. यास्तव तूं मला राहण्याविषयीं आग्रह करूं नको. ब्रम्हदत्त म्हणतो. हें सर्व जग कालाधीन आहे. कालच, सर्वांच्या हातून शुभाशुभ कर्में करवून तदनुरूप सुख दुःखें व जन्ममरण भोगवितो. तूं व मीं या उभयतांकडे कांहिं एक दोष नाहीं. पूजनी म्हणत्ये हे राजा, जर कालच शुभाशुभ कर्मादिकांचा कर्ता असें जर मानितोस. तर लोक एकमेकांच्या मरणानें शोक मोहांत कां पडतात? तस्मात् एखाद्याचा घात करून मीं केला नाहीं, कालानें केला असें म्हटल्यानें परिहार होणार नाहीं असें असून तूं मला राहण्याविषयीं आग्रह करितोस? याचा हेतु असा दिसतो कीं, राजानें पक्ष्यांचें पालन करणें यांत दोन कारणें आहेत. एक क्रीडणार्थ किंवा भक्षणार्थ यांत आजपर्यंत तूं माझें रक्षण केलेंस आतां भक्षण करणें हें मात्र तुझें कार्य अवशिष्ट आहे. परंतु हे राजा, ज्याचें त्यास स्वप्राण, अत्यंत प्रिय असून दुःखें कोणांस सहन होत नाहींत; तस्मात् परदुःखें करून दुःखी होणारा फार दुर्मिळ आहे. असो; तुझें माझें वैर शत वर्षानींहि परिहार होणे नाहीं. ब्रम्हदत्त म्हणतो. हे पूजनी, सर्वत्या कोटेंहिवि-

त्यास डेविला नसतां मनुष्यांचें जीवनच होणार नाहीं. पूजनी म्हणत्ये हे राजा, स्वतः दोष करणारी असून निर्दोष जो तूं या तुझ्याशीं सहवास करण्याविषयीं मीं समर्थ नाहीं. याविषयीं दृष्टांत सांगत्यें एखाद्याच्या चरणास व्रण पडलें असून तो फार जपून जरी धांवूं लागला, तरी त्याच्या पायास बहुत अपाय होतील. व दुष्ट मार्गाचें अवलंबन केल्यानें प्रायशः जीवितांतच होतो तस्मात् दैवावर दृष्टी देऊन पराक्रम करीत असावा. केवळ दैवावरच हवाला ठेवून उद्योग करील तर त्यास षंढ म्हणावें. शास्त्र. व सर्वस्वाचा त्याग होऊन आपलें ज्यांत हित होईल तेंच आचरण करणारा जो ज्ञाता, तो सर्वत्र मान्य असून सर्व ठिकाणीं रमतो. तस्मात् बुद्धिमानाचें द्रव्य स्वल्प जरी असलें तरी तें दृइंगत होतें. दुर्बुद्धि मनुष्यास दुष्ट स्त्री आपल्या अपराधानें संताप देऊन दिवसंदिवस शुष्क करित्ये. तस्मात् ज्याच्या बुद्धीस विपर्यास झाला त्यास गृहादिक हे अत्यंत दुःख देणारे होतात व्याधि व दुर्भिक्ष देशांतून अन्य ठिकाणीं गेलें असतां सुख लागेल. तस्मात् हे राजा मी जात्यें. जेथें प्रजेवर बलात्कार नाहीं तो राजा, ज्यापासून भय नाहीं तो संबंधी, तस्मात् राजा जर गुणवान व धर्मात्मा असेल तर सर्वहि यथा योग्य असतात कारण राजाच धर्म, काम, अर्थ यांचें मूळ असून धर्मानें प्रजा पालन करीत असतां प्रजांपासून धर्माचा षष्ठांश भोगणारा होतो. न रक्षण करील तर त्यास तस्कर असें म्हणतात. राजानें पित्या सारखी प्रजेवर दया करावी. माते सारखी इच्छा पुरवावी, अग्नी सारखे अनिष्टाचें दहन करावें, यमा सारखा दुष्ट जनास दंड करावा. कुबेरा सारखें उत्तम जनास द्रव्य द्यावें, गुरु सारखा सर्वांस धर्मोपदेशक राहून आणि स्वकीया सारखें सर्वांचें पालन करावें. असें सात गुण राजाचे ठिकाणीं असून त्यानें प्रजांचें रंजन करावें. म्हणजे तो राज्यापासून कधीं हि भ्रष्ट होणार नाहीं. आणि ज्याच्या राज्यांत जसीं सरोवरांत कमलें दृइंगत होतात तशा प्रजा, आनंद पावतात. तो राजा या लोकीं कीर्तिमान् असून स्वर्गांत हि पूज्य होतो. तस्मात् राजानें बहु यत्न करून स्वधर्म पालन करावा. आणि आपल्या पेक्षां बलवानाशीं कधींहि विग्रह क-

रू नये. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, या प्रमाणें ती पूजनी, ब्रह्मदत्तराजास धर्मनीतियुक्त भाषण करून व त्यास विचारून गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

१०. अध्याय १४०वा.— युधिष्ठिर प्रश्न करितो. हे पितामह, युगान्तक्षय झाला असतां सर्व धर्म क्षीण होतात तेव्हां चोरांनीं पीडित झालेल्या लोकांत कसा वास करावा? भीष्म म्हणतात. हे भूपते, या विषयीं भारद्वाज ऋषी व शत्रुंजय राजा, या उभयतांचा संवाद सांगतों. सौवीर देशांत कोणी एक शत्रुंजयनामक महारथी राजा होता, तो कोणि एके दिवशीं भारद्वाजापाशीं जाऊन प्रश्न करूं लागला कीं, हे ऋषे, द्रव्याचा लाभ नसतां इच्छा कशी होत्ये, प्राप्त झालें असतां त्याची वृद्धी कशी, वृद्धिंगत झाल्याचें पालन कसें व पालन केलेल्या द्रव्यांचा व्यय, कसा करावा? असें ऐकून भारद्वाज सांगतात हे राजा, राजानें सर्वदा उगारलेला दंड असून पराक्रमानें प्रख्यात असावें आणि स्वछिद्र गुप्त ठेवून दुसऱ्याचें छिद्र पाहात असावें. म्हणजे त्यास सर्व जन भिऊन असतात. यास्तव त्यानें सर्व लोकांस दंडानेंच वश करावें. कारण सामादि चार उपायांत पंडितांनींहि दंडाची मुख्य प्रशंसा केली आहे. यास्तव जसें वृक्षाचें मूळ छेदन केल्यानें शाखांचा नाश होतो तसा अगोदर शत्रूंचा मूळ घात करावा म्हणजे अर्थात त्यांचे सहाय भूत लोक, आपले हस्तगत झाले म्हणोन समजावें. तसाच आपत्काल प्राप्त झाला असतां त्यांतून कोणत्याहि रीतीनें मुक्त होण्या विषयीं जो विचार, जो पराक्रम, जो अधर्म, युद्ध करणें अथवा पलायन करणें हें उत्तमच समजावें. तसेंच अंतःकरणांत तीक्ष्णता असून काम क्रोध न दाखवितां अत्यंत मधुर भाषणानें शत्रुशीं कार्यापुरता स्नेह करावा. परंतु विश्वसमान्य दाखवूं नये आणि कृतकार्य झाल्या बरोबर स्नेहापासून निवृत्त व्हावें. तसेंच आपत्कालांत शत्रूशीं मित्रभावानें वागून काल हरण करावा, परंतु सर्पयुक्त गृहांत असल्यासारखें उद्विग्नपणानें असावें. तसेंच ज्या रीतीनें शत्रूच्या बुद्धीचा पराभव होईल असें पूर्वीचें शनि

हास्यादिकांनीं त्याचें सांत्वन करावें त्यांत तो मूर्ख असला तर पुढें होणारी भीति दाखवून व ज्ञाता असला तर हें माझें उत्पन्न तुम्हीं घ्यावें इत्यादि लोभ दाखवून समाधान करावें. यानेंहि तो समाधान पावत नाहीं तर निदान आपलें दैन्यहि दाखवावें म्हणजे पुरे. आणि आपला उदयकाल प्राप्त झाला म्हणजे पाषाणावर मृन्मय घट आपटून भग्न केल्यासारखा त्याचा तत्काल भेद करावा. ज्यास बहुत अर्थ संपादन करून घेणें असेल त्याणें कृतघ्नाशीं संबंध ठेवूं नये. आणि कदाचित् त्यापासूनच कार्य होणें असेल, तर कार्यापुरता त्याच्याशीं संबंध करून कृत कार्य झाल्यावर त्याचा धिक्कार करावा. तस्मात् कोणतेंहि कार्य झालें असतां तें किंचित् अवशेष ठेवून करावें. आणि वराहाचा गुण मूल खनन करणें तसा राजानें शत्रूंचा समूल नाश करावा. मेरूचा गुण अचंचलत्व व ज्याचें कोणाच्यानें उल्लंघन होत नाहीं तसें राजानें धैर्य सोडून चंचल होऊं नये आणि शत्रूंस दाद देऊं नये; राजास अधिक द्रव्य प्राप्ती इष्ट असावी. नटाची अनेक सोंगें घेऊन लोकांचीं मनोरंजनें करणें तसेंच प्रसन्नपणानें राजानें प्रजांचें रंजन करावें; भक्तिनें मित्रत्व संपादन करणारास स्वराज्याचा उदय जसा इष्ट असतो तसा प्रजांचा उत्कर्ष राजास इष्ट असावा आणि राजानें वारंवार शत्रूंच्या गृहीं जाऊन त्यांचें आरोग्य चिंतन करून कुशल प्रश्न करीत असावें. कारण आळशी, दुर्बल, अभिमानी, लोकांत अपवाद होईल कीं काय म्हणोन भीणारा. व दुसऱ्याची प्रतीक्षा करणारा यास अर्थ प्राप्ती होणार नाहीं. यास्तव आपलें छिद्र शत्रूंस न कळूं देतां त्यांचें मात्र आपण जाणावें आपलीं सर्व अंगें कूर्मासारखीं गुप्त ठेवून बकपक्ष्यासारखें अन्यापासून अर्थ संपादनाचें चिंतन करावें, सिंहासारखा पराक्रम, लांडग्यासारखी लूट असावी व बाणासारखें शत्रूवर जाऊन पडावें. तसेंच राजानें मद्यपान, द्यूत, स्त्री, मृगया व गीतवाद्यादि यांचें समय विशेषें करून युक्तीनें सेवन करावें, सर्वदां जर प्रसंग करील तर, दोषवान् होईल. तसेंच राजास धरणें आलें असतां त्यानें धनुष्य तृणानें अच्छादन करून शयन क-

रणें झालें तर मृगासारखें सावधपणानें करावें. आणि अंधकारांत अंधासारखें वागावें. अशा रीतीनें आपलें संरक्षण करून देशकाला नुरूप पराक्रम करावा. आणि दंडानेंच शत्रु वश होईल हें न जाणून जर त्यास दंड न करील तर स्वेच्छाच्या गर्भवानें उदर भेद होऊन थोडी जशी मरण पावते तसा त्यास मृत्यु प्राप्त होईल. या करितां जों कालपर्यंत शत्रूंचें भय प्राप्त झालें नाहीं तों पर्यंत भिऊनच असावें आणि शत्रु चालून आल्या बरोबर निर्भय होऊन तत्काल त्याचा संहार करावा. परंतु जो संशयाचा त्याग करून कोणत्याहि कार्यास प्रवृत्त होतो, तो बहुत कल्याण पावतो. ज्याचा संशय गेला नाहीं, तो मायशः जीवंत राहणें व कदाचित मग कल्याण होण्याचें तर दूरच आहे. कदाचित् शत्रु भयापासून निवृत्त झाला असतां भय गेलें असें समजून स्वस्थ बसूं नये. कारण पुनः त्याची वृद्धी होईल; म्हणोन न निवृत्त झाल्या सारखेंच समजावें. प्राप्त झालेल्या सुखाचा त्याग करून पुढें होईल म्हणोन आशा करणें हें बुद्धिमानाचें लक्षण नव्हे. ज्या कर्मानें विपत्ती रूप संकटांतून मुक्त होईल. तें कर्म मृदु असो किंवा भयंकर असो त्यांतून मुक्त झाल्या नंतर धर्माचरण करावें. आणि राजानें जे, शत्रु व शत्रु, त्यांस अनेक उपायानीं वश करावें व आपल्या चारांस शत्रूनीं ताडित केलेले जाणून पुनः त्यांस न विदित होण्या सारखें चारांस वेषांतरानें देशांतरास व स्वदेशांत पाठवावें. तें असें कीं, नास्तिक मतांचे जैन व तापशी अशा वेषानें ते, बागबगीचे, विहार स्थानें पाणपोई, ठिकठिकाणीं धर्मशाला वगैरे, पान करण्याचीं स्थानें, साहजीक प्रवेश करण्याचीं गृहादि स्थानें, तीर्थे, सोमव सभा स्थानें अशा ठिकाणीं संचार करून गुप्त रीतीनें परराष्ट्रांतील वर्तमानें समजून आपण सकृतीस असें करावें. आणि परराष्ट्रांतील जे धर्म नाश करणारे व लोकांत चोर्यादि उपद्रव करणारे असे पापी लोक आहेत असतां त्यांस दमन करून लोकांतील उपद्रव शांत करावा. परीक्षा केल्याशिवाय एकाएकीं कोणावर विश्वास ठेऊं नये कारण विश्वासानें भय प्राप्त होऊन समूलनाश होतो. या करितां नाश करण्या करितां मात्र त्यांच्याशीं विश्वासानें वागावें.

परंतु त्यांची किंचित् विपरीत वागणूक पाहिल्या बरोबर तेंच निमित्त देऊन त्यांचा संहार करावा. तसाच बाह्य दृष्टीनें शंका करण्याजोगा नाहीं असें असलें तरी हि शंकित असावें. मग जो शंकित आहे त्याचे ठिकाणीं तरशं कित असणें हें काय सांगावें. जर कोठेंच मनांत शंका न आणील तर तो सा यशः समूल नाश पावेल यास्तव सावधपणा, मौन, काषाय वस्त्र, जटा व चर्म यांचें धारण करून द्वेष्याला विश्वास दाखवून नाहिंसा करावा. आणि अर्थ प्राप्तीस विघ्न करणारा पुत्र असो, अथवा भ्राता किंवा पिता व स्नेहत् हि असो त्यांचा सर्वदा संहार करून ऐश्वर्य संरक्षण करावें किंब हुना जरी गुरु गर्विष्ठपणानें कार्याकार्य न जाणून दुर्मार्गी प्रवृत्त झाला तर त्या सहि दंडें करून शासन करावें मग इतरांची कथा काय? यास्तव अभ्युत्थान, नमस्कार व द्रव्यादिदान अशा मृदु उपायानीं तीक्ष्ण मुख पक्षी जसा पुष्प फलांचा नाश करतो, तसा शत्रूच्या पुरुषार्थ साधनाचा नाश करावा. आणि कोणाचा मर्मभेद, भयंकर कर्म व मत्स्यघात करणाऱ्या सारखा को णाचा घात हे न केले असतां अपार संपत्ती प्राप्त होईल. आतां शत्रु किंवा मित्र हा मूल जातीनेंच असतो असें नाहीं. प्रसंगोपात्त सामर्थ्य योगानें शत्रु व मित्र असे होतात. त्यांत शत्रु हस्तगत झाल्यावर तो बहु करुणा स्वरानें तरुणोपाय करूं पाहील तर त्यास मारण्या विषयीं दुःख न करितां हननच करावें कारण शत्रुला प्रिय भाषण करीत असून प्रहार करावा आणि शिक्षा झाल्या नंतर हि मधुर बोलण्यानें समाधान करावें. तसेंच खड्गानें शिरच्छेद केल्यावर शोक व रोदन हि करावें. तसेंच अपराधि जनास क्षमा केल्या सारखें दाखवून सामोपचारानें बोलावून अपून शिक्षा करावी. आणि आपलें ऐश्वर्य प्रद्विंगत करावें. कांहीं लाभा वांचून कोणाशीं वैर करूं नये. पोहतां येतें म्हणोन एकाएकीं भरलेल्या नदींत उडी टाकूं नये. शत्रूचा वृषभ आहे म्हणोन त्याच्या शृंगाचें चर्वण करावें कीं काय? केलें असतां त्यापासून रस प्राप्ती न होतां दुःख मात्र हो तें. राजास तीन पीडा असाव्या त्या अशा कीं, धर्में करून अर्थास व्यय रूप पी डा, अर्थानें धर्मास पीडा आणि कामें करून धर्मार्थास पीडा म्हणजे सर्वदा

धर्मार्थाचीच इच्छा असणें, या पासून कोणतें फल? धर्म केल्यानें चित्तशु- द्धि, अर्थानें यज्ञादि सत्कर्म व कामानें म्हणजे या उभयतांची इच्छा असून आचरण केलें असतां परलोक प्राप्ती होत्ये यास्तव बलाबल पाहून वागावें आणि ज्या योगानें दुःख होतें; त्या पीडेचा त्याग करावा. तसेंच ऋणशेष, अग्निशेष व शत्रुशेष हे वारंवार वृद्धिंगत होतात यास्तव त्यांचे शेष ठेवूं नये. तसेंच मनुष्यांच्या वधानें, मार्ग रोधानें व गृहादिकांच्या नाशानें परराष्ट्र जिंकावें. गृध्र पक्ष्यां सारखी दूर दृष्टी. बक पक्षां सारखें निश्चल, श्वाना सारखें जागृत, सिंहा सारखा पराक्रम व निर्भयपणा, काक पक्ष्यां सारखें शत्रूचें मनोगत जाणण्याविषयीं शंकित आणि भुजंगा सारखें शत्रूनीं केलल्या दुर्गादिकांत अकस्मात् प्रवेश करणें अशा रीतीनें असून परराज्य जिंकावें. तसेंच आपल्यापेक्षां वरिष्ठ शूर असला तर त्यास हस्त जोडून भीणा त्यास भेद करून, लोभ्यास द्रव्यदानें करून व बरोबरीच्यास युद्ध करून पराजित करावें. आणि आपल्याकडील एका कार्यावर योजिलेले जे अनेक लोक त्यांतील जो मुख्य अधिकारी त्यास बहूत क्लेशानें व मित्रजनास विनयानें जे शत्रूकडील लोक वश करूं पाहातील किंवा भेद अथवा घात करण्यास प्रवृत्त होतील तरत्यापासून स्वकीय प्रधानादि लोकांचें संरक्षण करील असावें. राजा सर्वकाल मृदु असला तर सर्व लोक अमर्यादा करूं लागतात व तीक्ष्ण असला तर फारच खिन्न होऊन असतात यास्तव तीक्ष्णत्वाचा प्रसंग असला असतां तीक्ष्णत्व व मृदु काल्यांत मृदुत्व धारण करून असावें. आणि जर सर्वदां मृदुपणानेंच सौम्य व भयंकर कर्में होत असल्यास तसेंच असावें. नाहींतर प्रसंगोपात अत्यंत क्रूरत्वहि धारण करून शत्रुजयादि अनेक कृत्यें संपादन करील असावें. आणि ज्ञान संपन्नांशीं विरुद्ध असून मी दूर आहें मा झें हा काय करील? असें समजून आविश्वास करूं नये. कारण कोणत्या वेळेस नाश करतील हें समजण्यांत येणार नाहीं. तसेंच ज्याच्या पार- जाणें होत नाहीं त्याच्या तरण्याचा यत्न करूं नये. ज्याचें दुसरा कोणी हर ण करील तें हरण करूं नये. ज्याचें मूळ करून खनन होत नाहीं तें खणूं

नये. तसेंच ज्याचें रक्षण करण्यास कोणी नाहीं. त्यास मारूं नये. अशा रीतीनें आपत्काल प्राप्त झाला असतां मार्ग वागावें. केवल सर्वदांच या पूर्वोक्त धर्मा प्रमाणें पुरुषानें वागूं नये. कदाचित् शत्रूनें हल्ला केला असतां मीं. सांगितलेल्या धर्मावर बुद्धी ठेवावी कारण आपत्कालीं या रीतीनें आचरण केलें असतां कांहीं अधर्म होणार नाहीं. हें तुझ्या हितास्तव मी कथन केलें आहे. नंतर तो हितार्थी रूवीर शत्रुंजय राजा त्या प्रमाणें आचरण करूं लागला. तेणेंकरून त्यास बहुत संपत्ती प्राप्त झाली. मग तो स्वकीय बांधवांसहित रूरवानें राज्यानुभव करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

११. अध्याय अकरावा.—युधिष्ठिर प्रश्न करितात. हे धर्मराजा, उत्तम धर्म नष्ट होऊन मोह व भय यानीं कर्म मार्गापासून सर्व भ्रष्ट, कपटानें परस्पर घात व वंचना, सर्व देशांत अनावृष्टि होऊन परस्पर भेदकरणें, गृहादिकांस प्रज्वलित करणें, व ब्राम्हणास अत्यंत पीडा, असा महाविपत्काल प्राप्त झाला असतां राजा ब्राम्हणांचें रूध्दां रक्षणा करण्यास समर्थ नाहीं असें झाल्यावर ब्राह्मणानीं कसें जीवन करावें आणि अशा संकट समयांत राजानें तरी कसें वागावें? हें सांगा. भीष्म म्हणतात. हे महाबाहो, योगक्षेम, यथा कालीं पर्जन्य वृष्टि, प्रजांस आधि व्याधि, मरण, भय व कृत, त्रेता, द्वापार आणि कलियुगांची प्रवृत्ति हें सर्व राज मूलकच आहे. कदाचित् राजदोषानें प्रजांस दुःरव कारक असा काल प्राप्त झाला तर विशेष ज्ञान बलाश्रयानें कसें तरी जीवन करून कालातिक्रमण करावें. या विषयीं विश्वामित्र व चांडाल यांचा संवाद सांगतों. पूर्वी त्रेता द्वापार युग संधींत दैव योगानें द्वादशवर्षपर्यंत अनावृष्टि झाली. त्या कालीं नद्या, सरोवरें, इत्यादि उदक रहित झालीं. या मुळें कोठेंहि यज्ञ, स्वाध्यायादि हे मंगल शब्द नाहींसे झाले. तसेंच कृषि कर्मादि नष्ट झाल्यामुळें वृषभादिकांचें कोणी रक्षण करीनासे झाले. आणि क्रय विक्रयादि व्यापार, यज्ञ संभार व महोत्सवादि मंगल कार्येंहीं सर्वथा नष्ट झालीं. आणि पृथ्वीवर कांहीं देश, नगर, ग्राम व निवास स्थानें राजे व प्रजा वसर्वपयत्न्नकून

अस्थिंच्या रात्री पडल्या आणि भूत पिशाच्या दिकांचे शब्द होऊं लागले. अशा रीतीनें पृथिवीवर धर्मक्षय होऊन महा भयंकर काल प्राप्त झाला असतां सर्व मनुष्यें अत्यंत क्षुधातूर होऊन परस्परांस भक्षण करूं लागलीं. त्या समयीं विश्वामित्र स्त्रिपुत्रादिकांचा त्याग करून क्षुधातुर झाल्यामुळें भक्ष्याभक्ष्य विचार न करितां त्यानीं कोणी एक चांडालाचें स्थान पाहिलें तें असें कीं, वराह गर्दभादिकांच्या अस्थि शकलानीं युक्त, व गर्दभ, कोंबडीं श्वान समुदायानीं आवृत अशा ठिकाणीं विश्वामित्रानीं प्रवेश करून मांस, अन्न, फल, मूल व कांहिंतरी आहारार्थ प्राप्त व्हावें ह्मणून शोक केला व भिक्षाहि मागितली; परंतु कांहींच न मिळाल्यामुळें ते अत्यंत चिंताक्रांत होऊन कायहो मला संकट प्राप्त झालें, असें म्हणत त्या चांडाल गृहासन्निध ग्लानी येऊन मूर्छित झाले! नंतर किंचित् सावध होऊन असा विचार करूं लागले कीं, अशा समयांत मृत्युहि प्राप्त होत नाहीं काय करावें. असें जों म्हणतात तों तेथें नुकतीच छेदन केलेली श्वानजंघा ( पोटरी ) पडलेली पाहून एवढी चोरावी. या वांचून प्राणधारणार्थ दुसरा उपाय नाहीं. कारण आपत्कालीं ब्राम्हणानें प्राण रक्षणार्थ चांडाल प्रतिग्रह केल्यापेक्षां चौर्यकर्म करावें हें उत्तम. असा निश्चय करून तो चांडाल, रात्रौ निजला असतां, त्याच्या गृहांत प्रवेश करून ती जंघा हरण करतात तों इतक्यांत चांडाल जागृत होऊन बोलला कीं, मी निजलों असें समजून कोण माझ्या गृहांत शिरला? असें ऐकतांच विश्वामित्र भयभीत होऊन बोलले हे सद्बुद्धे, मी विश्वामित्र, क्षुधित होऊन तुझे गृहीं आलों. माझा वध करूं नको. हें ऐकतांच तो चांडाल, शयनावरून उठून तत्काल विश्वामित्रापाशीं आला आणि नेत्रांतून अश्रुपात करीत हस्त जोडून प्रार्थना करितो कीं, हे ब्रह्मन् अशा रात्रींत या नीच स्थानीं आपण कशास्तव येणें केलें? विश्वामित्र म्हणतात हे बापा, माझे प्राण क्षुधेनें व्याकुल झाल्यामुळें ज्ञान, बल, संज्ञा, भक्षाभक्ष व धर्माधर्म हे सर्वही नष्ट झाले. कारण, क्षुधित झालेला आणि हा निर्लज्ज होऊन अनेक पापकर्मांस प्रवृत्त होतो. तसा मी भिक्षार्थ संचार करीत अ

सतां कांहींच कोठें मिळेना तेव्हां या पाप कर्मास प्रवृत्त होऊन तुझ्याघ
रीं आलों आणि श्वानजंघा हरण करूं लागलों. जसा अग्नि हा सर्वभ
क्ष, व बृहस्पति उपाध्याय पवित्रान्नच भक्षण करणारा, त्यास मी भागदे
ऊन नंतर ग्रहण करीन आणि जसा ब्रम्हदेवहि सर्व भक्ष असून निर्दो
षी आहे तत्तुल्य मीही ब्राम्हण, सर्व भक्ष होईन. चांडाल म्हणतो हे
महर्षे, ज्या रीतीनें तुमचा धर्म भ्रष्ट न होईल त्या रीतीनें तुम्हीं वर्तावें.
तो धर्म मी तुम्हांस सांगावा असें नाहीं; परंतु असें आहे कीं, कोल्ह्यापेक्षां
श्वाननीच व त्याच्या पूर्वांगापेक्षां पश्चिमांग नीच त्यांत त्याची जंघाही
अत्यंत नीच ती ही चांडाल गृहांतील तर सर्वथा अग्राह्य असें असून
तुह्मीं या कर्मास प्रवृत्त झाला आहां? तस्मात् हें तुम्हांस योग्य नव्हे
याहून प्राणधारणार्थ दुसरा कांहीं तरी उपाय करावा. धर्मात्म्यांत तुह्मीं
श्रेष्ट असून विहित धर्म जाणत असतां केवल मांस लोभानें तपश्चर्ये-
चा नाश करूं नये कां कीं, तुम्हां साररव्या श्रेष्ठानीं असें केलें असतां सर्व
लोकांत धर्मसंकर होईल. असें ऐकून विश्वामित्र बोलतात अरे, मी ब
हुत काल पर्यंत उपोषित असून सर्व देशांत संचार करीत प्राणधारणा
र्थ अनेक उपाय करून पाहिले परंतु कोणत्याच यत्नानें जीवन होण्या
स मार्ग नाहीं. तेव्हां या कर्मास प्रवृत्त झालों. तस्मात् सर्वथा प्राणहानि
होत असल्यास कोणत्याहि कर्मानें तरी प्राण वांचवावे. नंतर जेव्हां वि-
पत्काल अतिक्रांत होईल तेव्हां संमृध्दिमान झाल्यावर पुनः धर्मआ
चरण करून पूर्व स्थितीवर यावें. क्षत्रियांचा धर्म प्रजापालन, ब्राह्म-
णाचा अग्निसाररवा सर्व भक्षरूप धर्म, तस्मात् माझे ठिकाणीं ब्राम्ह-
ण व अग्नि यांचें सामर्थ्य आहे. यास्तव अभक्ष भक्षण करून क्षुधा,
शांत करतों. ज्या रीतीनें जीवन होईल त्या रीतीनें केलें पाहिजे. या
करितां जीवनार्थ मी अभक्ष भक्षण रूप पाप कर्म करून स्वशरीरास
बलवान् करीन. नंतर तप सामर्थ्यानें सर्व पापाचें दहन करीन. तस्मा
त् या कृत्यास तुझें अनुमोदन असावें. चांडाल म्हणतो ही श्वान
जंघा अमृत तुल्य आहे असें नाहीं व आयुर्वृद्धि ही करणारी नाहीं.

आणि ब्राम्हणास तर श्वान, सर्वथा अभक्ष्य आहे. पंचनखांचे पंचमा
णी ससा, साळ, घोरपड, कूर्म व गेंडा हे मात्र ब्राम्हण, क्षत्रिय व वै
श्य यानीं भक्षण करण्यास योग्य असें शास्त्र आहे यास्तव या अभ
क्ष्याचे ठिकाणीं मन न ठेवितां भिक्षान्नदानानें निर्वाह करावा. विश्वामित्र म्ह
णतात. सर्वत्र दुर्भिक्ष झाल्यामुळें हें श्वान मांसच षड्रस तुल्य आहे.
पूर्वी अगस्त्य ऋषीनें क्षुधार्त्त होऊन वातापि नामक असुराचें भक्ष
ण केलें. हाच शिष्टाचार आम्हांस प्रमाण आहे. चांडाल म्हणतो. त्या
वातापीनें सहस्त्रशः ब्राम्हण भक्षण केले यास्तव अगस्त्यानें ब्राह्मणां
च्या रक्षणार्थ त्या दैत्याचा नाश तन्नाश रीतीनें व्हावा म्हणून दैत्यभक्ष
णरूप पाप केलें असून तो ब्राम्हण रक्षणरूप धर्म झाला. परंतु केवल
स्वरक्षणार्थ पापाचरण करून तुम्हां सारख्या विद्वानानीं जीवन पा
वावें हें योग्य नव्हे. या पेक्षांमरण आलेलें बहुत उत्तम आहे. विश्वा-
मित्र म्हणतात. तूं म्हणतोस हें सत्य आहे परंतु सर्व धर्माचें व ज्ञाना
चें मूल कारण हें शरीर असून त्याचें रक्षण न केलें असतां तें विकल हो
ऊन धर्मास विरोध येईल यास्तव दुर्मार्गानें ही शरीर रक्षण केलें पाहिजे.
श्वान भक्षणानें केवल तुझ्या सारखा चांडाल होईन असें नाहीं. जसे
मेंडुक शब्द करीत असतां गायी उदकपान करीतच असतात तसा
तूं धर्मविषयीं अनधिकारी असून आत्म प्रशंसारूप बडबड करूं
लागलास तरी मला जें कर्तव्य तें मीं करीन. चांडाल म्हणतो. तुम्हांपासू
न लोभानें पाप न घडतां श्रेय व्हावें यास्तव मी कृतज्ज्ञ ना सारखा तुम्हां शीं भा
षण करितों. हें मांस तुम्ही हरण करीत असतां मी जर अनुमोदन दे
ईन तर मी दाता व तुम्हीं प्रतिग्रह करणारे हे उभयतांही पापलो
काधिकारी होऊं. विश्वामित्र म्हणतात. हिंसा व अनृत भाषण यासा
रखें अभक्ष भक्षण करून प्राण संरक्षण करणें हें निंद्य आहे असें ना
हीं. व सुरापान केल्यानें जसा ब्राम्हण्य धर्म हानि होऊन पतितत्वप्रा
प्त होतें तसें अभक्ष भक्षणानें प्रायश्चित्तें करून निवृत्त न होणारी अ
शी ब्राम्हण्य धर्म हानि न होतां पूर्व कृत पुण्य हानि होऊन किंचित

पापप्राप्त होतें असें शास्त्र आहे. चांडाल म्हणतो. मी अनेक हेतुनीं निषेध करीत असतां तुम्ही विद्वान असून अशा नीच चांडाल गृहांतून चौर्य कर्मानें कुपणा सारखें बलात्कारें करून श्वानमांस हरण करतां याचा दंड तुम्हासच भोगावा लागेल. भीष्म म्हणतात. हे युधिष्ठिरा, अशा रीतीनें तो चांडाल, विश्वामित्राशीं भाषण करून गेला. नंतर विश्वामित्रानीं ती जंघा हरण केली आणि तें मांस पक्व केलें. आणि त्याचे पंचम हा विधि क्रमानें करून इंद्रादि देवांस भाग ग्रहणार्थ आवाहन केलें तों इंद्रानें पर्जन्य वृष्टि करून सर्व लोकांचें व औषधि वनस्पतीचें संजीवन केलें. नंतर विश्वामित्रऋषि ही, तप सामर्थ्यानें पाप दग्ध होऊन सिद्धि पावले. त्यानीं तें मांस हरणरूप पाप कर्म केलें असून त्याचें भक्षणही न करितां देव व पितरांस संतुष्ट केलें. अशा रीतीनें विद्वान व श्रीमान असून त्यास ही जीवनाचें संकट प्राप्त झालें असतां त्यानीं अनेक उपायानीं आपलें व सर्व लोकांचें ही दैन्य परिहार केलें. तस्मात हे कौंतेया, असा विपत्काल प्राप्त झाला असतां विद्वानानें अशा बुद्धीनें वर्त्तणूक करून काल हरण करावें. असा विषय या अध्यायांत आहे.

७२. अध्याय बारावा.— युधिष्ठिर म्हणतात हे पितामहा, प्रेत्तानीं ही असें घोर कर्म करावें म्हणून आपण उपदेश केला परंतु यावर माझी अश्रद्धा होऊन हें मला सत्य वाटत नाहीं. मी अत्यंत मोह व खेद पावलों. आतां मीं आपलें कितीहि सांतवन केलें तरीही हें धर्माचरण करण्या विषयीं मी समर्थ होणार नाहीं. भीष्म ह्मणतात हे राजा हे धर्म वेदांतील श्रवण करून केवल अपि होत्रासारखें नित्य विधि पूर्वक अवश्यक आचरण करावें म्हणून तुला या धर्माचा मीं उपदेश केला असें नाहीं. तर, अकार्य करण्यानें बहूत दोष आहेत असें जाणणाऱ्या ज्ञात्यानीं विषम कालांत या शिवाय निर्वाह नाहीं म्हणून बुद्धिपूर्वक धर्मत्याग करावा. अशीं मधुर वाक्यें वर्णिलीं आहेत तीं तुला मीं सांगीतलीं असें असून हें तूं न जाणतां एक देशी धर्मावर प्राप्त होणाऱ्या बुद्धीचा म-

हत्ती आहे हें योग्य नव्हे. तस्मात् कालानुसार बुद्धि धारण करणें हा धर्मव श्रेष्ठांचा आचार हे दोन्हीं जाणावे. तसेंच बुद्धिश्रेष्ठ जे राजे, तेच जय संपादन करणारे होतात. यास्तव राजानें जसजसा समय प्राप्त होईल त्यात्या समयीं बुद्धीने धर्माधर्म विचार करीत असावा. केवल एकदेशी अध्ययन करणारे दुर्बलांला स्वबुद्धी कोठून असेल एकच कर्म केलें असतां त्यांत कदाचित् धर्म व कदाचित् अधर्म होतो. असे द्विविध मार्ग आहेत त्यांत जो एकच मार्ग जाणणारा, त्यास संशय प्राप्त होतो. तो असा कीं, अहिंसारूपधर्म आचरण करण्यापेक्षां चोरास शिक्षा करावी तर हिंसारूप अधर्म होईल आणि रक्षण करावें तर देशांत चौर्य कर्म प्रवृत्त होऊन पाप लागेल. यास्तव पूर्वीपासून अनेक धर्मयुक्त बुद्धी जर असतील तर त्यास कोणत्याहि प्रसंगीं संकट प्राप्त होणार नाहीं. स्वज्ञ राजानें विपत्काल प्राप्त झाला तर प्रजेचेंहि रक्षण करून आपलेंहि रक्षण करावें असें करणाऱ्या राजास साधू योग्य म्हणतात. आतां सज्जनानीं आचरण केलेल्या विहित धर्मास राक्षसा सारखा कपटानें जे उपहास करितात त्यांचें वाक्य श्रेष्ठानीं सर्वथा ग्रहण करण्यास अयोग्य होय. याविषयीं बृहस्पतीपासून श्रवण केलेलें ज्ञान स्वतः इंद्रानें सर्व देवांस सांगीतलें आहे कीं, ज्यांचा केवल वाणीनें व बुद्धीच्या तर्कानेंहि धर्म वाक्यावर निश्चय नाहीं. मग, त्यांच्यानें त्यांचें प्रतिपादन करणें तर दुरापास्त आहे. तस्मात् कोणत्याहि वचनाची प्रवृत्ति निष्कारण आहे असें नाहीं. यासउदाहरण असें कीं, शस्त्रधारी ब्राम्हण वध करावा. व कामें करून ब्रह्मवध केला असतां त्यास प्रायश्चित नाहीं. असें विरुद्ध वाक्यहि निष्कारण नव्हे. कसें? आपल्यास मारण्या करितां गाय जर आली तर तीपासून आपलें मात्र रक्षण करावें. तिला कोणीं मारावें असें नाहीं. तसें ब्राम्हणापासून आपल्यास वांचवावें. केवल त्याचा वध करूंनये. अशी वाक्याची युक्तीनें व्यवस्था करावी. तस्मात् सर्वहि वाक्यें सकारणच असतात असें जाणावें. या लोकीं जेजे धर्म प्रवर्त्तक आहेत तेते लोक निर्वाहार्थ धर्म सांगतात. त्यांत चोरादिकांचा वध केल्याशिवाय धर्म प्रवृत्ति होणार.

नाहीं हें अर्थसिद्ध आहे. यास्तव हिंसाही अवश्य केली पाहिजे तत्प्र-
युक्त दोष नाहीं. असा त्यांचा अभिप्राय सुज्ञानें जाणावा. यास्तव अम-
र्षादि दोषरहित यथार्थ शास्त्रज्ञाता असेल तर त्यानें सभेंत भाषण क
रावें. आणि वेदशास्त्रास अनुकूल असें तर्कयुक्त वचन जर असेल तरतें
ही विद्वज्जनांत प्रशस्त होतें. अथवा, तर्कहीन असून समयास न जाण
लेल्या अर्थाचें ज्ञापक जें वाक्य, त्यास ही ज्ञानी, फार उत्तम असें मा-
नितात. व अन्य कोणी म्हणेल कीं, अशा युक्तीनें या शास्त्रास दूषण
येतें तस्मात् हें शास्त्र व्यर्थ आहे. असें म्हणणे तरी अज्ञानच होय, का
रण, युक्तीनें शास्त्रास व शास्त्रानें युक्तीस बाध न येतां उभय संमत जें
वाक्य तेंच अवलंबन करावें. असें संशय छेदक वाक्य शुक्राचार्यांनीं पूर्वी
दैत्यांस सांगितलें. यास्तव, हे धर्मा, संशययुक्त ज्ञानाचा त्याग करूनज्या
योगानें संशय दूर होईल अशा निःसंशय ज्ञानाचा आश्रय कर. कारण,
तूं हिंसारूप कर्म करण्यास क्षत्रियांत उत्पन्न झाला असून माझें नीति
युक्त वाक्य गृहण करीत नाहींस हें योग्य नव्हे. हे धर्मा, स्वहित न जाण
णाऱ्या राजांस स्वर्गलोकांत पाठविलें हें केवल मीं स्वार्थरूप कर्म केलें
असें नाहीं. तर परोपकारार्थच केलें असून अज्ञजन, हा हिंसा करणारा
आहे अशी माझी निंदा करितात. तथापि ज्या योगानें लोक सर्व संक
टांतून मुक्त होतील आणि ऐश्वर्य इच्छा करणारांस ऐश्वर्य प्राप्त होई
ल हें जसें मीं करीत आहे तसें तूं ही उग्र कर्मे करून प्रजांचें हित कर
ण्या करितां शासन कर. कारण, ब्रम्हदेवानीं अज १ बोकड १, अश्व रा
जा हे तिन्ही ही समान निर्माण केले. ते असे कीं, अजास स्वर्ग प्राप्तिरूप
हितार्थच यज्ञामध्यें नेतात व राजा आणि अश्व हे ही स्वर्ग प्राप्ती क
रितांच संग्रामार्थ नेतात. तस्मात् हें हिंसारूप उग्र कर्म असून हित
कारक आहे. तशाच रीतीनें सर्व भूत मात्रांस वारंवार कांहीं कांहीं प्र-
संग विपरीत दिसत असून वस्तुतः हितकारकच आहेत ते सूक्ष्मरी-
तीनें पाहिले असतां शास्त्रांत प्रसिद्ध आहेत. तसेंच अवध्याचा वध
करणे व वध्य असून न वध करणे हा महान दोष आहे. अशा रीतीनें

मर्यादा पालन करावी. तस्मात् राजानें उग्रत्वें करून प्रजा धर्माचे ठिकाणीं स्थापन कराव्या. नाहीं तर अधर्म प्रवृत्त होऊन सर्वही परस्पर हकासारखे भक्षण करीत नाश पावतील. ज्या राज्यांत मत्स्यांस भक्षण करणाऱ्या बकपक्ष्यां सारखे चोर, प्रजांचें द्रव्य हरण करीत विहार करितात तो राजा, क्षत्रिय कुलक्षय करणारानीच होय. यास्तव हे राजा, कुलीन व वेद विद्या जाणणारे असे प्रधान योजून प्रजांचें धर्मानें पालन कर. जो राजा, अन्यायानें प्रजां पासून षड् भाग द्रव्य, ग्रहण करितो तो केवल क्षत्रियांत नपूंसक जाणावा. या करितां अति उग्र व अति मृदु नसून समय विशेषानें दोन्ही ही धारण करीत धर्मानें वागावें. दुष्ट निग्रह व शिष्ट पालन करावें. असें शुक्राचार्यानें वाक्य आहे. युधिष्ठिर प्रश्न करतात हे पितामह, जिचें कोणीं उल्लंघन करीत नाहीं अशी मर्यादा कोणती? भीष्म म्हणतात. ब्राम्हणांवांचून इतरांस मात्र दंड आहे. यास्तव शास्त्रोक्त रीतीनें वर्तणूक करणारे, पवित्र अशा विद्या तपो वृद्ध ब्राम्हणांची पूजा सत्कार पूर्वक सेवा करावी हें उत्तम. आणि देवतांचे ठिकाणीं जी तुझी वृत्ति आहे तीच सर्वदां ब्राम्हणांचे ठिकाणीं असावी. कदाचित आपण अन्याय न करितां ब्राम्हणानीं कोप केला असून जर प्रीतीनें सहन करशील, तर उभय लोकीं तुझी कीर्ती होईल. न सहन केल्यास महद्भय प्राप्त होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१३. अध्याय तेरावा:— युधिष्ठिर प्रश्न करितात हे पितामहा, शरणांगताचें संरक्षण करणाराचा कोणता धर्म, तो सांगावा. भीष्म म्हणतात. हे महाराजा, असा प्रश्न करण्यास तूं योग्य आहेस. कारण, शरणांगत परिपालन करणें हा महान् धर्म आहे. पूर्वी शिबि प्रभृति राजे शरणांगत पालनानेंच उत्तम गति पावले. आणि असें ऐकिलें कीं, कोणी एका कपोत पक्ष्यानें शरणांगत स्व शत्रू सही, स्वकीय मांस देऊन पूजित केलें. युधिष्ठिर प्रश्न करितात कीं, कपोत, स्वमांस समर्पणानें कोणत्या गतीस गेला? भीष्म म्हणतात. हे राजा, या विषयीं पूर्वी मुचुकुंद राजानें भार्गव ऋषीस नमस्कार पूर्वक प्रश्न केला. त्या काळीं भार्गव ऋषि,

सांगतात. हे महाबाहो, कोणी एक अरण्यांत पक्षिघातक, महानीच, पृथिवीवर कालासारखा संचार करणारा लुब्धक होता. त्याचा घोर कर्मांमुळें बांधवानीं त्याग केला. असा तो लुब्धक, जाळ्यांत पक्षी धरून त्यांचा विक्रय करीत अरण्यांत निर्वाह करीत असतां तो भार्येसहित दैवयोगानें अशा वृत्तींत वागत असून वनांत संचार करीत असतांअकस्मात् भयंकर वायुनें आसमंतात भागीं वृक्षांचें उन्मूलन होऊं लागलें. आणि विद्युल्लतेसहित मेघमंडळानीं आकाश व्याप्त होऊन अतिशय पर्जन्यवृष्टि झाल्यामुळें क्षणमात्रांत सर्व पृथिवी उदकमय झाली तेव्हां तो लुब्धक अत्यंत भ्रांत व व्याकुल होऊन शीतानें होत्साता मार्गभ्रष्ट झाला. महावायु व अति वृष्टीनें सर्व अरण्यांतील प्राणि कांहीं मरण पावले, कांहीं भयार्त व क्षुधार्त होऊन श्वासयुक्त इतस्ततः भ्रमूं लागले. अशा समयांत तो लुब्धक शीतानें कंपायमान होत असून त्यानें एक कपोती शीतार्त झालेली भूमीवर पडलेली पाहिली आणि तिला तो पिंजऱ्यांत घालून संचार करूं लागला. तों अनेक वृक्षसमुदायांत, एक मोठा वृक्ष होता, तो ब्रह्मदेवानीं प्राणीमात्रांस आश्रयभूत असा निर्माण केलेला त्यानें पाहिला. इतक्यांत निर्मल, नक्षत्र गणानीं युक्त झालेलें असें त्या लुब्धकानें आकाश व सर्व दिशाही पाहिल्या तोंअत्यंत गाढ रात्र झाली अशी पाहून तो म्हणतो कीं, एथून माझा देशांतर बहुत दूर आहे. तस्मात् या वृक्षाखालीं आज रात्रीं वास करावा. असा निश्चय करून त्या वृक्षास हस्त जोडून प्रार्थना करितो कीं, हे वनस्पते, सर्व देवता तुझे ठिकाणीं वास करितात. यास्तव मी तुला शरण आलों आहें. असें म्हणून त्यानें पर्णशय्या केली आणि शीलेवर मस्तक ठेवून परम दुःखानें शयन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१४. अध्याय चवदावा.— भीष्म म्हणतात. हे धर्मा, त्या वृक्षावर बहूतकालपर्यंत वास करणारा सुहृज्जनासहित एक कपोत पक्षी होता. त्याची भार्या प्रातःकालापासून अरण्यांत संचारार्थ गेली होती ती सायंकालीं यावी; परंतु न आल्यामुळें रात्रौ तो पक्षी शोक करीत बोलूं लागला.

कीं, माझी प्रिय भार्या अद्यापि आली नाहीं याचें कारण काय? अशा वा पु पर्जन्य वृष्टि मध्यें कोणत्या अरण्यांत कशी सुखरूप राहिली असेल बरें? तिच्या वांचून हें गृह केवल शून्य झालें. गृहिणी जेथें आहे, अशा वृक्षाखालीं जरी वास केला तरी तें गृहच समजावें. तिच्या वांचून इंद्रभुवन सदृश जरी मंदिर आहे तरी तें महा अरण्य तुल्य होय. तस्मात् ती आजन येईल तर मी वांचून काय करावें. अहो पहा? मी भोजन व स्नान केल्या शिवाय ती करीत नाहीं, मी संतुष्ट असतां ती संतुष्ट, मी दुःखित असतां ती दुःखित असत्ये; मी ग्रामांतरास गेलों असतां ती दीनवदन होऊन अलंकरादि धारण करीत नाहीं. मी क्रुद्ध झालों असतां ती प्रिय भाषणें करून क्रोध शांत करीत्ये. अशी पतिव्रता व पतीच्या हिता विषयीं रत भार्या ज्यास आहे तो पुरुष, या पृथ्वीवर परम धन्य होय. विपत्ती काल प्राप्त झाला असतां भार्ये सारखें औषध, धैर्य देणारा व मित्र कोणी नाहीं. तसाच भार्ये समान बंधु, आश्रय व सहाय्य इतर कोणी नाहीं. अशी ज्याची उत्तम साध्वी व प्रिय वादिनी भार्या जर गृहीं नसेल तर त्यानें अरण्यवास करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

१५. अध्याय पंधरावा:- भीष्म म्हणतात हे धर्मा, असें त्या कपोतानें करुणा वाक्य ऐकून लुब्धकानें धरलेली त्याची भार्या जी कपोती ती म्हणाल्ये. अहो माझा प्रिय पति माझे समस्त गुण वर्णन करील याचें आश्चर्य नाहीं; परंतु माझे परोक्ष, गुण वर्णन करितो. तस्मात् माझ्या सारखी महा भाग्यवती कोणे आहे? जिच्या योगानें पतिला संतोष होत नाहीं ती भार्या नव्हे. जिचा पति संतुष्ट होतो तिच्यावर सर्व देवता प्रसन्न होतात. असें चिंतन करून ती कपोती पिंजऱ्यांत असल्यामुळें दुःखार्त होऊन पतीस भाषण करित्ये. हे कांत, मी तुला श्रेयस्कर वाक्य सांगत्यें. तें असें कीं, तूं शरणागतानें रक्षण कर. हा लुब्धक, शीतार्त व क्षुधार्त होऊन तुझ्या निवास स्थानाच्या आश्रयानें निजलेला आहे याचा तूं सत्कार कर व संतापन करितां शरीर निर्वाहार्थ मी ग्रास झाल्यें तरी अन्य स्त्री तुला मिळेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१६. अध्याय सोळावा:- भीष्म म्हणतात हे धर्मा, पत्नीचें भाषण ऐकून तो कपोतपक्षी हर्षीत झाला आणि लुब्धकास बोलला कीं, हे लुब्धका, तुझें स्वागत असो तुझ्या मनांत काय इच्छा असेल ती सांग.शत्रुजरी गृहीं असला तरी त्याचाही यथोचित सत्कार करावा. वृक्ष छेदन करणारासही छाया करितो. आणि तूं तर आम्हांस शरण आला आहेस, यास्तव मी प्रीतीनें तुझ्याशीं बोलतों कीं, पंचमहा यज्ञ करणाऱ्या गृहस्थानें शरणांगताचें आतिथ्य प्रयत्नानें करावें. असें असून मोहानें पंचयज्ञ न करील तर त्यास धर्में करून ह्या लोक किंवा परलोक प्राप्त होत नाहीं. यास्तव तुला जें अपेक्षित असेल तें सांग त्या प्रमाणें मी सर्व पूर्ण करीन. तूं शोक करूं नको. असें ऐकून लुब्धक म्हणतो. मी शीतानें फार पीडित झालों याचें निवारण कर. असें ऐकतांच पक्ष्यानें शुष्कपर्णांचीराशी करून ती अग्नीनें प्रदीप्त केली. आणि भाषण केलें आतां स्वस्थपणानें सर्व अंगास तप्त कर. असें म्हणतांच लुब्धकानें अंग तापवितांच तो मोठा हर्षयुक्त होऊन भाषण करितो कीं, मला क्षुधा लागली यास्तव तुजपासून आहार प्राप्त होण्याची इच्छा करितों. हें ऐकून पक्षी म्हणतो. मी तुझी क्षुधानिवारण करण्या जोगा ऐश्वर्यवान् नाहीं. आम्हीं अरण्यवासी ऋषी सारखे उत्पन्न जीवी आहोंत व आम्हांपाशीं संग्रह हीनाहीं. असें म्हणून तो पक्षी स्ववृत्तीची निंदा करीत चिंताक्रांत झाला.आणि त्यानें अग्नी प्रदीप्त करून भाषण केलें कीं, अतिथि पूजनें करून च देव, ऋषि व पितर यांची तृप्ति होते. असें मीं पूर्वी ऐकिलें आहे. त्या प्रमाणें तुझी तृप्ती करितों. तूं मजवर अनुग्रह कर. असें म्हणून हास्य करीत अग्निला तीन प्रदक्षिणा करून त्यानें तत्काल त्यांत प्रवेश केला. तेव्हां त्या लुब्धकानें तो पक्षी, अग्नि प्रविष्ट झालेला पाहून मनांत अशी चिंता केली कीं, काय हीं हें मीं निंद्य कर्म केलें. यांत मला महा घोर अधर्म प्राप्त झाला आतां काय करावें. अशा रीतीनें तो बहुत प्रकारें आपल्या कर्मांची निंदा करीत विलाप करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७. अध्याय सत्रावा:- भीष्म म्हणतात. हे धर्मराजा, नंतर लुब्धक,

क्षुधातुर झाला असतां अग्नि प्रविष्ट झालेल्या कपोतास पाहून पुनः भाषण करितो कीं, पक्षी घात करणारा क्रूर, दुर्बुद्धि मी मजपासून नित्यशः किती पाप होतें याची संख्या नाहीं. या मुळें सर्वलोकांत अविश्वासी झालों. पहा मीं शुभ कर्माचा त्याग करून हिंसा रूप अशुभ कर्माचा आश्रय केला आणि नंतर कपटानें परद्रोह रूप अनर्थ संपादन केला. अशा रीतीनें आपली निंदा करीत म्हणतो कीं, पहा? कपोत, हा पक्षी असून किती योग्य होय कीं, ज्यानें मला मांस देण्या करितां स्व देह, दग्ध केला? येणें करून मला उपदेश प्राप्त झाला. तस्मात् आजपासू मी स्त्री, पुत्र व स्वप्राण, यांचा त्याग करून उपवासादिकानें परलोक साधनार्थ स्व देह शोषण करीन. आणि या कपोतानें देह समर्पण करून अतिथि पूजनाचें महत्व दाखविलें. त्या प्रमाणें मी धर्म आचरण करीन. असें म्हणून तो लुब्धक, क्रूर कर्मापासून निवृत्त झाला. आणि त्यानें यष्टी, शक्ती व जाळें या शस्त्रादिकांचा त्याग केला. व पिंजऱ्यांत बद्ध केलेल्या कपोतीला ही मुक्त करून स्वतः महाप्रस्थानाच्या आश्रयानें प्रयाण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१८. अध्याय अठरावा.— भीष्म म्हणतात हे धर्मराजा, तो लुब्धक गेल्या नंतर त्याच्या पाशांतून मुक्त झालेली कपोती, पतीचें स्मरण करून परम दुःखानें भाषण करित्ये. हे कांत, तूं माझें अप्रिय केलेंस असें मीं कधींही स्मरत नाहीं. असें असून माझा त्याग केलास तस्मात् विधवा स्त्रिया, बहु पुत्रवती असल्या तरी अत्यंत शोकानें व्याकुल होतात. आणि बंधुवर्गांस पति हीन स्त्री फार निंद्य होत्ये. तशी मी झालें. तुझ्या शीं मी रममाण होऊन बहूत प्रकारें क्रीडा केल्या त्याचें स्मरण होऊन माझे मनास फार खेद होत आहे. पिता, माता व पुत्र यानीं कांहि दिलें तरी तें स्वल्पच आहे. तस्मात् भर्ता मात्र अपरमित देणारा होय. पास्तव पतिसमान स्त्रियांस नाथ व सुखकोठेंही नाहीं. तस्मात् हे नाथ, तुझ्या वांचून मी जीवंत असून काय उपयोगी आहे. यास्तव मी जीविताचा त्याग करितें. असा बहून प्रकारें विलाप करून त्या पतिव्रतेनें प्रदीप्त अग्नींत प्रवेश केला. आणि पतीस आकाशांत पाहिलें. तो रत्न जडित विमानानीं वेष्टित व

पुण्यकर्म करणारे महात्मे सज्जन यानीं पूजित दिव्य विमानारूढ झालेला पती पाहून त्याच्या सन्निध त्या कपोतीनेंही दिव्य देह धारण करून आरोहण केलें आणि उभयतांस्वर्ग लोकांत जाऊन दिव्यउपभोग करीत रममाण होऊं लागलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१९. अध्याय एकोणीसावा.—भीष्म म्हणतात हे धर्मराजा, तेउभयतां श्रेष्ठ विमानांत बसून जात असतां त्यांस त्या लुब्धकानें पाहतां च चिंताक्रांत होऊन भाषण केलें कीं, हे पक्षी असून अशा उत्तमगतीस गेले. तस्मात् मीही असें तप करून परमश्रेष्ठगतीस जाईन असानिश्चय करून स्वर्ग प्राप्तीच्या इच्छेनें वायु भक्षण करीत वैराग्यानें तो अरण्यांत संचार करूं लागला. तो एके ठिकाणीं एक सरोवर पाहून उदकपान न करितां व उपवास करीत असतां तृप्त झाल्या सारखा तसाच विदेह स्थितीनें तपश्चर्या करीत असतां कृशांग होऊन निर्मनुष्य व मृगादिकनीं युक्त अशा अरण्यांत भ्रमण करूं लागला. तो एका वनांत बहुत वृक्ष होते तेथें महा वायूच्या संचारानें वृक्षांचें परस्पर घर्षण होऊन महा अग्नि प्रदीप्त झाला. तो प्रळय काला सारखा क्रुध्द होऊन आसमंतात् मृग पक्षि श्वापदादि सर्व वनास दहन करूं लागला. तें पाहून लुब्धक देह त्यागार्थ अग्नींत मोठ्या हर्षानें प्रविष्ट झाला. नंतर दग्ध देह होऊन निष्पाप असा स्वर्ग लोकास गेला. अशा रीतीनें कपोत व पतिव्रता कपोतीही लुब्धका सहित पुण्य कर्मानें स्वर्ग लोकांत गेलीं अशीच जी साध्वी स्त्री पतीचेंच अनुसरण करत्ये ती, या कपोती सारखी स्वपति सह वर्तमान स्वर्गवास करणारी होत्ये. हे धर्मराजा, असा वृत्तांत तुला सांगितला. याचें जो श्रवण व पठण करील त्याचें कधींही अशुभ होणार नाहीं. आणि शरणागत रक्षणा सारखा दुसरा महान धर्म नाहीं. कारण गोहत्या करणारास प्रायश्चित्त आहे; परंतु शरणागताचा घात करणारास प्रायश्चित्त नाहीं. यास्तव शरणांगतत्राण करणें हें अवश्य होय. असा हा सर्व पाप नाशक व पुण्य कारक इतिहास श्रवण केला असतां दुर्गति न होतां स्वर्ग प्राप्ति होत्ये

असा विषय या अध्यायांत आहे.

२०. अध्याय विसावा.- भीष्म म्हणतात. हे धर्मराजा, याविषयीं इतिहा स सांगतों. कोणी एक महा पराक्रमी पारिक्षित जनमेजय नामक राजा होता त्यास अकस्मात ब्रह्महत्या प्राप्त झाली. तेव्हां सर्व ब्राह्मण, पुरोहित व सर्व प्र जा यांनीं त्याचा त्याग केला. त्या कालीं तो, अहोरात्र त्या पापानें दग्धमान हो त असून अरण्यांत गेला. तेथें बहूत तपश्चर्या करूं लागला. आणि जो जो ब्राम्हण भेटेल त्यास ब्रह्महत्या परिहारार्थ प्रश्न करीत पृथ्वीवर देशोदेशीं सचार करीत असतां अकस्मात् इंद्रोत शौनक नामक ऋषीस पाहूनत्या नें त्या ऋषीचे चरण घट्ट धरिले. तेव्हां त्या ऋषीनें राजास पाहून फार निंदा केली. ती अशी कीं, अरे, तूं ब्रह्म हत्यारूप महा पाप करणारा येथें कशाकरव आलास? आम्हास स्पर्श करूं नकोस. जा जा! येथें उभा राहूं नको. कारण तुझ्या अंगाचा रुधिरासारखा दुर्गंध येत आहे व तूं प्रेततु ल्य दिसतोस. आणि ब्रम्हवधरूप पापाचें चिंतन करीत असतां न जा णून उत्तम कर्मांत निमग्न असल्या सारखा संचार करतोस? तुला ल- ज्जा नाहीं. वास्तव तुझें जिवित व्यर्थ होय. अरे, परलोकास गेलेले पि- तर, स्ववंशांत सत्पुत्र उत्पन्न होऊन त्यानीं तपश्चिर्या, देवतार्चन वंदन व सभाशीलता धारण करून वंशाचें कल्याण करावें. अशी इच्छा करितात. असें असून तुझे पितर नरकगामी झाले तस्मात् त्यानीं पुत्रापासून उत्त म लोक होण्याची जी इच्छा केली होती ती तुझ्या योगानें व्यर्थ झाली. आ णि ज्यांचा पूजा सत्कार केला असतां सर्व प्रजांस स्वर्ग, आयुष्य व यश प्रा प्त होतें त्या ब्राम्हणांचा निरर्थक द्वेष करणारा तूं झालास. तस्मात् तूं शाश्व त नरकांत पडशील. नंतर यमलोकांत गेल्यावर तेथें यमदूत, तुला चांग लें स्मरण करवून शिक्षा देतील, तेव्हां कळेल. असा विषय या अध्या० आहे.

२१. अध्याय एकवीसावा.- भीष्म म्हणतात. हे धर्मा, असें ऋषीचें वाक्य ऐकून जनमेजय म्हणातो कीं, हे मुने, अगोदरच निंद्य व धिक्कृत झालेल्या माझी पुनः तुह्मीं निंदा व धिक्कार करितां तस्मात् मरण पाव-

लेल्यास पुनः मारणें हें काय? असो सर्व प्रकारें मी दुष्कृती होऊन स्वकर्मानें पश्चात्ताप पावून भयंकर चिंता निमग्न होईल या भीतीनें अहोरात्र माझें मन फार व्यथित होत आहे. यास्तव आपणास शरण येऊन प्रार्थना करितों तर, तुम्ही क्रोध शांत करून मी बोलतों तें श्रवण करा. नंतर आपण जें सांगाल तें मान्य करीन. पूर्वी माझी ब्राम्हणांवर बहुत भक्ति होती. परंतु, सांप्रत मी ब्रम्हहत्या करणारा झाल्यामुळें सजातिलोकांत ऐक्य व स्तुतिहीन झालों. अशा पाप कर्मानें आमचें सर्व कुल निःशेष होईल? यास्तव मी वारंवार तुमची प्रार्थना करितों कीं, झालेल्या अपराधी क्षमा-करून माझें रक्षण करावें. शौनक म्हणतो. अरे, ब्राम्हण जाती लोभ पावली असतां जें न होण्याचें तेंही होईल. कारण जरी तो विवेकी असला तरी सर्व भूतांवर कोप करीलच. जसा पर्वतारूढ असलेला, भूमिस्थ लोकांस नीच मानून आपला थोरपणा मानितो तसा ज्ञानरूप मंदिरावर आरोहण करणारा स्वतः ज्ञानानें आनंदरूप असून इतर अज्ञानी लोकांस तुच्छ करितो आणि साधुजनांतून निघालेल्यास ज्ञानप्राप्ती होणार नाहीं. यास्तव सत्संगावांचून ज्ञान, दुर्लभ होय. तस्मात् ब्राम्हणांचें सामर्थ्य, वेदशास्त्र प्रतिपाद्य आहे. यास्तव ब्राम्हणांसच शरण जा. तेच तुझें रक्षण करतील. तथापि ब्राम्हणांचें शुश्रुषादि केलें असतां त्याचें फल परलोकीं प्राप्त होतें. ते जर कोपिष्ट झाले तर, या लोकींच तत्काल त्यांच्या शापादिकांचा अनुभव येतो. यास्तव तूं केलेल्या ब्रह्महत्यारूप पापानें जर पश्चात्ताप पावशील, तर पाप निवृत्ति करितां ब्राम्हण सेवारूप धर्मच आचरण कर. जन्मेजय म्हणतो. हे शौनक, मी पापाने पश्चात्ताप पावलों आणि धर्मलोप न होतां धर्मप्राप्ती व्हावी म्हणूनच आपली प्रार्थना करितों. शौनक म्हणतात. हे राजा, मी, दंभ व मान यांचा त्याग करून तुजवर प्रीति करीन, परंतु तूं स्वकर्म स्मरून सर्व भूतांच्या हिताविषयीं धर्माचे ठिकाणीं स्थित हो म्हणजे मी तुला शिष्य करितों. न केला तर तुजपासून भय होईल किंवा केला तर द्रव्य लाभ होईल, यास्तव कोणत्याही अर्थाकरितां तुजवर अनुग्रह करितों असें नाहीं. केवल धर्मार्थच

करितों आणि तुझ्या करितां सर्व लोकांत असें होईल कीं, शौनकानें यापा पिष्टाचा अंगिकार केला. तस्मात् या अधर्म करणारास धिक्कार असो. परंतु त्या सर्वांचाही मी अनादर करून तुजवर दया करितों. माझ्या कृत्यानें तुजपासून सर्व ब्राम्हणांचें क्षेम होईल असें कर. आणि इतःपरत्यांचा द्रोह करणार नाहीं अशी प्रतिज्ञा कर. जन्मेजय म्हणतो. हे ब्रह्मन् तुमचे चरणाची शपथ, मी पुनः ब्रम्हद्रोह करणार नाहीं असा विषय या अध्यायांत आहे.

२२. अध्यायबेविसावा.- शौनक म्हणताल. हे जन्मेजया तूं पूर्वीं महा भयंकर असून आतां जरी सौम्य वृत्तीनें भूतमात्रांवर अनुग्रह करशील, तरी हा सर्वांस उपद्रव देणारा असें लोक म्हणतील कारण,ज्या ठिकाणीं तूं उपद्रव देणारा होतास त्या ठिकाणीं उत्तम धर्मानें जरी तपश्चर्या करूं लागलास तत्रापि पूर्वी अधर्मानें त्रस्त केलेले लोक, तुझें कृत्य अद्भुत मानतील. तें असें कीं, जो सर्व ऐश्वर्य संपन्न असून दानकरणारा व दरिद्री असून तप करितो हें आश्चर्य नव्हे असें बोलूं लागतील. तस्मात् तुझ्या तपाचें काय कारण, याचा उत्तम रीतीनें विचार केला असतां सर्वांस, हें योग्य आहे असें वाटेल. नाहीं पेक्षां विपरीत दिसेल. त्यांत विचार पाहणारानीं आचार पाहवा. तो असा कीं, यज्ञ, दान, दया, वेदपठण आणि सत्य हीं पांच व उत्तम तपश्चर्या तसाच पुण्य देशांत संचार हें राजाचें परम पवित्र आचरण आहे. असें सर्वांनीं मान्य केलें असतां श्रेयस्कर धर्म पावतील. या विषयीं ययाति राजाचें वाक्य आहे ज्या मनुष्यास आयुष्य आहे तावत्काल त्यानें यज्ञ साध्य सत्कर्म करून तपश्चर्या करावी असें आहे. यास्तव तूं कुरुक्षेत्र, सरस्वत्यादि तीर्थें, पृथूदक, महासर, पुष्कर, प्रभास, उत्तर मानस, कालोदक, सरस्वती व दृषद्वती यांचा संगम आणि मानस सरोवर अशा पुण्य क्षेत्रांचे ठिकाणीं स्वाध्याय संपन्न असून सर्व धर्मांत पवित्र जो ज्ञानरूप धर्म त्याही पेक्षां अत्यंत श्रेष्ठ सन्यास धर्म याचें आचरण करीत व तीर्थ क्षेत्र महात्म्य अवलोकन करीत यात्रा कर. याविषयीं सत्यवा-

याचें वाक्य असें आहे कीं, जसा बालक, प्रीति द्वेषरहित असल्यामुळें त्यास पाप व पुण्यही नसतें आणि तो सर्वदां सत्यभाषण करणारा असतो तसा तूं हो. आणि सर्वभूत मात्रांस विद्या व अविद्या यांच्या संसर्गानें पुण्य,पापें घडून त्यांच्या अनुरोधानेंच सुखदुःखें प्राप्त होतात. तस्मात् तूं ज्या ब्राम्हणांस पूर्वीं दुःख दिलें होतेंस त्यांस प्रस्तुत धैर्यानें व इंद्रियपुष्टत्वानें उत्तम सुख देण्याकरितां क्षत्रियांचें धर्मानें पालन कर आणि अनेक द्रव्यांचीं दानें करून स्वर्ग संपादन कर. तसाच पराक्रम असतांही तत्प्रयुक्त अभिमान टाकून आपल्या दर्शनानें असें व्हावें कीं, आम्हांस मारणारा नसून सौम्य वृत्तीनें वागतो. असे सर्व ब्राम्हणांस वाटेल असें कर. वस्तुतः राजा हीमवत् शीतल, अग्निवत् क्रूर, यमवत् गुणदोष विचारक, नांगरतुल्य दुष्टास समूल खणणारा व दुष्टनाशार्थ अकस्मात् वज्रतुल्य घात करणारा असा असावा. तसेंच राजानें स्वनाश करणाऱ्या असाधूचे ठिकाणीं प्रीति विशेषें करून, विद्वत्तेनें सामान्य ब्राम्हण धर्में करून अथवा कोणत्याहि हेतुस्तव आसक्त होऊं नये. आणि असें आहे कीं, एकवार केलेल्या पापापासून पश्चात्तापानें, द्विवार केलें असतां पुनः करणार नाहीं अशा नेमानें, त्रिवार केल्यास कांहीं धर्म आचरणानें व बहुत वेळ केल्यास तीर्थयात्रा केल्यानें मनुष्य, सर्व पापापासून मुक्त होतो. जसा सुगंध वस्तूचें सेवन केलें असतां सुगंधी व दुर्गंधाच्या सेवनानें दुर्गंधी होतो. तसा,तप करणारा निष्पाप व पाप करणारा पापी होतो. यास्तव एकसंवत्सर अग्नीची उपासना केली तर, अपवादजन्य दुष्कीर्ती पासून आणि तीन वर्षें केली असतां व पुष्करादि महासरोवरें, प्रभास व उत्तर मानसें यांचे ठिकाणीं शतयोजन संचार केल्यानेंही ब्रम्हहत्येपासून मुक्त होतो. अथवा उदकांत बुडी मारून त्रिवार अघमर्षण करावें. म्हणजे अश्वमेधावभृत स्नानाचें फल प्राप्त होऊन तत्काल पापमुक्त होतो. आणि सर्व लोक प्रसन्न होऊन त्याचा सत्कार करूं लागतात. तसाच ज्याज्या प्राण्यांचा प्राणघात केला असेल त्यांच्या त्यात्या जातींचा द्रव्यदानादिकानें दुःखांतून उद्धार करावा. या विषयीं बृहस्पतीस देवदैत्यांनीं

पिढून प्रश्न केला कीं, धर्माचें सुखरूप फल व अधर्माचें सर्वांस दुःखरूप फल हीं दोन्ही ही तुम्हीं जाणत आहां. तीं फल सुखदुःखें लोकांस सहज असून त्या उभयतांपासून तुल्य जय आहे? किंवा न्यूनाधिक आहे? असें असल्यास पुण्याचें फल कसें व दान रूप पुण्यानें पापनाश कसा होतो? हें सांगा. बृहस्पतिनीं सांगीतलें कीं, अबुद्धि पूर्वक केलेल्या पापाचा बुद्धि पूर्वक केलेल्या पुण्यानें नाश होतो. व पाप करून मी कांहींच करीत नाहीं असा अभिमान शून्य असल्यास तो निष्पाप आहे. आणि जो साधूच्या दोषाची निंदा न करितां श्रद्धेनें आचारण करितो. त्यानें पाप केलें तरी तो कल्याणकारकच होतो. जसा सूर्योदय झाल्याबरोबर अंधःकार नाश होतो. तसा पुण्य आचरण करीत असतां पापनाश होतो. भीष्म म्हणतात. हे धर्मा, असा इंद्रोत शौनकानें जन्मेजय राजास उपदेश करून याविधीनें अश्वमेध करविला. नंतर तो राजा, निष्कल्मष, कल्याणरूप प्रज्वलित अग्निसारखा होऊन आकाश मंडलांत पूर्णचंद्रा प्रमाणें स्वराज्यांत गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

२३. अध्यायतेविसावा:— युधिष्ठिर प्रश्न करितो हे पितामहा, या लोकीं अत्यंत विपत्तीनें व मृत्युनें ग्रासलेला मनुष्य, कोणत्याही कारणानें कांहीं कालास्थित असून पुढें कोणत्या गतीस पावतो. व मृत झालेल्याचें पुनः संजीवन झालें असें आपण पाहिलें काय? भीष्म म्हणतात हे पार्था, या विषयीं पूर्वीं नैमिषारण्यांत गृध्र व जंबुक यांचा संवाद सांगतो. कोणी एक ब्राम्हणाचा बहूत कष्टानें झालेला एकच पुत्र असून तो बाल्य अवस्थेंतच बालग्रहानीं पीडित होऊन मरण पावला. तेव्हां त्या सुकुमार बालकाचें कलेवर जवळ घेऊन मातापितरादि सर्वज्ञाति आमचें सर्वस्व कुल बुडालें म्हणून त्यानीं दुःखानें शोक करीत त्यास आणून स्मशान भूमिवर स्थापन केलें. आणि तेथें त्याचा त्याग करून माघारे आपल्याविषयीं कोणींही समर्थ न होतां उंचस्वरानें रोदन करूं लागले तो आक्रोश ऐकून तेथें एक गृध्रपक्षी आला आणि बोलला कीं, या ठिकाणीं कालें करून मरण पावलेल्या सहस्त्रावधि स्त्रिया, पुरुष व बालकें यांचा त्याग करून त्यांचे

बांधव, आतां अस्तमान होतो. तुम्हीं या पुत्राला टाकून सत्वर निघून जावें. अहो, अशी रहाटी, या जगामधें जन्मास आलेल्यांच्या संयोगानें सुख व मरणानंतर वियोगानें दुःख हा क्रम निरंतर चालू आहे. तस्मात् जे प्राणी शोक करतात तेही आयुष्य क्षय झाल्या नंतर त्याच्याच मार्गानें जातात. पाहा ह्या गृध्र जंबुकादि श्वापद युक्त व अस्थिमय सर्व रानीं त्रास भयदा या घोर स्मशानांत वास करून कितीही आक्रोश केला तरीही जो काळधर्मानें मृत झाला तो पुनः जीवंत होणार नाहीं. त्यांत विप असो किंवा द्वेषी असो. जे या मृत्युलोकीं जन्मास आले ते मरण पावून यमलोक मार्गानें गेले असतां त्यांस, परतविणारा, या लोकीं कोणीही समर्थ नाहीं. आतां सूर्यास्तमान होत आहे याकरितां पुत्र स्नेहाचा त्याग करून तुम्हीं स्वस्थानास जा. असें ऐकून ते सर्व बांधव स्मशान भूमीवर पुत्र कलेवर टाकून आमचा बालक आम्हांस सोडून गेला आतां पुनः त्याचें दर्शन कोठून होणार? असें म्हणत त्याच्या जीविता विषयीं निराश होऊन आक्रोश करीत चालले असतां त्यांचा आक्रोश शब्द ऐकून कोल्हा बिळांतून निघोन त्यांस म्हणतो कीं, अरे तुम्हीं मनुष्यें किती निर्दय आहांत कारण, अद्यापि अस्तमान झाला नाहीं या समयीं तुमचा पुत्र कदाचित् जीवंत होईल. असें असून स्मशानांत पुत्रास टाकून निर्दया सारखे गमन करीत आहां. तस्मात् बालकावर तुमचा स्नेह नाहीं असें वाटतें. पहा? पशुपक्षियांस ही पुत्र स्नेहापेक्षां कांहींच अधीक नाहीं. आणि परलोकस्थ पितरांस ही आपले वंशांत पुत्र झाला असतां अतिशय आनंद होतो. तस्मात् पुत्र त्याग करूं नका. असें ऐकून ते सर्व पुनः पुत्राकडे गेले. हें पाहून गृध्र बोलूं लागला कीं, अहो, त्या अल्पमति क्रूर जंबुकानें तुम्हांस फसविलें. परंतु तुम्हीं कां आलांत? पंच भूतानीं युक्त, प्राण रहित काष्ठ तुल्य झालेल्या शरीराचा शोक करून काय उपयोग? तुम्हीं आपल्या कर्माविषयीं कां शोक करा ना? जर तुम्हांस कर्तव्य असेल तर, तीव्र तपें करून यास निष्पाप करा. जसीं कर्में करावीं तसीं सुखदुःखें ज्याचीं त्यास यत्ना वांचून प्राप्त होतात. साक्षात् पित्याचें पुत्राला किंवा पुत्रानें पित्याला कर्मउपयुक्त होतनाहीं

मग इतरांचें कर्म कोठून प्राप्त होणार? तस्मात् एककुलांत अथवा, एकोदरांत जन्मास आलेले असून भिन्न भिन्न पुण्य पाप रूप कर्मांनीं बद्ध झालेले पृथक् पृथक् गती पावतात. यास्तव शुभाशुभ कर्म जो करणारा तोच त्यानें बद्ध होतो यास्तव तुम्हीं पुत्र स्नेहापासून निवृत्त होऊन शोक दैन्यरूप अधर्माचा त्याग करा. आणि यथा कालीं देवब्राम्हणांचे ठिकाणीं निष्ठाधारण करून धर्माचरणाविषयीं या पुत्राचा त्याग करून निवृत्त व्हा. येथें कोणींही मृत झालेल्याचा त्याग करून त्याचे बांधव क्षण मात्र उभे न राहतां निघोन जातात. तस्मात् ज्ञानी, मूर्ख, सधन, निर्धन, बाल, तरुण, वृद्ध व गर्भस्थ हे सर्वही प्राणी शुभाशुभ कर्मानें कालवश होऊन मृत्यूनें ग्रस्त आहेत. यास्तव सर्वांचा प्रभु कालच असून तुम्हीं धर्म सोडून शोक कशास्तव करितां? असें म्हणून निवृत्त केलें. त्यांस जंबूक म्हणतो अहो, पुत्रस्नेहानें अत्यंत पराभूत होऊन शोक करणाऱ्या तुमचा स्नेह हा दुस्त्यज असून या अल्प बुद्धि गृध्रानें अनेक सयुक्त वाक्यानीं घालविला. तस्मात् मृतवत्स धेनु सारखे अत्यंत शोक करणाऱ्या तुम्हांस पाहून मीही मनुष्यांचें दुःख जाणत आहें. यास्तव माझ्याही नेत्रांतून अश्रुपतन होतें. तस्मात् दैव आणि यत्न यांस कालानुकुल्य असतो म्हणूनच निरंतर खेदरहित होऊन यत्न करीत असतां दैवानें कार्यसिद्धि होत्ये. यत्न न करितां खिन्न झाल्यानें कसें सुख होईल? असें असून मातापितरांच्या रक्त मांसानें उत्पन्न झालेला, वंशवृद्धि करणारा बालक टाकून कसे जातां? आत्तां सायंकाल झाला आहे. तस्मात् शीघ्र पुत्रास घेऊन जा किंवा, येथेंच असा. गृध्र म्हणतो. हे मनुष्यहो, माझ्या वयाला पूर्ण एक सहस्त्र वर्षे झालीं; परंतु मृत झालेला प्राणी पुनः जीवंत झाला असें मी पाहिलें नाहीं. या ठिकाणीं कित्येक अतिप्रिय स्त्रिया आदि व अप्रियही सहस्त्रशः मृत झालेल्यांचा त्याग करून त्यांचे बांधव, शोकानें दग्ध होत असतां नित्यशः जात असतात हें मीं पहात आहें. असें असून यांतील जीवानें या देहाचा त्याग करून अन्य देहाचा स्वीकार केल्यामुळें या काष्ठतुल्य झालेल्या शरीरापुढें निरर्थक स्नेहानें त्याचे

गुण वर्णन करीत शोक करूं लागले आहां. तर, मी सहेतुक वाक्यानीं तुम चें समाधान करीत असतां हीं वाक्यें तुम्हीं निष्ठुर मानित असाल? तर असें मनांत न आणितां आपापल्या गृहास जा. असें गृध्र वाक्य ऐकून ते मनुष्यं निघाले हें पाहून पुनः जंबुक म्हणतो कीं, सुवर्ण कांतियुक्त, अलंकार नसून अलंकृत व पितरांचा उद्धार करणाऱ्याया लेंकराचा गृध्र वाक्यावरून कसाहो त्याग करितां याचे गुणरूप वारंवार मनांत येऊन स्नेह व शोक शांत न होतां तुम्हांस निश्चें करून बहूत ताप होईल. आणि गृध्रवाक्यावरून हा जिवंत होणार नाहीं असा तुम्हीं निश्चय केला असल्यास मी याविषयीं उदाहरण सांगतों. जंबुक नामाचा शूद्र तप करीत असतां कोणी एक ब्राम्हण पुत्र मरण पावला. तेव्हां दाशरथी रामानीं त्याशूद्रास मारून ब्राम्हणपुत्र जीवंत केला. तसाच श्वेतराजाचा पुत्र मृत झाला तेव्हां त्यानें धर्माचरणें करून संजीवन केला. तसे तुम्हींही रोदन करीत असतां तुमचें दैन्य ऐकून कोणी ही सिद्धमुनी अथवा कोणी देव तुम्हांवर दया करील. असें म्हणतांच ते त्या बालकाजवळ आले आणि त्याचें मस्तक अंकावर घेऊन दीर्घ स्वरें रोदन करूं लागले. तें ऐकतांच पुनः तेथें गृध्र येऊन बोलतो कीं, अहो, तुमच्या अश्रुपातानें भिजलेला व वारंवार हस्तस्पर्शानें पीडित झालेला हा प्राणी, यमधर्माच्या आज्ञेनें दीर्घ निद्रा पावला आहे. हा, लक्षावधि जंबुकानीं बडबड केली तरी, पुनः जिवंत होईल काय? परंतु कदाचित् विष्णु, ब्रम्हदेव, रुद्र व कार्तीकस्वामी यांच्यावर प्रदानानेंच हा शिशु जिवंत झाला तर होईल. असें असून मी सांगतों हें मिथ्या वाटून तुम्हीं बहूत काल रोदन केल्यानें काय होणार? असें ऐकतांच ते बांधव पुनः शोक करीत गृहीं जाण्याविषयीं निघाले. तें पाहून पुनः जंबुक म्हणतो कीं, हा मनुष्यलोक, सर्व प्राणिमात्रांचा बुद्धि पूर्वक नाश करणारा असा फार भयंकर आहे. कारण, प्रिय पुत्रादिकांचा वियोग, अल्प आयुष्य, बहूत कपट, असत्य, परस्पर वाद व अप्रिय भाषण इत्यादिकानीं युक्त अशा लोकांस पाहिलें असतां दुःख शोकांची वृद्धि होते मला तर, या लोकांत

मुहूर्तमात्र राहूं नये असें वाटतें. हे मनुष्यहो, तुम्हांस सांगण्याची तर पराकाष्ठा झाली. तत्रापि माझ्यानें राहवेना म्हणून पुनः सांगतों. सुखानंतर दुःख व दुःखानंतर सुख अशा क्रमानें सर्व जगत् व्याप्त आहे तस्मात् आतां पुत्र वियोगानें दुःख झालें. तसें पुनः संयोगानें दुःख होईल काय? यास्तव त्या बालकास जिवंत असल्या सारखा मी पहातों. आणि रूपयौवन संपन्न सर्व उत्तम लक्षणानीं युक्त व अशा बालकास स्मशान भूमीवर टाकून जाणें हें तुम्हांस योग्य नव्हे. कांहीं पुत्र संयोगानें आनंदाश्रु टाकीत स्वगृहास जावें. भीष्म म्हणतात हे धर्मा, असें बाह्य रीतीनें धर्म विरुद्ध व मिथ्या असून यथार्थ सत्य भाषण करणाऱ्या स्मशान वासि जंबुकानें स्वकार्यार्थ रात्र होण्याची अपेक्षा करीत अमृतोपम वाक्यानीं त्या बांधवांच्या मनास द्विधाभाव उत्पन्न केला. त्यामुळें ते तेथेंच स्तब्ध झाले. त्यांस गृध्र म्हणतो कीं, हा वन प्रदेश, बहूत भूत प्रेत राक्षसादिकानीं व्याप्त व कौशिक ( घुबड ) शब्दानीं व निबिड अंधकारानें भयंकर अशा ठिकाणीं सूर्यास्त झाला नाहीं व दिशाही प्रकाशित आहेत इतक्यांत या कलेवराचा त्याग करून प्रेत कार्यास प्रवृत्त व्हा यास्तव माझ्या वाक्यावर विश्वास ठेवून जा कसे? नाहींतर निष्फल जंबुक वाक्य मान्य कराल तर भ्रष्टज्ञान होऊन सर्व नाश पावाल. असें ऐकून ते निघाले. तों जंबुक म्हणतो. दिनकर अस्तमान होई तों पुत्रावर स्नेह ठेवून येथेंच असा. श्वापदें काय करतात? गृध्र वाक्यावर मोहित व्हाल तर, पुत्र नाहींसा होईल. भीष्म म्हणतात हे धर्मा, असें जंबुकाचें वाक्य ऐकून ते बांधव तेथेंच शोकानें परमेश्वराचें चिंतन करीत रोदन करूं लागले. तों तत्काल तेथें उमाशंकर प्राप्त झाले. आणि उमादेवीनें त्यांचें दैन्य परिहार करण्याविषयीं शिवास प्रार्थना केली. तेव्हां शंकरानीं त्यांस प्रसन्न होऊन वर देतों असें म्हणतांच, ते साष्टांग नमस्कार पूर्वक हस्त जोडून प्रार्थना करतात कीं, हे भगवन् हा आमचा एकच पुत्र असून मरण पावला. याच्या जीविताची आम्हीं इच्छा करीत आहों, तस्मात् यास जिवंत करण्यास आपण समर्थ आहां. असें ऐकून शिवानीं कृपामृत पूर्ण दृष्टीनें पाहतांच तो कुमार, तत्काल उठून

बसला. नंतर शिवानीं सांगीतलें कीं, यास शत वर्षे पूर्ण आयुष्य आहे. असा सर्वभूत हित कारक शिवानीं गृध्र जंबुकासही क्षुधा निवर्तक वर दिला. त्या कालीं सर्वही शंकरास नमस्कार करून अत्यंत हर्षानें दीर्घकाल दुःख भोगून दृढ निश्चय केल्यामुळें देवदेवाचा प्रसाद संपादन करून सफलम नोरथानें व पुत्र जिवनें करून विस्मय करीत पुत्रास घेऊन परमानंदानें स्वनगरास गेले. असा हा धर्मार्थ मोक्ष युक्त इतिहास जो श्रवण करील तो यालोकीं व परलोकीं निरंतर आनंद पावेल. असा विषय या अध्या यांत आहे.

२४. अध्याय चोविसावा:- युधिष्ठिर प्रश्न करतो हे पितामहा, बलवा-न् असून उपकार व अपकार करण्याविषयीं समर्थ असा उद्योगी शत्रु, सन्निध असतां त्याशीं सामर्थ्यहीन व दुर्बल अशा राजानें बडबडमात्र क-रून द्रोह उत्पन्न केला. यामुळें तो क्रोधानें त्यावर चालून आला तेव्हां त्यापासून आपलें रक्षण करून घेण्याविषयीं कोणत्या बलाच्या आश्र यानें कसें वागावें. भीष्म म्हणतात, हे धर्मराजा, याविषयीं इतिहास सां-गतों. हिमाचलावर बहूत वर्षांचा वृद्ध एक शाल्मलीनामक महान् चारों हस्त विस्तार युक्त वृक्ष होता. तो शीतल छाया युक्त व रमणीय असल्या-मुळें तेथें अनेक मार्गस्थ व्यापारी लोक व तपस्वी ऋषि येऊन वास करीत असत. असें असतां कोणे एके दिवशीं तेथें नारदानीं येऊन त्या वृक्षास भाषण केलें कीं, हे वृक्षश्रेष्ठा शाल्मले, तूं बहूत रमणीय व मनोहर आहे-स. तुला पाहून मी फार संतुष्ट झालों. व तुझ्या आश्रयानें अनेक पक्षि, मृग व गज इत्यादि सर्व प्राणि परम हर्षानें वास करितात. आणि तुझ्या शाखा अनेक असून वायूनें एकही भग्न झाली नाहीं हें पाहून मला फा-र आश्चर्य वाटतें. कारण, भगवान् वायु, हा स्ववेगानें सर्वही लहान मो-ठे वृक्ष व पर्वतांचीं शिखरें स्थानभ्रष्ट करून उडवितो. आणि स-रोवरें, नद्या व समुद्र यांचाही शोष करणारा व सर्व वस्तुमात्रांचा सुगंध व दुर्गंध हरण करीत असून सर्वदा शुची असा जो पवन तो निरंतर तुझें रक्षण करितो. या वरून तो तुझ्यावर प्रीति करणारा तुझा परम सखा आहे.

असें वाटतें. असा तूं सर्वांस आश्रय असल्यामुळें मेरुतुल्य भासतोस. आणि सिद्ध, तपस्वी व योगी असे अनेक ब्राह्मणही येथें वास करितात. तस्मात् तुला स्वर्गाचीही उपमा शोभेल. असा विषय या अध्यायांत आहे.

२५. अध्याय पंचविसावा :- नारद म्हणतात हे शाल्मले, बंधुत्वें करून व सख्यत्वें करून हा वायु भयंकर असून तुझें पालन करीत आहे. तूं वायूचे ठिकाणीं मी तुझा आहें असा नम्र भाव धारण केल्यामुळें तो सर्वदा रक्षण करितो कारण, पृथिवीवर वायूनें भग्न झाले नाहींत असे वृक्ष, पर्वत व गृह इत्यादि कोणतेंही स्थान नाहीं. असें असून तूं सपरिवार निरामय राहिलास याचें कारण काय? शाल्मली म्हणतो हे ब्रम्हन्, वायु हा माझा सखा, बंधु, मित्र व गुरु कोणी नव्हे. आणि तो माझें रक्षण करितो असें-ही नाहीं. तर माझें बलच तसें आहे. कारण माझ्या बलाची अठरावी कला वायूचे ठिकाणीं आहे. कशावरून? तर तो तीक्ष्ण महावेगानें अनेक वृक्षादिकांस भग्न करीत आला तरी मी त्याचें स्वबलानें स्तंभन करितों. अशा रीतीनें बहुशः मी त्याचा पराव करीत आहें. यास्तव त्याचें लेशमात्र मला भय नाहीं. नारद म्हणतात हे शाल्मले, तुझें भाषण मला विपरीत भासतें. कारण, या ब्रह्मांडांत वायुतुल्य बलवान् इंद्र, यम, कुबेर व वरुण इत्यादि लोकपाल ही नाहींत. मग इतर कोठून असतील? असें असतां तुझी तर कथा काय? अरे, जो सर्व प्राणिमात्रांत व्याप्त असून जसजशी चेष्टा करतो, तशा रीतीनें सचेष्टित सर्व भूतमात्रांच्या वर्तणुकी होतात. असा तो प्रेरक असल्यामुळें सर्व प्राणिमात्रांत श्रेष्ठ व पूज्य असून तूं त्याची पूजा न करितां, बलगर्वानें व दुर्बुद्धिनें सक्रोध, निःसार मिथ्या भाषण करितोस. यामुळें मलाही तुझा क्रोध आला आहे. यास्तव मी, हें तुझें दुर्भाषित वायूस सांगेन. पहा, चंदन, देववृक्ष, शाल, सरल, देवदारु, वेतस इत्यादि उत्तम वृक्ष हे वायूचें बल जाणून त्यास नमस्कार करितात. आणि तूं त्याचें अनंत बल न जाणून मोहानें विपरीत भाषण करितोस तस्मात् वायूसन्निध जाऊन ही तुझी गर्वोक्ती मी सांगतों. असा विषय या अध्यायांत आहे.

२६. अध्याय सविसावा.- भीष्म म्हणतात. हे धर्मराजा, असें म्हणून नारदानीं शाल्मलीचें दुर्वाक्य वायूस निवेदन केलें. तेव्हां तो वायू क्रोधानें शाल्मली सन्निध येऊन बोलतो हे शाल्मले, तूं माझी निंदा करीत असतो- सना? कशावरून म्हणशील तर, हे पाहा! प्रत्यक्ष नारद सांगतात. परंतु मी वायू आहें समजलास? आपल्या बलाचा प्रभाव तुला दाखवितों; आणि हे वृक्षा, तूंहि मला विदित आहेस. कीं, पूर्वी ब्रह्मदेवानीं प्रजा उत्पन्न करते समयीं तुझ्या ठिकाणीं विश्रांति केली. यामुळें हे वृक्षाधमा, मी तुझ्या वर प्रसाद करून तुझें रक्षण करितों. केवल तूं स्व बलानेंच स्वरक्षण कर- तोस असें नाहीं. असें असून माझें सामर्थ्य न जाणतां, सामान्य प्राकृता- सारखें मला मानितोस? तस्मात् इतःपर माझा अवमान न करशील् अ- सा पराक्रम तुला दाखवितों. भीष्म म्हणतात. हे धर्मा, असें ऐकून शाल्म ली, हास्य करीत बोलतो कीं, हे पवना, तूं क्रुद्ध होऊन माझें काय करणार आहेस तें कर. जरी तूं स्वतः प्रभु आहेस तरी मी तुला भीत नाहीं. कारण. जो विशेष बुद्धिमान् तोच बलवान् जाणावा. केवल शरीरानें जो बलाढ्य तो बलवान् नव्हे. तस्मात् मी तुझ्या पेक्षां बुद्धिमान् असल्यामुळें बलाढ्य अ- सून तुला भीत नाहीं. हें ऐकून बरें आहे. उदयीक स्वतेज तुलादाखवीन असें बोलणें होत असतां रात्र झाली. नंतर वायु गेल्यावर शाल्मलीनें वि चार केला कीं, मी तत्तुल्य बलवान् नसून नारदापाशीं मिथ्या भाषण के लें. कारण, इतर वृक्षांपेक्षां मी दुर्बल आहें खरा परंतु बुद्धिनें मात्र मज समान कोणी नाहीं. तस्मात् बुद्धिबलाच्या आश्रयानेंच वायु भयापासून मुक्त व्हावें. जर, अशी बुद्धि इतर वृक्ष धारण करतील तर तेही वायूपासू- न भय पावणार नाहींत परंतु त्या मूर्खांस हें कळत नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२७. अध्याय सत्ताविसावा.- भीष्म म्हणतात हे धर्मराजा, अशा प्र- कारें शाल्मलीनें निश्चय करून पत्र पुष्पा सहित समग्र स्वशाखांचा छे दन केल्या सारखा अशेष त्याग केला. आणि मध्यमभाग (खुंट) मात्र स- शेष असा राहिला. नंतर प्रातःकालीं वायूनें अनेक वृक्ष भंग करीत मोठ्या

क्रोधानें येऊन शाल्मलीस पाहिलें तों शाखा प्रशाखादि विस्तार रहित मात्र आहे. असें पाहून वायु त्यास मोठ्या विस्मयानें म्हणतो कीं, अरे शाल्मले, मी येऊन जें संपूर्ण शाखांचें हरण करणें तें तूंच मोठ्या बुद्धिचातुर्यानें माझ्याशीं वंचना करण्या करितां केलेंस? परंतु माझ्या भीतीनेंच स्व शाखा विध्वंसरूप कृत्य केलेंस. मी तरी हेंच करणार होतों. यापेक्षां विशेष नाश करणें काय राहिलें? असें ऐकून शाल्मली, परम लज्जित झाला. आणि वारंवार नारद वाक्याचें स्मरण करीत संतप्त झाला. भीष्म म्हणतात हे राजश्रेष्ठा, अशा रीतीनें दुर्बल असून बलवानाशीं वैर केलें असतां शाल्मली सारखा संताप व शोक पावेल. यास्तव आपल्यापेक्षां बलवान असेल त्याशीं वैर कदापि करूं नये. व बलवान असून जर अपकार करणारा असेल तर त्याच्याशीं वैर असलें तरी तें प्रख्यात न करितां हळु हळु समय विशेषें करून पराक्रम दावीत जावा. तसेंच बुद्धिमानाशीं दुर्बुद्धी पुरुषानें वैर करूं नये. कारण जसा तृणाचे ठिकाणीं अग्नी तशी बुद्धिमानास समयोचित बुद्धी प्राप्त होत्ये. यास्तव पुरुषास बुद्धि सारखें दुसरें बल नाहीं. बाल, मूर्ख, अंध, बधिर व बलाधिक यांचे ठिकाणीं क्षमा करावी. पाहा, तुमची सात व कौरवांची अकरा अक्षौहिणी सेना होती, ती एकट्या अर्जुनाच्या बलाशीं तुल्य नवती. अशा यशस्वी अर्जुनानें स्वबलें करून युद्धांत संपूर्ण कुरु सैन्यांचा संहार केला. तस्मात् बुद्धिबल व शारीर बल हीं दोन्हीं अनुकूल असल्यास तो सर्वत्र विजयी होतो. हे भरतश्रेष्ठा, तुला राजधर्म व आपद्धर्म हे विस्तारें करून सांगितले. असा विषय या अध्यायांत आहे.

२८. अध्याय अठ्ठाविसावा.— युधिष्ठिर प्रश्न करितो कीं, हे पितामहा, आपण राजधर्म व आपद्धर्म हे सांगितले. ते सर्व मी श्रवण केले. परंतु आतां ज्यापासून पापाची प्रवृत्ती होत्ये असें पापाचें अधिष्ठान कोणतें तें मात्र श्रवण करण्याची मला इच्छा आहे. भीष्म म्हणतात. हे नराधिपा, सर्वांचा ग्रास करणारा जो एक लोभ, त्या पासूनच अनेक पापांची प्रवृत्ती होत्ये. जीं लोभी मनुष्यें असतात, त्यां पासूनच पाप, अधर्म व सुख

दुःखेंही कपट मूलक उत्पन्न होऊन त्यांस पातकी असें म्हणतात. तस्मात् क्रोध, काम, मोह, माया, मान, जडत्व, पराधीनता, अक्षमा, निर्लज्जा, संपत्तीनाश, धर्मक्षय, चिंता, अकीर्ति, दान न करणें, अतितृष्णा, अकर्मक्रिया आणि कुल, विद्या, रूप व ऐश्वर्य यांचा मद, सर्व भूतांशीं द्रोह, असत्कार, अविश्वास व आर्जवरहितत्व, परद्रव्य हरण, परस्त्री उपभोग, व्यर्थ भाषण, कोणत्याही कार्याविषयीं मनाची अस्थिरता, परनिंदा, सिश्नोदर परायणत्व, तत्संयुक्त मृत्यु भय न जाणणें, परोत्कर्षासहनत्व, असत्य भाषण, रसनेंद्रिय लोलुपता, ग्राम्य गीत श्रवणेछा, कुचेष्टा, आत्मस्तुति, मात्सर्य, होण्यास अशक्य असून करण्याचें पाप, सहास कर्माविषयीं धैर्य, अशीं अनेक कर्मे लोभापासूनच प्रवृत्त होतात. व कोणी जीव असे आहेत कीं, जन्मापासूनच त्यांची या पूर्वोक्त कर्मा प्रमाणें वर्तणूक असल्ये. ती, बाल्य, कौमार वतारुण्य या अवस्थेवरोबर वृद्धिंगत होत जाती पुढें शरीर जीर्ण झालें तरी ती जीर्ण होत नाहीं. व तिजपासून बहून अनर्थ प्राप्त झाले तरी, तिचा त्याग करीत नाहींत. तस्मात् सर्व पापास मूल कारण लोभच होय. यास्तव कशा तरी उपायानीं कोणत्याही प्राणीमात्रास संतोष उत्पन्न करावा. हेंच ईश्वर पूजन आहे. तस्मात् गर्व, क्रोध, मद, निद्रा, हर्ष, शोक व अभिमान हे दोष लुब्ध बुद्धीचे ठिकाणीं स्पष्ट दिसतात. यावरून ते लोभी व अशिष्ट असें जाणावें. आतां श्रुत जे शिष्ट, ते सांगतों. ज्यांस जन्ममरणाची व परलोकाची भीति आणि प्रिया प्रिय भोगासक्ति नाहीं. सदाचार प्रीति, इंद्रिय निग्रह, सुखदुःख समान, सत्यधर्माचरण, दातृत्व, सर्व भूतीं दया आणि देव, पितर व अतिथि यांच्या सत्कारावर निष्ठा, सर्वोपकारकत्व, सर्व धर्मांचें पालन, सर्वस्व दान करण्याविषयीं धैर्य, अशा गुणानीं जे युक्त ते शिष्ट असें जाणावें. त्यांस धर्मापासून चालन करणें अशक्य. व तेही आपली पूर्वापार स्वधर्म निष्ठा न सोडितां सन्मार्गीं स्थित असून कधीं हीत्रास किंवा काठिण्य मनांत न आणितां आनंद युक्त असतात. आणि काम, क्रोध व अहंममतारहित, अहिं

शारत व साधुनीं सेवित असे क्रत्रत असून ज्यांची मर्यादा स्थिर असते. त्यांची तूं उपासना करून धर्म विचार करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

२९. अध्याय एकुणतिसावा:- युधिष्ठिर प्रश्न करितो हे पितामहा, आपण अनर्थाचें अधिष्ठान लोभ सांगितला आतां अज्ञान कशास म्हणावें ही श्रवणेच्छा आहे. भीष्म म्हणतात. जो जाणून पाप करीत असतां आत्मक्षय जाणत नाहीं. व सन्मार्गानें वागणाराचा द्वेष करतो. तो लोकांमध्यें निंद्य होतो. तसेंच नरक, दुर्गति, क्लेश व विपत्ती ज्यामुळें प्राप्त होतात; त्यास अज्ञान म्हणावें. युधिष्ठिर प्रश्न करितो. अज्ञानाची प्रवृत्ति, स्थान, उदय, वृद्धि, क्षय, मूल, योग, गती, काल, कारण व हेतु हे कोणते ते सांगा भीष्म म्हणतात कीं, हे धर्मा, प्रीति, द्वेष, मोह, हर्ष, शोक, अभिमान, काम, क्रोध, गर्व, निद्रेपासून जडत्व, आलस्य, इच्छा, ताप व परवृद्धि असहनता आणि हिंसादिक पापाच्या क्रिया ज्यापासून होतात; त्यास अज्ञान म्हणावें. आतां याची प्रवृत्ति व वृध्यादिक सांगतों. अज्ञान व लोभ हे दोन्ही समफल व समदोष असे एकरूपच आहेत. परंतु प्रथमतः लोभ उत्पन्न झाल्यानें अज्ञानाची उत्पत्ति, वृद्धिंगत झाल्यानें वृद्धि, समान असल्यानें समता व क्षीण झाल्यानें क्षीणता होत्ये. दुःख संताप, ममता, मोहादि अशा अनेक विविध गतिरूप संसारांत घालणारें जें अज्ञान त्याची प्रवृत्ति मूळ लोभापासूनच आहे. त्या अज्ञान रूप लोभाचें मूळ मोह काल निमित्तें करूनच अज्ञानाच्या गती स्वर्ग, नरक, नर, सुर, व तिर्यक्‌रूप अशा आहेत तसा लोभास छिन्नभिन्न करण्यास कारण कालच व लोभानें होणारें जें फल तोच हेतु तसाच अज्ञानापासून लोभ आणि लोभापासून अज्ञान असे सर्व दोष लोभापासूनच होतात तस्मात् सर्वथा लोभाचा त्याग करावा. या प्रमाणें जनक राजा, युवनाश्व, इत्यादि अनेक राजे लोभ त्यागानेंच स्वर्गलोकास गेले. यास्तव हे कुरुश्रेष्ठा, तूं मनःपूर्वक लोभाचा त्याग कर म्हणजे या लोकीं व परलोकीं सुखें करून संचार करशील. असा विषय या अध्यायांत आहे.

३०. अध्याय तिसावा.– युधिष्ठिर प्रश्न करितो हे पितामहा, स्वाध्याया विषयीं यत्न व धर्माची इच्छा करणारास यालोकीं व परलोकीं कोणतें श्रेय प्राप्त होतें आणि धर्ममार्ग हा, महा गहन असून याचा शास्त्रभेद रूप अनेक मतें आहेत त्यांत जें मूल उत्तम मत कोणतें तें सांगा. भीष्म म्हणतात. हे धर्मा महर्षीनीं धर्माचे विधि अनेक प्रकारें सांगीतले आहेत. त्यांत जसें ज्यास ज्ञान असेल, तसा त्यानें मुख्य इंद्रियनिग्रह करून धर्माचरण करावें. कारण शास्त्र निश्चय करणाऱ्या वृद्धानीं, दम हाच मुख्य सर्वांस श्रेयस्कर म्हणोन सांगीतला आहे त्यांत ब्राम्हणांस तर विशेषें करून सनातन धर्म हा दमच होय. यास्तव दमानेंच दान, यज्ञ, अध्ययन, तेजोवृद्धि, पवित्रता, निष्पापता व उत्तम ज्ञान इत्यादि सर्व कार्मांच्या यथोक्त सिद्धि प्राप्त होतात. यास्तव सर्व लोकांत अनेक धर्माचरण करणारांस दमासारखा प्रशस्त अन्य धर्म नाहीं. यानेंच यालोकीं व परलोकीं अत्यंत सुख होतें दमवान् पुरुषास निद्रा व जागृति सुखें करून असते. तसाच लोकांत संचार व मनाची प्रसन्नता हें ही दमयुक्त पुरुषास सुखानेंच होतें. ज्यास दम नाहीं त्यास वारंवार स्वदोषानेंच बहूत क्लेश व अनर्थ प्राप्त होतात. यास्तव ब्रम्हचर्यादि चार आश्रमांस दम हेंच उत्तमव्रत होय. त्याचीं लक्षणें सांगतों. क्षमा, धैर्य, अहिंसा, सर्वत्र ईश्वराची समता, सत्य, आर्जव, इंद्रियजय, दक्षता, मृदुत्व, लज्जा, स्थैर्य, अकृपणता, अक्रोध, संतोष, प्रियभाषण, गुरुपूजा, सर्वभूतींदया, भगवंताचे ठिकाणीं निष्ठा व थोरांच्या गुणावर दोषारोप न करणें अशा लक्षणांचा दमापासूनच उदय होतो. तस्मात् जेथें हीं लक्षणें आहेत तेथेंच दम आहे असें जाणावें. आणि पैशुन्य, जनापवाद, असत्यवाद, कोणाची निंदा व स्तुति, काम, क्रोध, लोभ, गर्व, स्तब्धता, बडबड, रोष, ईर्षा व अवमान इत्यादि दोषांनें दमवान् पुरुष सेवन करीत नाहीं. आणि तो सर्व लोकांत स्तुत्य, इच्छा रहित समुद्रासारखा गंभीरपणानें असतो. तसाच मी तुझा व तूं माझा, हें माझें व तें तुझें इत्यादि पूर्व संबंधाचा त्याग करून ग्राम संबंधी व अरण्य संबधी लोकांच्या प्रवृत्तीची निंदा किंवा प्रशंसा करीत

नाहीं. पूर्व संबंध असला तर, त्यापासून मुक्त होतो. आणि सर्वांशीं मैत्री, शी-ल संपन्न, सर्वदां प्रसन्न असून आत्मविचार करीत सर्व संगांपासून मुक्त होतो यास्तव त्यास यालोकीं सत्कार होऊन देहांतीं परलोकीं ही महत्फल प्राप्त होतें. म्हणोनच यालोकीं सत्पुरुषानीं आचरित जें शुभकर्म तेंच ज्ञान मार्गासही साधक होतें. यास्तव ज्ञानयुक्त जितेंद्रिय पुरुषानें गृहाचा त्याग करून वनाचा आश्रय करावा. आणि तेथें ज्ञान मार्गानें काल क्रमण करून देहाचा त्याग केला असतां तो ब्रम्ह प्राप्तीस योग्य होतो. यास्तव त्यापासून सर्व भूतांस व भूतांपासून त्यास यालोकीं परलोकीं ही कोठेंच भय होणार ना-हीं. कारण जो सर्व संगमुक्त होऊन मोक्ष मार्गास प्रवृत्त झाला. त्याची ज-शी आकाशांत पक्षांची गती व उदकांत जलचरांची गती अदृश्य असत्ये तशी त्याची ही गती कोणास गोचर होत नाहीं. व त्यास शाश्वत तेजोम-य उत्तम लोक प्राप्त होतील. तसाच जो, विधिनिषेधरूप कर्में, तपश्चर्या व अनेक विधविद्या या सर्वांचा यथाविधीनें त्याग करून सत्य ज्ञाना नंदात्मक आत्मप्राप्तीची इच्छा करीत प्रसन्न चित्तानें शुचिर्भूत यथेच्छ गमन करूं ला-गला असतां यालोकीं परम सत्कार पाऊन स्वर्गास जाईल. आणि सूक्ष्म लस्थित जें ब्रह्मस्थान तेंही दमानेंच प्राप्त होतें. तसाच ज्ञान मार्गांत रममाण असून सर्वांभूतीं विरोध न करणाऱ्यास येथें जन्ममरणाचें भय नाहीं. मग; परलोकीं तर कोठून असेल. आतां दमाचे ठिकाणीं एकमात्र दोष आहे. तो असा कीं, ज्यास क्षमा असत्ये त्यास सामान्यजन अशक्त म्हणतात. परंतु, तो दोष असून महान् गुण होतो. कीं, जे उत्तमलोक दुर्लभ असून क्षमेकरूनच सुलभ होतात. आणि सहन शक्तिही येत्ये. तसाच दमयुक्त पुरुष जेथें वास करील तें अरण्य असो किंवा आश्रम असो, त्यास समानच आहे. वैशंपायन म्हणतात. हे जन्मेजया, असें भीष्माचें वाक्य श्रवण करून युधिष्ठिरास अमृत प्राशन केल्या साररवी तृप्ति होऊ-न परम हर्ष झाला. आणि पुनः प्रश्न केल्या नंतर, धर्मात्मे भीष्म, बहुप्रीतीनें धर्मराजास सांगतात. असा विषय या अध्यायांत आहे.

३१. अध्याय एकतिसावा:- भीष्म बोलतात हे धर्मराजा, कविजनहूं

कर्मांचें फल सर्व तपोमूलकच आहे असें सांगतात. कारण ज्यानें तप केलें ना हीं त्यास कर्मफल प्राप्त होत नाहीं ब्रह्मदेवानें तप करून सर्व जग उत्पन्न केलें. तसेंच ऋषींस तपानेंच वेद प्राप्त झाले. सिध्द तपानेंच त्रैलोक्य दर्शन घेतात. औषधादिक सर्व कर्में तपानेंच सिध्दी पावतात. ऋषींनीं तप करून दुर्लभ ऐश्वर्यें प्राप्त केलीं. मनुष्य तपानेंच सुरापानादिक पातकापासून मुक्त होतात. तपाचीं स्वरूपें बहूत आहेत. त्यांत उपोषणा हून श्रेष्ठ तप कोणचें नाहीं; आणि दानासारखें दुष्कर्म कोणचेंच नाहीं. व मातोश्रीचा त्याग करून कोणताही आश्रम नाहीं. तपानेंच ऋषी, पितर, देव, मनुष्य, मृग, पक्षी इत्यादिक महत्व पावले आणि तपानेंच देवतादिक हीं प्राप्त होतात. असा विषय या अध्यायांत आहे.

३२. अध्याय बत्तिसावा:- युधिष्टिर प्रश्न करितो हे पितामहा, ब्राह्मण, पितर, देव हे सर्व सत्य धर्माची प्रशंसा करितात यास्तव त्याचें लक्षण कोणतें व तें कसें प्राप्त होतें? असें ऐकून भीष्म बोलतात हे राजा, चातुर वर्णाश्रम धर्मांचा संकर कधींच प्रशस्त नाहीं; आणि सत्य हें सर्व वर्णां सही निर्दोष आहे. सत् पुरुषांस सत्यच मुख्य धर्म आहे व सत्यानें- च उत्तम गती प्राप्त होते व तप योग, धर्म, यज्ञ इत्यादिक सर्व सत्याचे- च ठिकाणीं वास करितात त्यास त्याचें लक्षण यथाक्रमानें मी तुला सांगतों. सर्व लोकांत सत्याचे प्रकार समता, दम, अमात्सर्य, क्षमा, ह्री, तितिक्षा, अनसूयता, त्याग, ध्यान आर्यत्व, धृती, सतत दया, अहिंसा. इत्यादिक तेरा आहेत. सत्य हें अविनाशी असून निरंतर विघ्न रहित आहे. व सर्व धर्मा विरुद्ध योगानें तें प्राप्त होतें. समता म्हणजे आपण इष्ट व अनिष्ट इत्यादिकांस समान पाहाणें, हें इच्छा, द्वेष, काम, क्रोध यांचा नाश झाला म्हणजे प्राप्त होतें. दम म्हणजे अन्यविषयांची इच्छा न धरणें. निरंतर गंभीरपणा, धैर्य, अभय, रोगाचें शमन इत्यादिक आहेत. हीं ज्ञानानें प्राप्त होतात. अमात्सर्य म्हणजे दान व धर्म या विषयींचा नियम करणें हें निरंतर सत्यानेंच वागण्या- शसच घडतें. क्षमा म्हणजे कोणीं आपलें इष्ट व अनिष्ट केलें असतां

ही सहन करणें हें साधुत्वानेंच प्राप्त होतें. ही म्हणजे निरंतर दुसऱ्या-
चें कल्याण करणें व आपण कधींही ग्लान न होतां वाणी व मन निरंत
र शांत ठेवणें. हें धर्मानें प्राप्त होतें. तितिक्षा म्हणजे धर्मार्थी करितां
लोकसंग्रहार्थ क्षमा करणे; ती धैर्यानें लब्ध होते. त्याग म्हणजे स्नेह व
विषयाचा परित्याग करणें हें राग द्वेष हीनास घडतें. ध्यान (विषयत्यागाचें
अनुसंधान) आर्यता (प्रीतिबद्ध न होतां प्राणिमात्राचें यत्नानें चांगलें करणें) धृती
म्हणजे सुख किंवा दुःख प्राप्त झालें असतां मनाला विकार न होणें.
ही धृती कल्याण इच्छीणारानें अवश्य धारण करावी. ज्यास हर्ष, भय,
क्रोध नाहीं त्यासच ही प्राप्त होते. सतत दया म्हणजे निरंतर प्राणी
मात्रास दुःख झालें असतां त्या पासून सोडविण्याची इच्छा धरणें.
अहिंसा म्हणजे कर्म, मन, वाणी यांच्या योगानें प्राणीमात्रांचा द्रोह
न करणें. असे सत्याचे तेरा प्रकार आहेत. सत्याच्या गुणाचें कथन
करण्यास अंत लागणार नाहीं; यास्तव ब्राम्हण, पितर, देव हे सत्या
ची प्रशंसा करितात. सत्याहून श्रेष्ठ धर्म नाहीं व अनृताहून दुसरें श्रे
ष्ठ पातक नाहीं. तस्मात् सत्याचें रक्षण करावें सत्यानेंच अग्निहोत्रें
वगैरे सफल होतात. सत्य हें सहस्त्र अश्वमेधाहून ही अधिक आहे.
असा विषय या अध्यायांत आहे.

३३. अध्याय तेहेतिसावा:— धर्मराज प्रश्न करतो हे भीष्मा, क्रो
ध, काम, शोक, मोह, विधित्सा, परासुत्व, लोभ, मात्सर्य, ईर्षा, निंदा
असूया, कृपा हीं सर्व कोणापासून उत्पन्न होतात हें मला सांगा. असें
ऐकून भीष्म बोलतात हे महाराजा, या शरीरांत प्राणि मात्रास अ-
ति बलाढ्य तेरा शत्रु आहेत, हे प्रमत्त पुरुषास लांडग्या सारिखे बला-
त्कानें उपद्रव करितात. या पासून पाप व दुःख होतें असें मनुष्यानें
निरंतर समजावें. या शत्रूंचे उदय, स्थिति, क्षय कसे होतात हें मी तु
ला सांगतो. कांहीं कारणानें लोभ नष्ट झाला म्हणजे परावर दोष दृ-
ष्टीनें क्रोध उत्पन्न होतो. तो क्षमेनें निरुद्ध होऊन नाहींसा होतो. काम-
हा मनांत विषय इच्छा झाल्या पासून उत्पन्न होतो. जेव्हां इच्छा नष्ट होत्ये

तेणेंकरून व काम नष्ट होतो व क्रोध लोभापासून परावर दोष दृष्टि उत्पन्न होत्ये तिला परासूया म्हणतात. ती पुरुषास तत्वज्ञान झालें म्हणजे सर्व प्राणि मात्रावर दया व वैराग्य होऊन नष्ट होत्ये. अज्ञानानें पापा चा अभ्यास झाला म्हणजे पुरुषास मोह उत्पन्न होतो तो पुरुष जे-व्हां प्राज्ञ जनाशीं रमतो तेव्हांच मोह नष्ट होतो जे पुरुष विरुद्ध शास्त्रें पाहतात त्यांस विधित्सा ( कार्यारंभाविषयीं निपुणता ) उत्पन्न हो त्ये ती तत्वज्ञानानें निवृत्त होत्ये. आणि प्राणिमात्रास प्रिय वस्तूच्या वियोगानें शोक होतो तो प्रिय वस्तूचा लाभ होणें दुर्लभ असें ज्ञान झा लें म्हणजे नष्ट होतो. परासूता ( अत्यंत अकार्याविषयीं परस्वाधीन होणें ) ही क्रोध व लोभ यांच्या अभ्यासानें प्रवृत्त होत्ये ती सर्व प्राणि मात्रांवर दया व वैराग्य यानीं निवृत्त होत्ये. सत्याच्या त्यागानें व अहि ताच्या सेवनानें मात्सर्य उत्पन्न होतें. तें साधु सेवनानें क्षय पावतें. कुल, ज्ञान, ऐश्वर्य यांपासून प्राण्यास मद उत्पन्न होतो. तो कुलादि-कांचें चांगलें ज्ञान झालें म्हणजे नष्ट होतो. काम व हर्ष यां पासून ई र्षा प्राप्त होत्ये तीज्ञानानें नाश पावत्ये. लोक बाह्यांच्या द्वेषवाक्या नीं कुत्सा ( निंदा ) उत्पन्न होते. ती लोकांस पाहून शांत होत्ये. बला ढ्य अपराध करणारा यांस यथायोग्य प्रतिकार करण्यास जे अ समर्थ होतात त्यास असूया उत्पन्न होत्ये. ती दयेनें निवृत्त होत्ये. आणि निरंतर दीन जनांस पाहिल्यानें कृपा उत्पन्न होत्ये. ती धर्म निष्ठेच्या ज्ञानानें शांत होत्ये. प्राणिमात्रांस सर्व काल अज्ञानानेंच लोभ उत्पन्न होतो. तो विषय भोगांच्या अशाश्वत ज्ञानानें नष्ट होतो. हे तेरा शत्रु शमानेंच जिंकिले जातात. हे तेरा दोष धृतराष्ट्र पुत्रांत आहेत परंतु तूं मात्र ते श्रेष्ठ लोकांच्या सेवनानें सत्य पालना करि-तां निरंतर जिंकिलेस. असा विषय या अध्यायांत आहे.

३४. अध्याय चवतिसावा.- युधिष्ठिर प्रश्न करितो हे भिष्मा, मी सर्वकाल आनृशंस्य ( अघातुकपणा ) हा सत्पुरुषांचा धर्म आहे असें मी साधारण त्यांच्या आचरणावरून समजतों: तथापि तुम्ही

सत्व ( घातुकपणा ) जाणल्यावांचून त्याचें विशेष ज्ञान होणें अश क्य आहे यास्तव नृशंसाचेंच स्वरूपादिक सांगा. असें ऐकून भीष्म बोलतात हे युधिष्ठिरा, जाच्या कर्माची स्पृहा व विधित्सा निंद्य होईल तो, जो दुसऱ्याची निंदा करितो व जो सर्वांनीं निंद्य असतो. आणि दैवानें वंचित झाल्यामुळें मीं असें कुत्सित कर्म करीन असें जाणून पुनः तेंच कर्म करतो त्यास आत्मघाति व नृशंसकर्म करणारा म्हणावें. आणि दिलेल्याची प्रशंसा करून आपलें दान शूरत्व जो दाखवितो, जो दुसऱ्यांचा द्वेष करतो व नीच कर्म करणारा, स्नेह दाखवून वंचना करणारा, धनिकत्व असून दारिद्र्य दाखविणारा, मानी, स्त्री संगी, बडबड करणारा, सर्वत्र शंका घेणारा, काकासमान वंचक दृष्टि, दैन्य दाखविणारा. समुदायाची प्रशंसा करणारा. ( कोणी आपला दोष कथन केला असतां समुदायावर दोष स्थापन करतो ) आश्रमाचा द्वेष करून संकर करणारा, दुसऱ्याची हिंसा करून आपण क्रीडा करणारा, बहुत अनृत भाषण करणारा, मनास येईल तसें वागणारा, अति लोभी या सर्वांस नृशंस कर्म करणारे असें म्हणावें. धर्मशील व गुणानें संपन्न अशा मनुष्यास पापि असें जो जाणतो व आपल्याशीला प्रमाणें कोणावर विश्वास ठेवित नाहीं. दुसऱ्याचा दोष गुप्त असतां उघड करतो, समान दोष असतां दुसऱ्याचे जीविकेचा घात करितो, तसेंच उपकार करणाऱ्या पुरुषास वंचना करणारा असें मानितो, जो समर्थ उपकारी पुरुषास धन देऊन संतापवितो, लोक पहात असतां भक्ष्यादि उत्तम पदार्थांचें भोजन करतो, या सर्वांस नृशंस असें म्हणावें. जो पुरुष ब्राम्हणास उत्तम अन्नदान करून सुहृज्जनासहित जो भोजन करतो तो या लोकीं व परलोकीं अनंत फल पावतो. हे धर्मराजा हें तुला नृशंसाचें स्वरूप सांगितलें. हा नृशंस पुरुष ज्ञानि पुरुषानें सर्व कार्यांत वर्ज करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

३५. अध्याय पस्तीस.— भीष्म बोलतात हे धर्मराजा, आतां सर्व अपत्तिचें मूळ म्हणजे पापाचें प्रायश्चित न करणारास आपद्रूप पीडा होत्ये.

म्हणून प्रायश्चित सांगतो. जे धर्मानें भिक्षा मागतात अशा ब्राम्हणांस साधु असें म्हणावें. ज्याचें द्रव्य चोरानी हरण केलें व जो यज्ञ करतो व वेदांत पारग असतो या सर्वांस धन नसल्यास धन द्यावें. अन्य ब्राम्हणांसही अपक्कान्न द्यावें. राजानें आपल्या योग्यतेप्रमाणें सर्व रत्नें ही द्यावीत. कारण ब्राह्मणाच वेद, बहु दक्षणा युक्त यज्ञ, यास आपल्या गुणानें सर्वदां संपादन करतात. ज्याजवळ तीन वर्षांचें अन्न सेवकांच्या निर्वाहपुरतें आहे किंवा अधिक आहे तो सोमपान करण्या योग्य होतो. ब्राम्हणांच्या यज्ञास द्रव्यादिकांच्या कारणानें प्रतिबद्ध होईल तर धार्मिक राजानें जो वैश्य बहुत पशूनीं युक्त असून यज्ञ करीत नाहीं व सोमपानही करीत नाहीं त्या वैश्याचें द्रव्य यज्ञार्थ घेऊन ब्राम्हणास द्यावें. शूद्राच्या घरांतून मात्र द्रव्य हरण करूं नये कारण यज्ञांत शूद्राचा प्रतिग्रह ब्राम्हणास नाहीं. आणि जे शंभर गाई बाळगित असून अग्निचें रक्षण करीत नाहीत व सहस्त्र गाई बाळगून यज्ञ करीत नाहींत त्यांच्याही कुटुंबा पासून राजानें विचार न करितां ब्राम्हणाच्या यज्ञार्थ द्रव्य हरण करावें तसेंच अदात्या पासूनही द्रव्य हरण करावें. या रीतीनें आचरण करणाऱ्या राजाचा धर्म परिपूर्ण होईल. तसेंच साहा दिवस उपोषण झालेल्या ब्राम्हणानेंही नकर्म करणाऱ्या पुरुषा पासूनही एकादिवसा पुरतें अन्न जसें सांपडेल तसें घेऊन राजास कळवावें राजानें त्यास दंड करूं नये. कारण ब्राम्हण क्षुधेनें पीडित झाला असतां राजाच दोषी होतो. यास्तव श्रुतशील जाणून राजानें ब्राम्हणाची उपजीविका चालवावी आणि पिता जसा पुत्राचें संरक्षण करतो तसें ब्राम्हणाचें रक्षण करावें. प्रतिवर्षी कर्तव्य जे आग्रयण पशु सोमादिक ते न केले असतां वैश्वानरी इष्टि करावी. हा अनुकल्प धर्मज्ञ पुरुषानीं उत्तम धर्म म्हणून सांगितला आहे. या विषयीं प्रमाण हेंच कीं, हा विधि विश्वेदेव, साध्य, ब्राम्हण, महर्षी यानीं आपत्तिकालीं मृत्युच्या भयानें प्रतिनिधी योजिला आहे. मुख्य पक्षा विषयीं जो समर्थ आहे त्यानें अनुकल्प केला असतां त्या दुर्मतीस पारलौकिक फल मिळत नाहीं. वेदवेत्त्या ब्राम्हणानें कोणतें ही कर्म करणें असेल तर राजास सांग-

ण्याचें कारण नाहीं. कारण राजवीर्यापेक्षां ब्रम्हवीर्य श्रेष्ठ आहे. यास्तव ब्रम्हवेत्त्यांचें तेज राजास दुःसह आहे. त्या ब्राम्हणांशीं राजानें वृथा भाषण करूं नये. राजानें बाहुवीर्यानें आपली आपत्ति दूर करावी. वैश्य व शूद्र याणीं धन संपादन करून व ब्राम्हणानीं मंत्र होमानीं आपत्ति दूर करावी. कन्या, युवति, मंत्र न जाणणारा, मूर्ख, असंस्कृत यानीं अग्निहोत्र संबंधीं आहुतिचा प्रक्षेप करूं नये केला असतां ते नरकांत पडतात. तस्मात् वेदपरंगत जो असेल त्यानें आहुति टाकाव्या. जो पुरुष अहिताग्नी असून अग्न्याधानाची दक्षणा देत नाहीं त्यास धर्मवेत्ते अनाहिताग्नि म्हणतात. पुरुष जितेंद्रीय होऊन श्रद्धेनें जीं पुण्यकर्मे करतो त्यांत दक्षिणा दिल्यावांचून यज्ञ करूं नये. कारण अदक्षिण यज्ञ, प्रजा, पशू, स्वर्गयांचा नाश करून इंद्रियें, यश, कीर्ती, आयुष्य, यांचाही नाश करितो, जे द्विज, रजस्वलेशीं संगत होतात व अनग्नि असतात तसेंच ज्यांच्या होमांत श्रोत्रिय ब्राम्हण नसतो ते सर्व पातकी होत. जो ब्राम्हण एकच विहीर असलेल्या ग्रामांत बारा वर्षे राहातो व जो शूद्रीचें सेवन करतो तो शूद्रच होतो. जो पुरुष अविवाहित स्त्रीशीं संग करतो आणि जो, क्षत्रिय वैश्य यांस श्रेष्ठ मानून त्यांचे पाठिमागें आसनावर बसतो हे सर्व कसे शुद्ध होतील तें ऐक. जो ब्राम्हण एक रात्रही न वर्णव पापी यांचें सेवन करील त्यां बरोबर जो विहार करतो तो तीन वर्षे व्रतानें वागला असतां आपल्या पापा पासून मुक्त होतो. स्त्रिया, विवाह कालीं, गुरु करितां, आपल्या जिविताचा रक्षणार्थ, थट्टा या पांच ठिकाणीं अनृत भाषण केलें असतां दोष नाहीं. पुरुषानें हीना पासून ही चांगली विद्या घ्यावी. अपवित्र स्थाना पासून ही विचार न करितां सुवर्ण घ्यावें दुःकुला पासून ही स्त्री रत्न संपादन करावें. विषा पासून अमृत प्राशन करावें. कारण स्त्रिया, रत्नें, उदक, हीं धर्मा प्रमाणें दोष रहित आहेत. वैश्यानें वर्ण संकर झाला असतां गोब्राम्हणांच्या हितार्थ व आपल्या संरक्षणा करितां शस्त्र धरावें. सुरापान, ब्रम्हहत्या, गुरुस्त्रीशीं गमन हीं पातकें बुद्धिपूर्वक घडलीं असतां त्यास प्राणांता वांचून दुसरें प्रायश्चितच नाहीं असा

निश्चय आहे. सुवर्ण चोरणें, ब्रम्हस्व हरण, मद्यपान, अगम्यागमन, पतितांशीं संसर्ग, ब्राम्हणस्त्रीशीं गमन हीं पातकें कोणास घडलीं असतां तो तरीतच पतित होतो. पतितांशीं एक संवत्सर सहवास केला असतां पातित्य प्राप्त होतें. तसेंच याजन, अध्यापन, विवाह, हीं घडलीं असतां तत्काळ पातित्य प्राप्त होतें. तसेंच या पंचमहा पातकांशिवाय दुसऱ्या पातकांस प्रायश्चित्तें आहेत; परंतु प्रायश्चित्त केल्या नंतर पुनः त्या पातकाची अभिरुची जो न धरील त्यास प्रायश्चित्तें आहेत. सुरापी, ब्रम्हघ्न, गुरु स्त्रीशीं गमन करणारा हे तीन पातकी मृत झाल्या नंतर दहनादिक केल्याच्या पूर्वी त्यांच्या सपिंडाच्या घरीं अन्न, वीर्य, सुवर्ण इत्यादिक ग्रहण करण्यास चिंता नाहीं. कारण ते मृत झाले असतां सपिंडास आशौच नसून प्रेत कर्म करण्याचाही निषेध आहे. धार्मिक राजानें धर्मा प्रमाणें आपले अमात्य, गुरु हे पतित झाले असतां त्यां बरोबर कोणताही मंत्रविचार न करितां त्यांचा त्याग करावा व त्यांशीं भाषणादिक घडलें असतां त्यानें प्रायश्चित घ्यावें. अधर्म करणारानें धर्म व तप केल्यानें त्याचें पातक नष्ट होतें. जो पुरुष चोर कर्म करणारास चोर असें बोलेल त्यास त्या चोराचें पातक प्राप्त होतें व चोरी न करणारास चोर असें म्हणेल तर दुप्पट पातक लागतें जी कन्या अविवाहित असूनही मैथुनाची इच्छा करत्ये तिला ब्रम्हहत्येच्या त्रितियांश पातक घडतें. जो तिची निंदा करतो त्यास ब्रह्म हत्येचे दोन भाग प्राप्त होतात. ब्राम्हणास शिविगाळ करून जो धक्का देईल. त्यास ब्रम्हहत्येच्या दोन अंशा पेक्षां अधिक पातक लागतें. व तो शंभर वर्षेपर्यंत प्रेतत्वा पासून मुक्त न होतां सहस्त्र वर्षेपर्यंत नरकांत राहातो ब्राम्हणास क्षत पडून त्यांतील रक्तानें जितके भूमीवरील रजःकण भिजतील तितकीं वर्षे पुरुषास नरक प्राप्त होतो. ब्रह्महत्या करणारा संग्रामांत गोब्राम्हण रक्षणार्थ शस्त्रानें हत झाला म्हणजे अथवा प्रदीप्त अग्नींत आपल्या शरीराचें हवन केल्यानें शुद्ध होतो. सुरापान करणारा, उष्ण, वारुणी, मदिरा प्राशन करून तिच्या योगें शरीर दग्ध झालें अथवा मृत्यु पावला असतां शुद्ध होऊन

उत्तमलोक पावतो. गुरुस्त्रीशीं गमन करणारा लोखंडाची तप्तस्त्रीप्रति माइचें आलिंगन करून मृत्यु पावला म्हणजे शुद्ध होतो अथवा त्यानें आपल्या अंजलिनें शिश्नवृषण धरून नैर्ऋति दिशेस जाऊन पडावें किंवा ब्राम्हणा करितां प्राणत्याग करावा, म्हणजे शुद्ध होतो. किंवा अश्वमेध यज्ञ, अथवा गोसव किंवा अग्नीष्टोम केला म्हणजे या लोकीं व परलोकीं पूजित होतो. तसेंच ब्रह्महत्या करणारानें ब्रम्हचर्यानें बारा वर्षे वागून आपलें कर्म मृत्युलोकांत प्रगट करील कपाल घेऊन भिक्षाटण करावें. असें करीत त्रिकाल स्नान केलें म्हणजे तो मुक्त होतो. याप्रमाणे जो कोणी हत्या करील त्यास ब्रम्हहत्येचें दुष्पट पातक लागतें. सुरापान करणारानें परमित आहार करून ब्रह्मचर्यानें भूमीवर तीनवर्षे शयन करीत अग्नीष्टोम करावा. अथवा सहस्त्र वृषभ किंवा गायी ब्राम्हणास द्याव्या. म्हणजे तो शुद्ध होतो. तसेंच वैश्य हत्या करणारानें दोन वर्षेपर्यंत पूर्वी सांगितल्या प्रमाणें वर्तणूक करून एकशत वृषभव शतगाई द्याव्या म्हणजे तो त्या पातकापासून मुक्त होतो. शूद्रहत्या करणारा एकवर्ष पर्यंत पूर्वी सांगितल्याप्रमाणें व्रत करून शत वृषभवशत गाई देईल तर तो त्या पातका पासून मुक्त होतो. श्वान, वराह, गर्दभ यांची हत्या जो करतो त्यानें शूद्र हत्येचें व्रत करावें म्हणजे तो मुक्त होतो. मार्जार, चाष, बेडूक, कावळा, सर्प, उंदीर याची हत्या करणारास पशू हत्ये प्रमाणें दोष सांगितला आहे हे राजा, आणखी दुसरींही प्रायश्चित्तें क्रमानें सांगतो. तीं अशीं कीं, कीटवधादि अल्पपाप अज्ञानानें घडून तें समजण्यांत आल्यावर पश्चाताप झाला असतां त्यानेंच तो पुरुष शुद्ध होतो. गोवधाशिवाय कोणतेही उपपातकाचें प्रायश्चित संवत्सर पर्यंत आचरण करावें. श्रोत्रिय भार्येशीं गमन केलें असतां तीन संवत्सर पर्यंत. व परस्त्रीशीं गमन केलें असतां दोन वर्षे पर्यंत पुढें सांगितल्या नियमा प्रमाणें वर्तून प्रायश्चित करावें तो नियम असा कीं, ब्रह्मचर्यव्रतानें राहून तीन दिवसांनीं चतुर्थप्रहरांत भोजन करावें. जो कोणी विना कारण अग्निचा त्याग करील व पिता, माता, गुरु यांचा त्याग करील, तो धर्म शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पतित होतो.

त्यास ग्रास व आच्छादन मात्र द्यावें. स्त्रीनें व्यभिचार केला असतां तिला प्रतिबंधांत ठेवावें. आणि पुरुषानें परस्त्रीशीं गमन केलें असतां त्यास जें प्रायश्चितार्थव्रत सांगितलें आहे तेंच तिजकडून करवावें. तें असें कीं, जी स्त्री आपला ब्राम्हणपती सोडून दुसऱ्याहीनवर्ण पुरुषाशीं गमन करत्ये. तीस राजानें विस्तीर्णजाग्यांत कुत्र्यांकडुन मर्दन करवावेंव त्याहीन पुरुषास तापलेल्या लोखंडी शयनावर काष्टें ठेवून दहन करावा. हे राजा, स्त्रियांस पतीच्या अतिक्रमा बदल हा दंड सांगितला आहे कोणी पुरुष आपल्यास पातकाचा अपवाद प्राप्त झाला असून तत्काल प्रायश्चित्त न करितां संवत्सर पर्यंत राहील त्यास त्याच्या दुप्पट प्रायश्चित्त आहे. कोणी पुरुष पतिताशीं दोन, तीन किंवा चार वर्षे पर्यंत संसर्ग करील त्यानें पांच वर्षे भिक्षा मागून पृथ्वी पर्यटण करावें म्हणजे तो मुक्त होतो. जेष्ट बंधूच्या पूर्वीं कनिष्ट बंधूनें लग्न झालें असतां, जेष्टबंधु, कनिष्ट बंधू व त्याची स्त्री हीं तीन पतित होतात. त्यानीं वीरहत्या करणारास जें व्रत सांगितलें आहे तें आचरण करावें. अथवा पाप शुध्यर्थ त्यानीं एक मास चांद्रायण किंवा कृच्छ्र व्रत करावें. आणि कनिष्ट बंधूनें तिचा उपभोग न करितां जेष्ट बंधूस सन्मार्ग पूर्वक स्नुषा ह्मणून अर्पण करावी. नंतर जेष्ट बंधूनें आज्ञा दिल्यावर कनिष्टानें तिचा स्विकार करावा. म्हणजे ते तिघेही पाप मुक्त होतात. पशुजातींत गाई शिवाय अन्य पशूंचें जरी पोषण केलें नाहीं तरी त्यास दोष नाहीं. ब्राम्हणानेंच मरी (वनगाय) पुच्छाचें वस्त्र परिधान केलें असतां त्यानें मृत्तिकेचें पात्र घेऊन नित्य सात घरीं स्वकर्माचें कथन करून बारा दिवस जावें. आणि जें मिळेल तेंच भक्षावें. म्हणजे तो शुद्ध होतो. आणि जो ब्राम्हण आपल्यावस्त्रा करितां चमरी मृगाचें पुच्छ तोडतो त्यानें सांगितलेलें व्रत एक वर्ष करावें. म्हणजे तो शुद्ध होतो. दान करण्यास समर्थ जे आहेत त्यांनीं वरील व्रत करून एक गोदान करावें. जो श्वान, डुकर, मनुष्य, कुक्कुट, गर्दभ यांचें मांस, मूत्र, विष्ठा, भक्षण करील तो पुनः मुंजीस योग्य होतो. सोमपान करणाऱ्या ब्राम्हणानें सुरापान करणाऱ्याच्या मुखाचा वास घेतला असतां तीन

दिवस उष्णोदक व साहादिवस उष्ण दूध पिऊन तीन दिवस वायुभक्षण करावें हें अज्ञानानें घडल्यास प्रायश्चित्त होय. असा विषय या अध्यायांत आहे.

३६. अध्याय छत्तिसावा.– वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, अशीं प्रायश्चित्तें ऐकिल्यावर नकुल भीष्मास बोलतो हे भीष्मा, सर्व आयुधांत धनुष्य श्रेष्ठ परंतु त्यापेक्षां खड्गच श्रेष्ठ असें मला वाटतें. कारण धनुष्य, अश्व हे क्षय पावले असतां खड्गानेंच आपलें रणामध्यें सहज संरक्षण होतें. सर्व आयुधें धारण करणारांस खड्गधारीच पराजित करण्यास समर्थ होतो. तेव्हां मला संशय आहे कीं, सर्वायुधांत कोणतें आयुध श्रेष्ठ, व खड्ग कशा करितां कोणी कसा उत्पन्न केला? हें मला सांग. असें ऐकून भीष्म सांगतात हे नकुला, पूर्वीं हें जग जलमय असतां त्यांत प्रथम ब्रह्मदेव झाले त्यानी वायु, अग्नी, सूर्य, आकाश, उर्ध्व व भुमी, चंद्र, तारा, नक्षत्रें ग्रह, संवत्सर, ऋतु, मास, लव आणि क्षण हे उत्पन्न केले; नंतर लोकांत शरीर स्थापन करून उत्तम तेजस्वी मरीची, अत्री, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, आंगिरस, रुद्र हे पुत्र उत्पन्न केले. तसेच प्राचेतस दक्षानें साठ कंन्या उत्पन्न केल्या त्या सर्व ब्रम्हर्षींनीं प्रजे करितां वरिल्या. त्यां पासून संपूर्ण भूतें, देव, पितृगण गंधर्व, अप्सरा, राक्षस, मृग, वानर, उरग तसेच जलस्थलांत संचार करणारे पक्षी इत्यादिक सर्व उत्पन्न झाले तसेंच उद्भिजादिक स्थावर जंगमात्मक जग उत्पन्न झालें अशी ब्रम्हदेवानीं सृष्टी करून वेदपठित. व अनादि धर्म योजिला. त्या धर्मानें आदित्यादिक सर्व देव, भृग्वादिक सर्व सिद्ध व सिष्ठादिक ऋषी, वालखिल्य हंस प्रभृती ऋषी हे सर्व वागूं लागले. दानव श्रेष्ठानीं क्रोध व लोभ या मुळें ब्रम्हदेवाच्या आज्ञेचें उल्लंघन करून धर्माचा नाश केला. हिरण्यकशिपु, हिरण्याक्ष, विप्रचिती प्रभृती दानव धर्म मर्यादेचें उल्लंघन करून देवादिकांशीं स्पर्धा करीत वागत असून प्राणीमात्रांचें प्रीय न करितां निर्दयपणानें सामादिक उपायांचा परित्याग करून दंडानेंच प्रजांचा निरोध करूं लागले तेव्हां ब्रम्हर्षीसहित ब्रम्हदेवानीं शतयोजनें विस्तृत रमणीय व पुष्पित वृक्षानीं युक्त वनें जामध्यें अशा हिमाल-

याच्या शिखरावर येऊन सर्व लोकांच्या कल्याणार्थ राहून सहस्त्र वर्षांतीं यज्ञ कर्मांत निपुण, यथाविधीनें कर्म करणाऱ्या ऋषींसहित यज्ञ केला. त्यांत यज्ञपात्रें सुवर्णाचीं असून देव गणानीं युक्त, ब्रम्हर्षी ज्यामध्यें सभासद होते व दिव्य समीधानीं अग्नि प्रदीप्त झाले असतां तेथें ऋषि मंडळांत एक भयंकर वृत्त झालेलें मी ऐकिलें. तें असें कीं यज्ञांत अग्नींतून आकाशांत चंद्र जसा उदय पावतो तसें एक भूत उत्पन्न झालें. ज्याचा वर्ण व कांती नील कमला सारखी तीक्ष्ण दाढा, कृश उदर, अपरमित तेज असें तें भूत उड्डाण करीत असतां पृथ्वी चंचल होऊन समुद्र क्षुब्ध झाला, उल्कापात होऊं लागले, वृक्षापासून खांद्या पडूं लागल्या दिशा अशांत झाल्या, वारा फार वाहूं लागला, भूतें भयानें कांपूं लागलीं. अशा त्या भूतांस पाहून ब्रम्हदेव, देव, ऋषी, व गंधर्व यांस बोलतात कीं, हें भूत मीच उत्पन्न केलें. यांस खड्ग म्हणतात. सर्व लोकांच्या रक्षणार्थ व दैत्यांच्या वधार्थ तत्काल त्यानें तें रूप टाकून तें खड्ग स्वरूपानें शोभूं लागलें. तो खड्ग प्रलयकालच्या अंतका सारखा दिसत असून निर्मल; तीक्ष्णधारजाची असा दिसूं लागला. तेव्हां ब्रम्हदेवानें तो खड्ग रुद्रास दिला. नंतर ऋषी स्तवन करीत असतां शिवानीं तो खड्ग घेऊन दुसरें रूप धारण केलें तें असें कीं भूमिवर असून सूर्य मंडळांस स्पर्श करीत मुखांतून ज्वाला निघूं लागल्या आणि ललाटीं एक नेत्र असून दोन नेत्र कृष्ण पिंगल असे होते तेव्हां शूलपाणी महादेवानीं आकाशांत युद्ध करण्याच्या इच्छेनें तो खड्ग फिरवीत नाद केला त्या समयीं सर्व दानव हर्षीत होऊन त्यावर पाषाण व आयुधें यांचा वर्षाव करीत धांवले आणि शंकराच्या भयंकर रूपास पाहून मूर्च्छित होऊन त्यानीं त्या एकारूपास सहस्त्ररूपें मानिलीं त्या कालीं दावाग्नी जसा तृणांत शिरतो तसे शंकर दानव समुहांत शिरून त्यानीं त्या खड्गानें कितीकांचे बाहु, वक्षस्थलें, मांड्या भिन्न केल्यामुळें ते भूमीवर पडले, कितिएक खड्ग प्रहारानें पीडित होऊन दाही दिशांस गेले. कितिएकानीं आकाश, भूमी, जल, यांत प्रवेश केला. असा तो घोर संग्राम होत असतां रक्तानें भरलेलीं दानवांचीं शरीरेंप-

डुन त्या भूमीवर मांस रक्तांचा कर्दम झाला. या प्रकारें शंकरानीं दानवांस मारिल्यावर तें घोर रूप टाकून दिव्य रूप धारण केलें तेव्हां ऋषी, देव शंकराची पूजा करीत जयजयकार करूं लागले. तेव्हां शंकरानीं दानवांच्या रक्तानीं भरलेला खड्ग सत्कार पूर्वक विष्णूस दिला त्यानें मरीचीस, मरीचीनें महर्षींस, त्यानीं इंद्रास, इंद्रानें लोकपालांस व त्यानीं सूर्यपुत्र मनूस तो खड्ग देऊन त्यास भाषण केलें कीं, तूं मनुष्यांचा ईश्वर आहेस यास्तव या धर्मरक्षक खड्गानें प्रजा पालन कर. आणि धर्म मर्यादेचें उल्लंघन जे करतील त्यांस यथान्यायें दंड करून सर्वांचें रक्षण कर. तो दंड असाकीं, दुर्भाषणानें निग्रह करणें, बहुत सुवर्ण घेणे, शरीराचा अवयव भिन्न करणें, महत् कारणानें वध करणें असे त्या दंडाचे भेद आहेत. हीं सर्व खड्गाचींच स्वरूपें आहेत असें जाण. नंतर मनुनें तो खड्ग आपल्या पुत्रास दिला. पुत्रानें प्रजा रक्षणार्थ क्षुपास दिला त्यापासून इक्ष्वाकुनें घेतला. त्यापासून पुरुरवा, आयु, नहुष ययाती, पुरु, अमूर्तया, भूमीशय, दुःष्यंत पुत्र भरत, ऐलविल, धुंधुमार, कांबोज, मुचुकुंद, मरुत, रैवत, युवनाश्व, रघु, हरिणाश्व, शुनक, उशिनर, भोज, यदु, शिबि, प्रतर्दन, अष्टक, पृषदश्व, भरद्वाज, द्रोण, कृपाचार्य या सर्वांनीं तो खड्ग क्रमानें घेतला व कृपाचार्यापासून तूं तो खड्ग बंधूसहित घेतलास. त्या खड्गाचें नक्षत्र कृत्तिका, देवता अग्नि, गोत्र रोहिणी, उत्तम गुरुरुद्र आहे. या खड्गाचीं गुप्त नामें आठ आहेत हे नकुला, ज्यांचें कीर्तन करणारा पुरुष सर्वदां जय पावतो तीं नामें असि, विशसन, खड्ग, तीक्ष्ण धार, दुरासद, श्रीगर्भ, विजय, धर्मपाल, अशीं आहेत. हे नकुला खड्ग हा सर्व आयुधांत श्रेष्ठ असून शंकरापासून प्राप्त झाला. धनुष्य हें प्रथम पृथूनें उत्पन्न केलें त्यानेंच पृथ्वीपासून धान्यें उत्पन्न करून धर्मानें तिचें रक्षण केलें. हे नकुला, हें ऋषीनीं सांगितलेलें प्रमाण आहे यास्तव युद्धकुशलानीं सर्वदां खड्गाची पूजा करावी. हा खड्गोत्पत्तीचा प्रकार विस्तारानें तुला सांगितला. हें खड्ग साधन जो पुरुष श्रवण करतो तो या लोकीं कीर्ती व परलोकीं मोक्ष पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

३७. अध्याय सदतीस:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें शूरांस सर्व आपत्तिनिवारण करण्यास कारण खड्ग आहे म्हणून खड्गोत्पत्तीची कथा सर्वांनीं ऐकिली असतां, उपदेश करणाराने एकच उपदेश केला असतां शिष्य आपआपल्या अभिप्रायानुसार शास्त्र तत्व घेतात ही गोष्ट अरव्यानरूपानें सांगतो. भीष्म बोलून उगीच राहिल्यावर धर्मराज गृहीं जाऊन विदुरासहित आपले बंधूंस प्रश्न करूं लागला कीं, धर्म, अर्थ, काम यांविषयीं सर्वांस लोभ उत्पन्न होतो त्यांत श्रेष्ठ, मध्यम व लघु कोण, काम, क्रोध, लोभ यांस जिंकण्या करितां धर्म, अर्थ, काम या तिघांत कोणाचे ठाईं मन ठेवावें हें सांगा. असें ऐकून विदूर सांगतात हे धर्मराजा, बहुत अध्ययन, स्वधर्माचरण, दान, आस्तिक्य, यज्ञक्रिया, क्षमा, निष्कपटत्व, दया, सत्य ( हिंसाशून्य यथार्थ भाषण ) इंद्रियनिग्रह, धर्मानें ऐश्वर्य, हीं संपादन करून तूं आपलें मन चंचल करूं नकोस, कारण हींच धर्मास कारण आहेत. धर्मानेंच ऋषी तरले. धर्मानें लोक प्रतिष्ठा पावलात. देव धर्मानेंच वाढले. जेथें धर्म तेथेंच अर्थ राहतो धर्म हा श्रेष्ठ, अर्थ मध्यम व काम कनिष्ठ असें विद्वान सांगतात. यास्तव धर्मच प्राधान्यानें संपादन करावा. असें विदुराचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे धर्मराजा, ही कर्मभूमी असल्यामुळें येथें कृषि, वाणिज्य, गोरक्षण, अनेक प्रकारचीं शिल्पें, हींच प्रशस्त आहेत. म्हणून सर्व कर्मांत अर्थच श्रेष्ठ आहे त्याच्या योगानें धर्म, काम हे संपादन होतात. अजिनधारण करणारे, काषाय ( भगवें ) वस्त्र धारण करणारे, विद्वान, नैष्ठिक, ब्रम्हचारी हे सर्वही अर्थवान पुरुषाचेंच निरंतर सेवन करतात. जो पुरुष भृत्यांस भोगांच्या ठायीं योजितो व शत्रूस दंड करितो त्यासच अर्थ प्राप्त होतो. हेंच माझें मत आहे. आतां नकुल सहदेवाचें मत काय आहे तें विचार. असें ऐकून नकुल सहदेव बोलतात हे धर्मराजा, पुरुषानें सर्वकाल कोणत्याही योगानें अर्थ संपादन करावा. तो अर्थ दुर्लभ असून सर्वांस अत्यंत प्रीय आहे त्याच योगें कामही संपादन होतो. धर्मानें अर्थ व अर्थानें धर्म हें जसें घडेल तसें वागावें. अर्थ व धर्म यानीं जो-

हीन त्यास काम संपादन होत नाहीं यास्तव अंतःकरणाचें नीयमन करून धर्मार्थ संपादन करावें नंतर सिद्धार्थ झाल्यावर पुरुषानें काम सेवन करावें. असें आमचें मत आहे या प्रमाणें बोलून ते उगीच राहिले तेव्हां भीम बोलतो हे धर्मा निष्काम पुरुष धर्मार्थाची इच्छा करीत नाहींत यास्तव कामच श्रेष्ठ आहे कामानें युक्त झालेले ऋषी कंद, मूळ, फळें, वायु इत्यादिकांचें भक्षण करीत तप करितात. कोणी वेद उपवेद यांचें अध्ययन कामा करितांच करितात तसेंच श्राध्दादिक कर्मेंहीं कामा करितांच करितात. वाणी, शेतकरी, गवळी, आदिकरून अनेक कारागीर लोक कामा करितांच आपआपलीं कर्में आचरण करितात व कोणी समुद्रांत ही प्रवेश करितात. कामा शिवाय कोणी प्राणी कोणतेंच कर्म करीत नाहीं व त्या करितांच धर्मअर्थ हे आहेत. जसें दह्यापासून लोणी तसा धर्मार्थापासून काम आहे यास्तव धर्म,अर्थ, काम या तिघांत कामच मुख्य आहे. यास्तव धर्मार्थकाम हे तीनही सारखे संपादन करावेत असें माझें मत आहे असें बोलून भीमसेन विराम पावला. तेव्हां त्याच्या वाक्याचें मुहूर्त पर्यंत चिंतन करून बहुश्रुतांत श्रेष्ट. धर्मराज बोलूं लागला हे भ्राते हो, तुम्हींस वेही धर्मशास्त्र प्रमाणें जाणतां आतां माझेंही भाषण ऐका. जो मनुष्य पाप, पुण्य, अर्थ, धर्म, काम, यांत आसक्त नाहीं आणि ज्यास मृत्तिका व सुवर्ण समान आहे तो सर्व दोष व दुःख सुखार्थ सिद्धि यांपासून मुक्त होतो. जीं भूतें जन्म, जरा व मृत्यु यानीं युक्त आहेत तींही मोक्षाचीच प्रशंसा करितात त्या मोक्षास तुम्हीं आम्हीं जाणत नाहीं. ब्रम्हदेवानीं असें सांगितलें आहे कीं, रागद्वेषादिकानीं युक्त जो पुरुष त्यास मोक्ष दुर्लभ आहे म्हणून ज्ञाते पुरुष मोक्ष परायण होऊन प्रिय व अप्रिय, कोणतेंच करीत नाहींत. यास्तव सर्वांत मोक्षच श्रेष्ठ आहे. तोच प्राप्त होण्याविषयीं मी यत्न करतों. संपूर्ण प्राण्यांस प्रारब्धच कोणत्याही कर्मांविषयीं योजितें मोक्ष हा कर्मानें व धर्मार्थ काम यानीं प्राप्त होतो असें नाहीं त्रिवर्गानीं हीन जो आहे त्यासही मोक्ष प्राप्त होतो. तस्मात् मोक्षा करितांच सर्वांनीं यत्न करावा. असें ऐकून सर्वही आनंद पावले आणि कुरुविरास हात

जोडून प्रशंसा करूं लागले. तेव्हां धर्मराजानें सर्वांची प्रशंसा करून पुनः गंगापुत्र जो भीष्म यास प्रश्न केला. असा विषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय अडतीस.– वैशंपायन सांगतात. हे जनमेजया, धर्मराजास भीष्मानीं जें सांगितलें तें सांगतों. धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा सौम्य मनुष्य कसे असतात, कोणापासून अतिशय प्रीति होईल, परिणामी व विद्यमान कालीं हितास योग्य काय, जेथें सत्‌जन राहतात तेथें बहुत धन नसून संबंधही नसतो. हित सांगणारा व ऐकणारा मित्र दुर्लभ आहे असें मला वाटतें. यास्तव सांगा. असें ऐकून भीष्म बोलतो हे राजा, आतां मित्र करण्यास व न करण्यास योग्य पुरुष कोणते ते सांगतों. लुब्ध, क्रूर, धर्मत्याग करणारा, कपटी. शठ, क्षुद्र व पापाचरण करणारा, सर्वांवर संशय घेणारा. आळशी, सावकाशपणें काम करणारा, लोकनिंद्य, सरळ न वागणारा, संकटकाळीं मित्राचा त्याग करणारा, गुरुस्त्रीशीं गमन करणारा, दुरात्मा, निर्लज्य, सर्वत्र पापदृष्टि, नास्तिक, वेदनिंदक, असत्य बोलणारा. लोकांशीं द्वेष करणारा, समयास उपयोगीं न पडणारा, मर्यादा न करणारा, मत्सरी, दुष्ट स्वभावाचा, घातकी, धूर्त, निरंतर दुसऱ्याचा अर्थ इच्छिणारा, यथा शक्ति देणारावर संतुष्ट नसणारा, कारण नसून क्रोध पावतो तो, मित्रांचा परित्याग करतो तो, मद्यपी, निर्दय, कठोर भाषण करणारा, दुसऱ्यास ताप देणारा, कृतघ्न, छिद्रशोधक हे सर्व संधि करण्यास योग्य नाहींत. कुलीन, यथार्थ भाषण करणारा, शास्त्रियज्ञान व अनुभव यानीं युक्त, रूपवान, गुणवान्, निर्लोभी, जितश्रम, सुमित्र, उपकार जाणणारा, सर्वज्ञ, माधुर्य गुणानें संपन्न, सत्यप्रतिज्ञ, जितेंद्रिय, उद्योगशील, कुलवृद्धी कर्ता, निर्दोषी, हे सर्व राजानें संधी करण्यास योग्य आहेत आणि विनाकारण क्रोध न पावणारे, अकस्मात् वैराग्य दाखवीत नाहींत ते, मनानें दुसऱ्याचें इच्छित जाणणारे, आपल्यास पीडित करून ही मित्रकार्याविषयीं तत्पर, निर्धन पुरुष व तरुण स्त्रीयांचे ठायीं क्रोध, लोभ, मोह यानीं वैराग्य न दाखविणारे, विश्वासू, धर्मवत्सल, मृत्तिका व सुवर्ण यांस समान मानणारे, मित्राविषयीं दृढ बुद्धि, प्रमा

णभूत शास्त्रें व प्रारब्ध कर्मानें प्राप्त झालेल्या अर्थानें अनुसरण करून अभिमान न करणारे स्वजनांचा संग्रह करणारे, स्वामी कार्यासक्त, असे जे पुरुष त्यांशीं राजानें संधी करावा, म्हणजे त्या राजाचें राज्य विस्तार पावतें. कृतघ्न, मित्र घातकी, दुराचारी असे पुरुष सर्वथा वर्ज करावे. असें ऐकून युधिष्टीर बोलतो हे भीष्मा, मित्रद्रोही व कृतघ्न म्हणून जे तुम्हीं सांगीतले ते विस्तारानें मला सांगा. असें एकून भीष्म बोललात हे राजा, उत्तर दिशेसम्लेंच्छ देशीं झालेला इतिहास सांगतों. कोणी एक ब्रम्ह कर्म वर्ज केलेला मध्य देशांतील ब्राम्हण भिक्षेच्या इच्छेनें एका ग्रामांत गेला. तेथें ब्राम्हण भक्ती असून सत्य प्रतिज्ञ, दान शूर, धनवान असा कोणी चोर होता त्याचे घरीं जाऊन त्या ब्राम्हणानें भिक्षा मागतांच त्या चोरानें राहाण्यास जागा व वर्षाची भिक्षा दिली आणि त्या ब्राम्हणास नवें वस्त्र व तरुण दासीही दिली असें चोरापासून प्राप्त झाल्यावर तो गोतमनामा ब्राम्हण त्या घरांत दासीसह वर्तमान रममाण झाला. आणि कुटुंब व दासी या उभयतांचें साहाय्य करीत त्या शबरस्थानीं कांहीं वर्षे राहून बाणवेधाविषयीं मोठा यत्न करून त्या ब्रम्हणानें वनांतील हंस नित्य मारीले. असा तो गोतम चोराच्या सहवासानें निर्दयपणानें प्राणिमात्रांच्या वधाविषयीं आसक्त होऊन चोरांची बरोबरी पावला. तेव्हां चोरांच्या ग्रामांत तो सुखानें राहात असतां बहुत पक्षी मारीत कांहीं दिवस गेले. तों तेथें कोणी एक जटावल्कलें धारण करणारा, वेदाध्ययनीं तत्पर, ब्रम्हचारी असा ब्राम्हण त्याच्या देशांतील त्याचाच सखा आला आणि ब्राम्हणाच्या घराचा शोध करीत त्या गावांत संचार करीत असतां शूद्रान्न वर्ज करणारा तो ब्राम्हण गोतम जेथें होता तेथें आला इतक्यांत गोतमही तेथें आला असा उभयतांचा समागम झाला असतां खांद्यावर पक्षांचा भार, हातांत धनुष्यबाण, रक्तानें अंग भरलेलें अशा त्या गोतमास पाहून त्याचा सखा लज्जित होऊन बोलतो कीं, अरे. तूं कुल वृद्धि करणारा मध्यदेशांत प्रख्यात असा ब्राम्हण असून मोहानें हें काय करतोस व चौर्यधर्म कसा स्वीकारिलास ? आतां आपले वेदपारंगत द्विज ज्ञातीचें स्मरण

करून मी त्याच्या वंशांत उत्पन्न झालों असून कुलांगार कसा झालों वमी होतों कसा? माझ्यांत सत्व, शील, श्रुत, इंद्रिय निग्रह कसा होता हें मनांत आणून येथें राहूं नकोस. असेंहि तेच्छु मित्रानें भाषण केलें असतां तो गौतम दीन होऊन उत्तर देतो हे ब्राम्हणा, मी वेदवेत्ता नसून निर्धन असल्यामुळें वित्ता करितां येथें आलों असें जाण- हे ब्राम्हणा, तुझ्या दर्शनानें आज कृतार्थ झालों. आजरात्रीं येथें राहून उदयीक उमयतां येथून जाऊं. असें ऐकून गौतमाचा सरवा कोणत्याही वस्तूस स्पर्श न करितां क्षुधित असून भोजनही न करितां राहिला- असा विषय या अध्यायांत आहे.

३९. अध्याय एकुणचाळीस :— भीष्म सांगतात हे धर्म राजा, दुसरे दिवशीं आपला मित्र गेल्यावर गौतम तेथून समुद्राकडे गेला तो असा कीं समुद्रतीरीं जाणाऱ्या वैश्यांसहीत समुद्राकडे जात असतां कोणी एका गुहेंत मत्त गजानें त्या वैश्य समुदायास मारिलें असतां त्या हत्तीच्या भयापासून तो गौतम ब्राम्हण मारब्यानें सुटून आतां कोणीकडे जावें असा विचार करून उत्तर दिशेस गेला. आणि वनांत एकाएकीं संचार करीत समुद्राकडे जाणाऱ्या मार्गास मिळाला, तों तेथें सुंदर वन त्यानें पाहिलें. तें असें कीं, सर्व ऋतूंत पुष्पित होणाऱ्या वृक्षांनीं सुशोभित असून नंदन वनासारखें यक्षकिन्नरांनीं सेवित व शाल, ताल, तमाल, चंदन इत्यादिक वृक्षांनीं युक्त अशा वनांत मनुष्यांच्या मुखाचे पक्षी होते. त्यांचे अति मनोहर शब्द ऐकत तो गौतम ब्राम्हण त्या वनांतून जात असतां स्वर्गासमान सुख देणारा, सुवर्ण वालुकांनीं युक्त अशा रमणीय देशांत एक विस्तीर्ण वट वृक्ष त्यानें पाहिला. जो दिव्य शाखांनीं युक्त असून ज्याचें मूळ चंदनोदकानें शिंचित असल्यामुळें दिव्य पुष्पांनीं युक्त, मनास आनंददायक असा होता त्या खालीं तो गौतम ब्राम्हण बसला असतां त्याचे अंगास आनंददायक असा वारा लागला तेव्हां त्या वायुच्या योगानें ब्राम्हण शांत होऊन सुखानें निद्रा घेत असतां सूर्य अस्तास गेला. तेव्हां ब्रम्हलोकांतून त्या ब्राम्हणाचा परम मित्र कश्यपाचा पुत्र नाडिजंघ नामा बगळ्यांचा राजा आपल्या मंदिरीं आला, तो भूमीवर राजधर्मा या नामानें प्रसिद्ध होता. आ-

णि तो देव कन्येचा पुत्र असल्यामुळें श्रीमान् असून देवां समान कांतीजा ची, सूर्या सारख्याभूषणानीं सर्वांगीं भूषित अशा त्या पक्षास पाहून गौत म आश्चर्य पावला. नंतर क्षुधा व तृषा यानीं परिश्रांत झाल्यामुळें हिंसा करावी या इच्छेनें त्या पक्षा कडे पाहूं लागला. तेव्हां राजधर्मा पक्षी गौत- मास म्हणतो हे ब्राम्हणा, आज माझ्या घरीं दैवानें तूं आलास सूर्यास्त होऊ न सायंकाळ झाला आहे यास्तव मला प्रीय असा तूं अतिथी असल्यामु ळें शास्त्रीय विधीनें मी केलेली पूजा ग्रहण करून प्रातःकाळीं तूं जा. असा विषय या अध्यायांत आहे.

४०. अध्याय चाळीस.— भीष्म बोलतात हे धर्मराजा. ती मधुर वाणी ऐकू न गौतम राज धर्माकडे पाहूं लागला. ते समयीं राज धर्मा बोलतो हे गौत मा, मी कश्यपाचा पुत्र असून माझी मातोश्री दक्ष प्रजापतीची कन्या आहे यास्तव माझ्या घरीं गुणयुक्त असा तूं अतिथी आलास तुझें स्वागत असो. असा त्याचा सत्कार करून त्या पक्ष्यानें शाल पुष्पाचें दिव्य आसन त्यास दिलें. नंतर कश्यपाचा पुत्र राज धर्मा याणें गंगेंतील पुष्ट मोठमोठे मत्स्य व अग्नि प्रदीप्त करून गौतमास दिला तेव्हां गौतम भोजन करून संतु- ष्ट झाला असतां त्याच्या श्रमपरिहारार्थ आपले पक्षानें त्यास वारा घा- लून तो विश्रांती पावल्यावर राजधर्मानें त्यास प्रश्न केला कीं तुझें गोत्र काय? असें एकून त्या ब्राम्हणानें मी गौतम आहें असें सांगितलें ते सम यीं दिव्य पुष्पानीं सुवासिक अशी सुंदर पर्णमय शय्या राज धर्मानें गौ तमास दिल्यावर त्यानें सुखानें तिजवर शयन केलें. नंतर गौतम शय्ये- वर बसला असतां राज धर्मानें त्यास आगमनाचें कारण विचारिलें तेव्हां त्या ब्राम्हणानें उत्तर दिलें कीं, मी दरिद्री आहें म्हणून द्रव्यार्थ समुद्रतीरीं ग मन करण्याच्या इच्छेनें आलों. असें ऐकून राज धर्मा पक्षी गौतमास म्हणतो हे द्विजश्रेष्ठा, तूं येथूनच कृतकार्य होऊन जाशील. कारण आतां तुझा मी मित्र झालों व तूंही माझे ठायीं मित्रत्व ठेवतोस या मुळें तुला जसें द्रव्य मि ळेल तसा यत्न करतों. असें बोलून पुनः प्रातःकालीं त्या ब्राम्हणास म्हणतो, या मार्गानें तूं जा, म्हणजे तूं कृतकृत्य होशील. कारण येथून तीन योजनांवर

माझा मित्र महा बलाढ्य विरूपाक्षनामा राक्षस आहे तेथें मी सांगितल्या. वरून तूं आलास असें त्यास समजतांच तो तुझें इच्छित पूर्ण करील. असें त्या पक्ष्याचें भाषण ऐकतांच यथेष्ट अमृता समान फळें भक्षण करीत गौतम श्रम न पावतां मेरुव्रजनामक नगरीं गेला. तों त्या राक्षसास माझ्या मित्रानें पाठविलेला अतिथी आला आहे असें समजल्यावर त्यानें संतोषानें आपल्या दूतांस सांगितलें कीं गौतमनावाचा ब्राम्हण नगर द्वारापासून सत्वर आणावा. असें ऐकतांच ते दूत श्येन पक्षासारख्या गतीनें नगर द्वाराजवळ येऊन बोलूं लागले कीं, हे गौतमा, आमचा विरूपाक्षया नावाचा राक्षसांचा राजा तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहे यास्तव तूं त्वरेनें त्याजवळ चल. असें ऐकतांच गौतम ब्राम्हण राक्षसाचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें त्या नगरीची संपत्ति पाहून आश्चर्यानें त्याचे मंदीरीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

४१. अध्याय एकेचाळीस:- भीष्म बोलतात हे धर्मराजा, नंतर राक्षसाच्या घरीं जाऊन ब्राम्हण उत्तम आसनावर बसतांच राक्षसानें त्याची पूजा करून गोत्र, अध्ययन, ब्रम्हचर्य इत्यादिकांचा प्रश्न केला असतां त्या ब्राम्हणानें गोत्र मात्र सांगितलें. तेव्हां ब्रह्मतेजानें हीन, वेदाध्ययना विषयीं उपरत, गोत्रमात्र जाणणारा अशा त्या ब्राम्हणास पाहून राक्षसानें प्रश्न केला कीं, हे ब्रह्मन्, तूं कोठील राहाणारा व तुझी स्त्री कोण त्या गोत्रांतील हें मला सांग. असें ऐकून गौतम सांगतो - मी मध्य देशांत उत्पन्न झालों असून माझें राहाणें म्लेंच्छ देशांत आहे. शूद्र जातीची पुनर्विवाहित स्त्री माझी भार्या आहे हें तुला सत्य सांगतो. असें ऐकून राक्षसांचा राजा विचार करूं लागला कीं, हें कार्य कसें होईल व मला सुकृत कसें मिळेल असें चिंतन करून मनांत म्हणतो हा जन्मतः ब्राम्हण आहे महात्म्या पक्षाचा मित्र असून त्यानें माझ्याकडे पाठविला आहे यास्तव याचें प्रीय करावें कारण तो राजधर्मा सर्वदा माझ्या आश्रयानें असून माझा मित्र व बांधव म्हणवितो. आज कार्तीकी पौर्णिमा असून माझ्या घरीं सहस्त्र ब्राम्हण भोजन होणार आहे त्यांत हाही भोजन करील यास्तव

यास द्रव्य द्यावें. आज पुण्यकारक दिवस असून हा अतिथी ही आला आहे आणि द्रव्याचा संकल्प ही झाला आहे आतां विचार करणें नको. असें म्हणून त्या विरूपाक्ष राक्षसानें विद्वान सहस्त्र ब्राम्हण आले असतां यथाशास्त्र त्यांच्या योग्यते प्रमाणें त्यांचा स्वीकार केला तेव्हां त्या राक्षसाच्या आज्ञेनें त्याच्या दुतानीं भूमीवर दर्भाचीं आसनें ठेविलीं त्या आसनांवर राजानें त्या ब्राम्हणांस बसवून यथाविधीनें तिल दर्भ उदकानीं त्यांची पूजा केली ते समयीं पितरांसहित विश्वेदेव चंदन पुष्पानीं अग्नी सहीत पूजित केले असतां ते शोभूं लागले तेव्हां ब्राम्हणांस मधु घृतानीं पूर्ण, वज्र मण्यानीं चिन्हीत सुवर्णाचीं उत्तम पात्रें दिली आणि चांगले अन्नानीं पूर्ण पात्रेंही सुवर्णाचीं दिलीं. असा तो राक्षस निरंतर आषाढी, माघी पोर्णिमेस ब्राम्हणांस इच्छित भोजन देत असे व विशेषें करून कार्तिकी पोर्णिमेचे दिवशीं तो राक्षस ब्राम्हणांस इच्छित भोजन देऊन सुदक्षिणार्थ सुवर्ण, रजत, अमोलिक वज्रादि मणी, मौक्तिकें, वैडूर्य, कृष्णाजिनें व रत्नांच्या राशी देई. या प्रमाणें त्या दिवशीं ब्राम्हणास देऊन बोलला कीं, हीं सर्व रत्नें व मौक्तिकादिकांच्या राशी घेऊन जाजा पात्रांचे ठाईं तुम्ही भोजन केलें असेल तींच पात्रें घेऊन आपल्या घरीं स्वस्थपणीं जावें. असें त्या राक्षसानें भाषण केलें असतां ब्राम्हण रत्नादिक सर्व घेऊन उत्तम वस्त्रें परिधान करीत असतां राक्षस त्या ब्राम्हणांस बोलला कीं, हे विप्र हो, आज एक दिवस तुम्हांला राक्षसापासून भय कोठेंही नाहीं यास्तव तुम्ही आनंदानें गमन करा. असें ऐकतांच ते ब्राम्हण आपले घरीं गेले. तेव्हां गौतम ब्राम्हणही सुवर्णादिकांचा भार घेऊन वट वृक्षाजवळ गेला. तो अतिशय श्रम झाल्यामुळें क्षुधेनें पीडित झाला हें पाहून राजधर्मा पक्ष्यानें त्याचें अभिनंदन करून आपल्या पंखानीं त्यास वारा घातला व पूजाही केली आणि त्यास भोजनही दिलें तेव्हां गौतम विश्रांति घेऊन म्हणतो कीं, हा सुवर्णाचा भार मोठा मी लोभ मोहानें घेतला आणि मला जाणें तर दूर आहे. मार्गांत भोजनास तर कांहींच नाहीं यामुळें माझें प्राणधारण कशानें होईल? असें चिंतन करीत पुनः त्यानें कृतघ्नपणानें असा विचार केला कीं,

हा बकांचा राजा मांसाचा केवळ राशीच माझ्या जवळ आहे यास्तव यास मारून घेऊन लौकर मी जाईन. असा विषय या अध्यायांत आहे.

४२. अध्याय बेचाळीस:- भीष्म बोलतात हे धर्मराजा, नंतर त्या ब्राम्हणाच्या रक्षणार्थ समीपभागीं राजधर्मा पक्ष्यानें अग्नी प्रदीप्त करून त्या ब्राम्हणासंनिध विश्वासानें शयन केलें तेव्हां कृतघ्न, दुष्ट बुद्धि अशा त्या गौतमानें पेटलेल्या लांकडानें त्या राजधर्मापक्ष्यास मारून आनंदानें पाप दोष न पाहतां पंख व आंगावरील पिसें नाहींशीं केली आणि अग्नी च्या ठाईं त्यास पचन करून सुवर्ण व त्यास घेऊन तो त्वरित गेला. नंतर दुसरे दिवशीं विरूपाक्ष राक्षस आपल्या पुत्रास म्हणतो आज निरंतर प्रातःकालीं ब्रम्हदेवास वंदन करण्यास जाऊन येतानां राजधर्मापक्ष्यास मी पाहिलें नाहीं दोन दिवस माझ्याघरीं तो आला नाहीं यास्तव माझ्या मनास बरें वाटत नाहीं म्हणून त्याचा शोध कर. ब्रम्हतेजानें रहित, वेदाध्ययन शून्य तो द्विजाधम त्यास मारील अशी शंका मला येते कारण मी त्याचे चेष्टितावरून जाणलें कीं, हा दुराचारी, दुर्बुद्धि, निर्दय असा चोरासारखाचीच आहे व तो गेल्यापासून माझें मन उद्विग्न झालें यास्तव तूं राजधर्माच्या घरीं जाऊन तो जिवंत आहे,नाहीं याचा त्वरित शोध कर. असें ऐकतांच राक्षसास हवर्तमान त्याचा पुत्र त्वरित त्याचे घरीं गेला तों त्यानें राजधर्माच्या अस्थि पाहिल्या तेव्हां विरूपाक्षाचा पुत्र रोदन करीत त्वरेनें गौतमास धरण्या करितां गेला तेव्हां राक्षसानीं त्या गौतमास धरिलें. नंतर पक्ष, अस्थि, चरण, यानीं शून्य असें राजधर्माचें शरीर व त्या ब्राम्हणास घेऊन राक्षस मेरुव्रज नगरास गेले. आणि त्यानीं राजधर्माचें शरीर व कृतघ्न गौतमास त्या राक्षसाला दाखविलें. तेव्हां अमात्य, पुरोहित यांसहीत विरूपाक्ष त्यास पाहून रोदन करूं लागला. तेव्हां सर्व नगर, स्त्रिया व बालक यांसहित अस्वस्थ झालें तेव्हां तो राक्षस आपल्या मुलास बोलला कीं, त्या पाप्यास मारावें म्हणजे त्याच्या मांसानीं हे सर्व राक्षस विहार करतील. असें त्या राक्षसानें भाषण करतांच घोरपराक्रमी राक्षसानीं त्या पापकर्म्या ब्राम्हणाचे भक्षणाविषयीं इ-

च्छा न करितां भाषण केलें कीं हा अधम पुरुष आज चोरांस द्यावा कारण याच्या भक्षणांत महत् पाप आहे यास्तव आपण आम्हांस देऊं नये. असें ऐकून राक्षसांचा राजा त्यांस म्हणतो हा कृतघ्न चोरांस द्या. हें एकतांच त्या राक्षसानें त्याचे तुकडे करून चोरांस दिले असतां चोरांनींही त्याचे भक्षणाविषयीं इच्छा केली नाहीं आणि मांस भक्षक पशु पक्षांनीं ही त्या कृतघ्नाचें भक्षण केलें नाहीं. हे राजा, ब्रम्हघ्न, सुरापी, चोर, व्रतभंग करणारे, यांसही प्रायश्चित आहे; परंतु कृतघ्नास निष्कृति नाहीं. मित्रद्रोही, कृतघ्न, घातकी यांचें मांस कीटकादिक ही भक्षण करीत नाहींत. असा विषय या अध्यायांत आहे.

४३. अध्याय त्रेचाळीस:- भीष्म बोलतात हे धर्मराजा, नंतर विरुपाक्षानें रत्नें व बहुत वस्त्रें यानीं सुशोभित चिता करून तिजवर त्या राजधर्म्याचा दाह करून यथाविधीनें त्याचीं प्रेतकार्येंही केलीं त्या समयीं कामधेनूच्या मुखांतून क्षीर मिश्र फेंस त्या चितेवर पडतांच तो राजधर्मा जिवंत होऊन विरुपाक्षाच्या जवळ येतांच सुरपती इंद्राणीचा भ्रतार जो इंद्र तो त्या नगरांत येऊन राक्षसांचा राजा जो विरूपाक्ष यास म्हणतो देवानें तूं यास जिवंत केलें. असें बोलून ब्रम्हदेवानें त्या राजधर्म्यास जो शाप दिला तो सांगूं लागला. हे राक्षसा ब्रम्हदेव क्रोधानें बकाधमास म्हणाला कीं, माझ्या सभेस जा पेक्षां तूं आला नाहींस त्यापेक्षां तूं लौकरच वध पावशील त्या शाप वचनास्तव गौतमानें यास मारिलें व ब्रम्हदेवानींच अमृत शिंचन करून पुनः तो बक जिवंत केला. तेव्हां राजधर्मा बक इंद्रास नमस्कार करून म्हणतो तुम्ही मजवर अनुग्रह केलात यास्तव हा माझा अत्यंत प्रीय सखा गौतम जिवंत करा. असें त्याचें भाषण ऐकून इंद्रानें अमृत शिंचन करून त्यास जिवंत केलें तेव्हां राजधर्म्यानें परम प्रीतीनें त्यास आलिंगन करून सधन त्यास सोडलें आणि आपल्या घरीं जाऊन तो ब्रम्ह सभेस गेला तों ब्रम्हदेवानें त्याचा सत्कार केला. गौतमानें ही त्या बाबरालयीं जाऊन शूद्रीचे ठायीं पापकर्म करणारे पुत्र उत्पन्न केले तेव्हां देवानीं, पुनर्विवाहित स्त्रीपासून यानें पुत्र जा पेक्षां उत्पन्न

केले त्यापेक्षां हा कृतघ्न नरकांत पडेल असा त्यास शाप दिला. हा इतिहास मला नारदानें सांगितला. हे धर्मराजा, मी ही त्या आख्यानाचें स्मरण करून तुला सर्व यथार्थ सांगितलें. तात्पर्य कृतघ्नास यश, उत्तम लोक, सुख कोठून प्राप्त होणार! कृतघ्नास सर्वथा प्रायश्चित्त ही नसल्या मुळें तो विश्वासास पात्र नाहीं आणि पुरुषानें विशेषें करून मित्रद्रोहही करूं नये; कारण तो घोर नरकास जातो यास्तव आपण मित्र संग्रह करून त्यापासून आपलें कार्य सिद्धीस न्यावें व मित्रानें केलेला उपकार जाणावा. मित्रा पासून भोग प्राप्त होतात व त्यांच्या योगानें विपत्ती पासून पुरुष मुक्त होतो. हे धर्मराजा, मित्रद्रोही व कृतघ्न यांचें स्वरूप तुला सांगितलें. आणखी काय ऐकण्याची इच्छा असेल ती सांग. वैशंपायन सांगतात हे जनमेजया; असें भीष्माचें वचन ऐकतांच धर्मराज संतुष्ट झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

आपद्धर्मसमास.

श्री

# शांतिपर्वांतर्गत

# मोक्षधर्म.

१ अध्याय पहिला :— प्रथम भीष्मानीं धर्मराजास राजधर्म व आपद्धर्म सांगितले त्यांच्या श्रवणानें धर्मराजाचें चित्तसमाधान झालें नाहीं. कारण त्यांत आत्मविद्या प्राप्तीचें साधन यथाशास्त्र न ऐकिल्यामुळें संसारकलिक अविद्येची निवृत्ती झाली नाहीं म्हणून आत्मज्ञानाची प्राप्ती उत्तम रीतीनें व्हावी यासाठीं हें मोक्षधर्मरूपशास्त्र ऐकावें असें जाणून धर्मराजानें प्रश्नकरण्यास आरंभ केला: धर्मराज बोलतात हे भीष्मा, आपण अत्यंत वात्सल्यानें राजधर्म व आपद्धर्म शुभफल देणारे असे सांगितलेत परंतु गृहस्थाश्रमादि सर्व आश्रमीं याणीं जाणण्या विषयीं योग्य असा धर्म सांगावा. असें ऐकून भीष्म सांगतात सर्व आश्रमांत वेदानें विहित धर्म सांगितले त्यांत कांहीं धर्म अदृष्ट फलदेणारे व ब्रम्हवस्तु विषयावलोकन रूप जो धर्म तो श्रवण, मनन, निदिध्यासनादिकानीं अभ्यासिला असतां साक्षात्काररूप फलदेणारा होतो त्यास दृष्टफल देणारा ज्ञानरूप असें म्हणतात अशीं ज्या धर्माचीं द्वारें बहुत आहेत त्यांतून कोणताही धर्म केला असतां तो विफल क्रियारूप होणार नाहीं. ज्या मनुष्याच्या इच्छेनें स्वर्गप्राप्ती व पुत्रादिकाम असा जो जो विषय घेतला त्याच्या विषयावर निश्चय धरून हेंच श्रेयस्कर म्हणून तो जाणतो. पश्चात् त्या द्वारानें चित्तशुध्दि पुढें वैराग्य उत्पन्न होऊन संसार सुख तृणादिकासारखें तुच्छ मानितो. हे धर्मराजा, स्थावरादि सत्यलोक पर्यंत नाशिवंत लोक आहेत, असें जाणून आत्म मोक्षाविषयीं जो प्रयत्न करील तो बुध्दिमान जाणावा. नंतर धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, ज्याचें धन नष्ट झालें व स्त्री पुत्र, पिता हे मृत झाले असतां जो शोक उत्पन्न होतो तो ज्या बुध्दीनें जाईल तें ज्ञान मला सांगावें. असें ऐकून भीष्म म्हणतात धनादिक नष्ट झाल्यामुळें जो शोक होतो तो आत्मज्ञानावांचून दूर होणार नाहीं. यास्तव शमदमादि सा-

धनें करावीं म्हणजे आत्मज्ञान होईल याविषयीं पुरातन इतिहास सांगतों. पुत्रशोकानें संताप पावलेल्या सेनजित राजाचा आणि शतानिक ब्राम्हणाचा संवाद झाला तोंतुलासांगतों. कोणी ऐकेसमयीं ब्राम्हणबोलतो हे राजा, देव, तिर्यक्, मनुष्यादि सर्वप्राणी आपापले कर्मानें दुःखी आहेत असें त्वां पाहावें मी ज्ञानस्वरूप झालों म्हणून मलाव्यथा नाहीं कर्मापासून दुःख देवादिकांसही होतें यास्तव पुत्र, पौत्र ज्ञाति, बांधव यांचास्नेह करूंनये. जशीं समुद्रांत काष्ठें एकेजागीं मिळतात. आणि पुन्हा चहूंकडे जातात तशी संसारांत पुत्रादिकांचीं अवस्था होते. यासाठीं वासना टाकावी म्हणजे दुःखदूर हातें संसारांत सुखदुःखें हीं निरंतर आहेत. पुत्रादिकांवर प्रीति ठेवणारे मानव शोकसमुद्रांत बुडत आहेत, द्रव्यादिक मिळालें म्हणजे बहुत सुख होतें तेंच नाशपावले म्हणजें मोठें दुःख होतें, स्त्री पुत्रादिकांचे पोषणार्थ चौर्यादि पापकर्में करून द्रव्यादि मिळवितो परंतु त्याद्रव्याचें सुखभोगणारे स्त्री, पुत्रादिक असून मिळविणारा पापफलाचा भागी होतो यास्तव हे राजा, बहुत विचारानें निर्विकल्पक समाधीचे ठायीं राहणारे ब्रम्हभावाख्य गतीस पावतात तेच देहधारण करणारे होत्साते बुध्देः परंसुखं (स्वस्वरूपसुखास पाऊन) भगवंताचीभक्ती करितात म्हणून सुखदुःखादि त्यांस होत नाहींत. पंडितांस शोकादिक होतच नाहींत. पिंगलानामक वेश्या होती तिणें आपले देहास विचारानें मिथ्याभूत जाणून नीनिराशझालीव परमसुखास पावली. हे धर्मराजा, त्याब्राम्हणापासून सेनजित राजा कथाऐकून आत्मस्वस्वरूप ज्ञानानें सुख पावला. असाविषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दुसरा :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, जरा, रोगादिकानीं मनुष्यांच्या आयुष्याचा नाश, काल करितो तेव्हां अल्प आयुष्यांत कल्याण कसें होतें? असा प्रश्न ऐकून भीष्म म्हणतात हे धर्मराजा, याविषयीं मेधावी नामक पुत्राचा व पित्याचा संवाद तुला सांगतोंपुत्र म्हणतो हे तात, मनुष्यांच्या अल्प आयुष्यांत वेदाध्ययन व गृहस्था-

प्रमाद धर्माचरणानें ऋणत्रयापासून मुक्त होऊन ज्ञानाभ्यास कसा होतो- हें सांगावें, कारण मृत्यु कोणते काळीं येऊन यांस घेऊन जाईल याचा विश्वास नाहीं, जसा व्याघ्र पशूंस घेऊन जातो तसा दुर्बल, बलवान, शूर, भयशील, जड व कवी कोणताही असो यांशिवाय आणखी मृत्यु घेऊन जातो. आत्मज्ञानासारखा चक्षु नाहीं सत्यधारण करण्या सारखें तप नाहीं, राग धारण करणें यासारखे दुःख नाहीं, त्याग करण्या सारखें सुख नाहीं तस्मात् हे बापा, त्वां वेदाध्ययनादि सर्व वासना टाकून आत्मज्ञानाविषयीं निष्ठा धरावी. या प्रमाणें बापानें पुत्राच्या भाषणावर विश्वास ठेऊन मोक्षधर्मविषयीं ज्ञानाची प्राप्ती करून घेतली त्या प्रमाणें तूं सत्यधर्मपरायण हो. असा विषय या अध्यायांत आहे.

३ अध्याय तिसरा:— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, स्वकीय शास्त्रविधीच्या अनुलक्षानें वागणारे द्रव्यवान् व निर्धनी पुरुष यांस कोणते प्रकारानें संसारा पासून मोक्ष होतो हें मला सांगावें नंतर भीष्म बोलतात हे धर्मराजा, पूर्वीं हस्तनापुरामध्यें अन्न व स्नानें हीन, क्षुधाक्रांत वासनेचा त्याग केलेल्या अश्याशं पाक नामा ब्राम्हणानें मजला इतिहास सांगितला तो तुला सांगतो. ब्राम्हण बोलला सर्वांस सुखदुःखांची प्राप्ती होत आहे परंतु विवेकी पुरुषानीं सुखाचा हर्ष व दुःखाचा खेद मानूं नये. दरिद्री पुरुष जसा सुखास पावतो तसा द्रव्यवान् पुरुष सुखास पावत नाहीं यास्तव राज्याहून ही दारिद्र्य गुणानें अधिक आहे. आपले बाहूची उशी करून भूमी वर निद्रा करणारा व सार्वकाल शांतचित्त असा ब्राम्हण यांची प्रशंसा देव करितात, द्रव्यवान् पुरुषांस चौर्यादिकांचें भय आहे आणि तो क्रोध लोभानें व्यापलेला व नेत्रानें वटारून पाहणारा इत्यादि बहुदोषानें युक्त असतो असें शास्त्रतः पाहून सर्वत्याग केल्यानें जें सुख होतें तेंच सुख मोक्षप्राप्तीस कारण असें जाणून सुखी व्हावें. असा विषय या अध्यायांत आहे.

४ अध्याय चवथा:— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, पूर्वीं मोक्षप्राप्ती विषयीं द्रव्याचें कारण नाहीं म्हणून सांगितलेंत परंतु गृह

स्थाश्रमांत उपजीविका झाली पाहिजे व यज्ञदानादिक व्हावेत यासाठीं को णी पुरुषानें इच्छाधरून धनसंपादन करण्याविषयीं आरंभ करावा किंवा न करावा यत्न केला; परंतु धन नमिळालें तर त्यानें काय करावें. भीष्म बोलले हे धर्मराजा, मोक्ष प्राप्त होण्यास पांच कारणें आहेत लाभ, अलाभ, मान, अपमानादिक प्राप्त झाले असतां समभाव असावा, धनाविषयीं यत्न न करणें, सत्यभाषण, वैराग्य, निष्काम कर्म करणेंहीं, स्वर्ग, धर्म व सुख यांस कारणें आहेत याविषयीं इतिहास सांगतो, मंकी नामक कोणी एक होता त्यानें द्रव्य मिळवावें या इच्छेनें दोन बली व ईतरुण पाहून घेतले त्यांचे गळ्यांस जूं बांधून दमन केलें असतां भूमी सिध्द करण्यास योग्य होतील अशा हेतूनें बाहेर काढले तों ते अकस्मात मोठ्यानें भरधांव चालूं लागले त्यामार्गांत मध्यभागीं मोठा उष्ट्र बसलेला होता त्याचे मानेवर ते बैल अडकले तेव्हां तो उष्ट्र मोठ्या वेगानें उठून चालूं लागला तों त्याचे कंठांत ते तराजू सारखे लोंबणारे असें दिसू लागले पुढें त्याच्या मानेच्या हिसक्यानें आपटत मरण पावले हें मंकीनें पाहतांच तो शोकानें व्याप्त होऊन म्हणतो काकतालीयन्यायें ( कोणी पुरुष टाळी वाजवीत असतां उडणारा काक दैवानें अकस्मात टाळींत सांपडला ) अथवा दोन मेष मस्तकानें टकरा मारीत असतां दैवानें जंबूक टकरेंत सापडून मरण पावतो तसे माझे बैल मेले. आतां द्रव्याची आशा टाकून सुखी व्हावें हेंच अधिक आहे. सर्वसंग परित्याग करणारा श्रीशुक सर्व कामांचा परित्याग करावा आणि द्रव्य संचय कधींहि करूं नये-असें बहुत प्रकारें बोलून जनकराजास भेटून महारण्यांत निघून गेला तसा मीहि सर्वसंग परित्याग करून तृप्त झालों अशा बहुविचारानें आपले बुध्दीनें त्यानें शांतवन केलें आणि तो मंकी परम वैराग्यास पाऊन मोक्षसुखास पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

५ अध्याय. पांचवा:— भीष्म म्हणतात हे धर्मराजा, तूं म्हणशील कीं मंकीसारखें सुखी व्हावें परंतु योगक्षेम कसा होईल? असें म्हणशील तर राज्य भोगणारा व ज्यांची चित्तवृत्ती ब्रम्हस्वरूपीं निरंतर

असू न स्वरूप साक्षात्कार त्यास अश्या स्थितीनें राहणारा जो जनक रा-
जा त्याचें भाषण तुला सांगतों माझें जवळ अनंत द्रव्याचे कोश(भांडार)भ
रले आहेत परंतु माझें कांहीं येक द्रव्य नाहीं. मिथिला नगरी दहन होऊं
लाग ली असतां माझें कांहींच जळत नाहीं असें वैराग्य जनकाचें होतें, आतां
तुला दुसरा इतिहास सांगतों. बोध्य नामक ऋषीचा आणि ययाति राजाचा-
संवा द झाला त्यांत हे धर्मराजा ययाति राजाच्या प्रश्नावरून बोध्य नामक ऋ
षीनें त्याराजास सहा गुरू करावे म्हणून सांगितले ते असे कीं, पिंगला, कुरर,
सर्प. भ्रमराचें गमन, इषुकार, कुमारी यांची शिक्षा घेतली म्हणजे चित्त शां
त होतें या प्रमाणें ययाति राजानें ऐकून तो सुखपावला जे पिंगलादि स-
हा गुरू सांगितले त्यांचा अर्थ श्रीमद्भागवतीं एकादशस्कंधीं विस्तारें करू
न सांगितला आहे. असा वि० या अ० आहे.

६ अध्याय सहावा :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, कोणाच्या
वर्तणुकीनें पुरुषाचा शोक दूर होऊन तो पृथ्वीवर राहतो व कोणाच्या कर्मानें
मोक्षास पावतो हे मला सांगा. भीष्म बोलतात हे धर्मराजा, अजगर वृत्तीनें-
उपजीविका करणाऱ्या मुनीचा व प्रल्हादाचा संवाद झाला त्यांत प्रल्हाद त्यास-
नमस्कार करून प्रश्न करतो कीं, हे मुने, विषय वासना त्याग, ज्यांचीं इंद्रियें-
स्वाधीन, सर्वत्र दोष न पाहणें, सत्य भाषण आणि ज्यानें भगवत्तत्व जाणलें,
परम बुध्दिमान, अशा बहुप्रकारच्या गुणानें तुम्हीं युक्त असून बाला सार
खी वागणूक करितां आणि तुमचा देह दृढ दिसतो हें पाहून मला आश्चर्य
वाटतें यास्तव मला ज्ञान कोणते वर्तणुकीनें होईल तें सांगावें? असें ऐकू
न अवधूत म्हणतात हे प्रल्हाद, सर्व प्राण्यांची उत्पत्ति, विनाश इत्यादि-
अद्वितीय ब्रम्हापासून होत आहे असें मी पाहतों मला हर्ष व्यथाही नाहीं
जें कांहीं मिळेल तें भक्षण करतों. चांगलें व रसहीन अन्न, अल्प, बहुत इ-
त्यादिकांवर प्रीति करीत नाहीं अतिसूक्ष्म धान्याचा कणाही खातों पिंण्या
क (पेंड) मिळाली तरीही भक्षण करतों आतां निद्रा करणें ती कोठें पलंगा
वर नाहींतर भूमीवर करितों, तसें चांगलें, वाईट जें जें वस्त्र मिळेल तें धार-
ण करतों अशा बहुप्रकारच्या लक्षणाचीं भाषणें बोलून अगरखी बोलता

त हे प्रल्हाद, माझें चित्त ब्रम्हसुखवास प्रत्यक्ष जिवंत असतां पावलें त्यायोगानें मीं निर्भय आहें. असा विषय या अध्या० आहे.

७ अध्याय सातवा :— धर्मराज विचारितात हे भीष्मा, ह्या लोकांत पुरुषाची स्वस्थचित्तता मणिमंत्रौषधि साधनभूत कर्मानें व द्रव्यसंपादन करून यज्ञादि केल्यानें, ज्ञान धारण केल्यानें अथवा कशी होते? हें मला सांगावें भीष्म बोलतात हे धर्मराजा, प्रज्ञेनें बली, प्रल्हाद, नमुचि, मंकि यांस ऐश्वर्यादि प्राप्त झालें तो इतिहास तुला सांगतों कोणी एक वैश्यानें ऋषीचा पुत्र काश्यप यास आपले रथाच्या धक्यानें पृथ्वीवर पाडला त्याकालीं त्यास क्रोध आला आणि धैर्याचा त्याग करून बोलतो कीं, माझे हातून कांहींएक कृत्य झालें नाहीं व्यर्थ दरिद्री मी मरतों रे मरतो त्यासमयीं इंद्र जंबुकरूपानें त्यास बोलतो कीं, हे काश्यपा, सर्वलोक मनुष्य जन्माची इच्छा करून ब्राम्हण व्हावें असें इच्छितात त्यांत तूं विद्वान ब्राम्हण श्रेष्ठ जन्मास पावून व्यर्थ कां मरतोस? ज्यास हस्त आहेत तो आपले देहाचें रक्षण करतो तसें जंबुकादिक योनींमध्यें रक्षण होत नाहीं इतर योनीं सर्व पापरूपी आहेत ब्राम्हणत्व मिळालें म्हणजे इंद्र व्हावें म्हणून इच्छितो जसा अग्नि काष्ठानीं तृप्त होत नाहीं, तसा हा मनुष्य तृष्णे पासून तृप्त होत नाहीं. नीचजातीचे चांडालादिक जरीं आहेत तरीं आपल्या देहाचा त्याग करण्याची इच्छा ते करीत नाहींत. अशा प्रकारें त्या काश्यपास इंद्रानीं बहुत विचार सांगून ते आपले पूर्वजन्मींची कथा सांगतात कीं पूर्वीं मीं पंडित म्हणून विख्यात होतों आणि ब्राम्हणांच्या सभेंत वाद करून वेदशास्त्रावर दूषणें देणारा असून नास्तिक, इत्यादि दुर्गुण ही मला होते त्यायोगें मी जन्म कोल्ह्याचा पावलों तस्मात अशा पापयोनीं पासून मीं बहुत वर्षांनीं मुक्त होऊन पुनः मनुष्ययोनी पावेन मग त्या जन्मांत संतोषानें गर्व टाकून यज्ञ, दान, तप इत्यादि कर्में प्रीतीनें करून ज्ञानसंपन्न होईन असें काश्यपानें ऐकून दिव्य ज्ञानानें पाहिलें तो, देवांचा देव, इंद्राणीचा पति जो इंद्र तो हा जंबुकाचे रूपानें मला बोध करण्यास आला आहे असें जाणून काश्यपानें इंद्राची उत्तम प्रकारानें पूजा केली नंतर तो आपले गृहीं आला. असा विषय या अ

ध्यायांत आहे.

८ अध्याय अठवा :— धर्मराज बोलतात हे भीष्मा, दत्त ( शरणांगतानें संरक्षण, भूतहिंसा न करणें, यथाशक्ति दान करणें ), इष्ट ( अग्निहोत्र व तप, शौच, वेदाज्ञापालन, आतिथ्य, वैश्वदेव ); तप ( वानप्रस्थाश्रम करणें ), गुरुशुश्रूषा ( मातापितर, वेदाध्ययनादि सांगणारा, ज्ञानसंपन्न यांची सेवा ) अशाचारप्रकारच्या धर्मांच्या अनुष्ठानानें कालांतरीं ज्ञान होईल असें जर आहे तर मला अनुष्ठान करण्यास सांगावें असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, ज्याची बुध्दी काम क्रोध रूप झाली तो पापी होऊन पाप कर्मानें पापयोनीस जातो म्हणून त्यास दुःख होतें जो पुण्य करतो तो पुण्ययोनीस जातो पाप करणारे दरिद्री पुरुष होतात, पुण्य करणारे द्रव्यवान पुरुष होतात, प्राणी जसें कर्म करील तसेंच फल पावेल, जसा वत्स सहस्त्रावधि गाईंत आपली माता जाणतो तसा हा पूर्वजन्मीं केलेल्या कर्मांचा अनुभव घेतो ज्यानीं वनांत बहुकाल उपवासादिकानीं तप केलें त्यांचें पाप जाऊन ते निर्मलज्ञानानें मोक्षास पावतात असें बहुत प्रकारें सांगून हे धर्मराजा, तों आपलें हित होणारें सत्कर्म असेल तें कर म्हणजे तूं निर्मल बुध्दि होऊन कृतार्थ होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

९ अध्याय नववा :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, कोणापासून हें स्थावर जंगमात्मक विश्व झालें? पुढें हें प्रलय कालीं कोठें जातें वसमुद्र, आकाश, पर्वत, मेघ, भूमि, अग्नि, वायु यांसहित हा लोक कोणी निर्माण केला? भूतें कशीं उत्पन्न झालीं? यांचा वर्णविभाग व आचारविधि कसा? जीव कशास म्हणावें? मृत जे झाले ते कुठें जातात हें अनुक्रमानें मला सांगावें, असें ऐकून भीष्म म्हणतात हे धर्मराजा, याविषयीं भृगु व भरद्वाज ऋषींचा संवाद सांगतों, कैलास पर्वतावर राहणारे भृगुऋषी यांस भरद्वाजानें प्रश्न केला तेव्हां भृगुऋषी बोलले हे ऋषे, प्रथम ब्रम्ह, अद्वितीय, मानस स्वरूपानें सर्वव्यापी, वेदशास्त्र वर्णित, जन्ममृत्यु ज्यास नाहीं, अव्यक्त स्वरूपानें असणारा तो ब्रम्हस्वरूप मुख्य देव आहे. त्यापासून मूल प्रकृति ( कारण ), त्यापासून महत्तत्व, त्यापासून अहंकार,

त्यापासून आकाश, त्यापासून वायू, वायू पासून अग्नि, त्या पासून उदक, उदकापासून पृथ्वी हींसर्व उत्पन्न झालीं पुढें त्या मुख्य देवानेंच शेषशायी नारायणाचें रूप घेऊन कमल उत्पन्न केलें त्या पासून ब्रम्हदेव वेदमय ज्यास-म्हणतात तोच अहंकार (नारायणानींविराटरूप धारण केलेला) त्याविराटरूपाच्या अस्थी (पर्वत) मेद, मांस, (पृथ्वी) रुधिर (समुद्र), उदर (आकाश), प्राण (वायू), तेज (अग्नि), शिर (नद्या), नेत्र (चंद्र, सूर्य), आकाश (उर्ध्वशीर), पाय (पृथ्वी), बाहू (दिशा), ज्याची गती कोणासही कळत नाहीं असा जो तोच भगवान विष्णु अनंत जाणावा त्यापासूनच हें जगनिर्माण झालें. भरद्वाज प्रश्न करतात हे ऋषे, आकाश, दिशाभूतल, वायू यांचीं परिमाणें काय आहेत भृगुऋषीसांगतात आकाश अनंत आहे उर्ध्वजापान्यास खालीं असणारे चंद्र सूर्य दिसत नाहींत त्यास्थानीं स्वयंप्रकाश देव राहतात, पृथ्वीचे खालीं समपाताळें आहेत सातवे पाताळांत शेषराहतात वायू, अग्नि, सलिल व पृथ्वी यांचाही अंत नाहीं; तेव्हां ब्रम्हस्वरूपाचा अंत कोण पाहील? यास्तव असा देव जो आहे त्याची भक्ती करावी म्हणून ब्रम्हदेवानीं कमलापासून उत्पन्न होऊन त्यादेवाची स्तुती केली. नंतर त्याचे प्रसादानें लोक उत्पन्न केले त्या ब्रम्हदेवास चार मुखें आहेत व त्यासच सृष्टिकर्ता म्हणतात. असाविषय या अध्यायांत आहे.

१० अध्याय दहावा:— भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, मेरुपर्वतावर राहणाऱ्या ब्रम्हदेवानें जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिज्ज अशा प्रजांची उत्पत्ती कशी केली भृगुम्हणतात हे ऋषे, प्रथम मानसी सृष्टी ब्रम्हदेवानीं केली नंतर भूतांच्या रक्षणार्थ जल उत्पन्न केलें त्याच्याच योगानें प्रजेची वृद्धी होत आहे. त्याच मूर्तिमंत उदकाची देवता वरुण आहे. भरद्वाज प्रश्नकरतात हे ऋषे, सलिल, अग्नी, वायु व पृथ्वी हीं कशीं झालीं? ऋषि म्हणतात ब्रम्हकल्पांत ब्रम्हर्षींनीं देवांचीं शतवर्षें पर्यंत आहार टाकून व वायू भक्षण करून तप केलें तेव्हां आकाशवाणी झाली त्यांत पंचमहाभूतांचीं उत्पत्ती सांगितली होती. प्रथम आकाश झालें त्यांत चंद्र, सूर्य, वायू हे नाहींत असें होतें मग त्यापासून उदक, त्यापासून वायु. वायु, उदक यांच्या संघर्षणापासून अग्नि उत्

न्न झाला तोच वायूच्या संयोगानें मेघाप्रत पावतो. त्यापासून पृथ्वी झाली त्या पृथ्वीवर सर्वही उत्पत्यादिक होत आहेत. असावि० या अ० आहे.

११ अध्याय अकरावा :— भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, ब्रम्हदेवानीं पूर्वीं आकाशादिक पंचमहाभूतें उत्पन्न केलीं त्यानींच हे लोक वेष्टिले आहेत तो ब्रम्हदेव जरायुजादिक सहस्त्रावधि भूतें उत्पन्न करितो. तेव्हां या आकाशादि पंचभूतांस महाभूतत्व कसें प्राप्त झालें? भृगु म्हणतात हे ऋषे, आकाशादि पंचमहाभूतांत सर्वांची उत्पत्ति होत आहे यास्तव या पंचभूतांस महाभूतें म्हणतात म्हणून पंचभूतात्मक हें शरीर आहे. स्थावर (वृक्षपाषाणादिक), जंगम (मनुष्य पश्वादिक) अशीं सर्वभूतें-पंचमहा भूतांनीं युक्त आहेत. वृक्षपाषाणादिकांत पंच ज्ञानेंद्रियें सूक्ष्मरूपानें आहेत आकाशाचा शब्द हा गुण आहे व उदक, अग्नि, वायु हें नित्य सर्वांच्या देहांत जागृत राहतात. शरीरास मूळकारण हेच असून माणास व्यापून राहिले आहेत. असावि० या० अ० आहे.

१२ अध्याय बारावा :— भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, शरीराचा अभिमान धरणारा प्रकाशरूप अग्नि व वायु देहांत कोणच्या-प्रकारानें वर्ततात? भृगु म्हणतात हे ऋषे, मस्तकांत आश्रय करणारा-अग्नि, शरीराचें रक्षण करितो प्राण ही मस्तकांत राहून शरीराचें चलन करितो, बुध्दि, प्राण यांचा संघात होतो तो जीव, कार्यकारण रूप सर्वभूतांचा चेतयिता सनातन, परब्रम्हरूप पुरुष उपाधीचा त्याग केलेला. भूतांत मन, बुध्दि अहंकारादिरूप तोच आहे. या प्रमाणें सर्वांच्या अंतर्बाह्य बुध्दि देहेंद्रियादिकांत असून प्राणासहीत चलनादिक करितो प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे पांच व नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय हे पांच असे दहा या प्राणानीं प्रेरणा केलेल्या नाडी देहांत अन्नरस सर्व ठिकाणीं नेतात ते प्राण जठराग्नी समीप असतात तोच अग्नी सर्व देहधारी पुरुषाच्या शरीरांत राहून अन्नपचनादि करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

१३ अध्याय तेरावा :— भरद्वाज प्रश्न करतात हे भृगुऋषे,—

ज्या कारणास्तव वायु देहास संजीवन व चलन करणारा आहे व श्वासो-च्छ्वास वायूनेंच होत आहेत तेव्हां जीव निरर्थक जाणावा. तसाच जठराग्नी अन्नपचन करतो तेव्हां जीव निरर्थक आहे. वायूच देहाचा त्यागकरून गेला आणि अग्नि नष्ट झाला म्हणजे देह, इंद्रिय, बुध्दि यांचा नाश होतो. जीवाचा अनुभव पाहिला असतां कांहीं एक नाहीं तस्मात जीवाचा नाश, जसा नद्यांचा नाश समुद्रांत होतो तसा ब्रम्हाचा अंशजीव, बुध्दि देहेंद्रियांचा नाश झाला म्हणजे ब्रम्हांतर्गत जीवाचा स्वरूपनाश होतो तेव्हां व्याध्यादि पीडित देह ना शपावतो तो पंचमहाभूतांचा अंश त्याच पंचमहाभूतांत मिळतो मगजीव काय जाणतो यास्तव जे लोकांत बोलतात कीं, -गाय दान दिली असतां परलोकीं तारणारी होते तेव्हां दान देणारा, प्रतिग्रह घेणारा हे उभयतां इहलोकींच नाशपावतात मग यांचा समागम कोठून? ती गाय कोणास तारील? देह नाश झाल्यावर जीव स्वरूप अवशिष्ट राहत-नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१४ अध्याय चवदावा:— पूर्वाध्यायीं प्रश्न केल्याचें उत्तर भृगु सांगतात हे भरद्वाज, जीवाचा नाश नाहीं तेव्हां दान केल्याचें फल, व पुण्यकर्म केलेल्या फलाचाही नाश नाहीं प्राणी जन्मांतरीं केलेल्या कर्मांचें फल पावतो; तस्मात् देह नाश झाला म्हणजे तोच दुसरा देह ग्रहण करतो. शरीर नष्ट झालें असतां शरीरांत राहणारे जीवाचा नाश होत नाहीं जसा दग्ध काष्ठांतील अग्नी असून दिसत नाहीं तसा देह नाश झाल्यावर जीव दिसत नाही. नंतर भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, वायूनेंच धारण केलेला जठराग्नी देहांतून प्राण गेले म्हणजे नाशपावतो. देह अचेतन पृथ्वीवर पडला म्हणजे पृथ्वीस मिळतो, पृथ्वी देहाचें लयस्थान आहे तेव्हां प्राण्याच्या शरीरांत-पंचमहाभूतांचे अंश आहेत यांचा जसा अनुभव तसा प्राण्याच्या शरीरांत-जीवाचा अनुभव जाणावयास योग्य असेल तर सांगावा. नंतर भृगु सांगतात हे भरद्वाज, देह दोन प्रकारचा एक स्थूल व दुसरा सूक्ष्म यांत क्षेत्रज्ञ, जीव स्वरूपी एकच आहे तोच दोन प्रकारच्या शरीरांस मनादिकांचा पहाणारा असून शरीराचें चालणें बोलणें इत्यादि करितो. गंध, रस, शब्द, स्पर्श, रूप,

ह्यांचा ज्ञाता असून सुख दुःख तोच जाणतो; देह जाणत नाहीं. ज्याकाळीं शरीरांतील अग्नीरूप स्पर्शादि रहित शांत होतो त्याकाळीं देह नाशा-पावतो. आत्मा सत्व, रज, तम इंद्रियें व मनादिकानीं ही युक्त व विनिर्मुक्त आहे म्हणून त्यास परमात्मा म्हणतात. योगी ज्ञानचक्षूनें ज्यास प्रत्यक्ष पाहतात तो आनंदरूपी सर्वांच्या देहांत असल्यानें उपजीवन होतें म्हणून-त्या परमात्म्यास जाणावा. यास्तव जीवाचा नाश नाहींच देहनाश झाला म्हणजे मृत झाला असें मिथ्याजे बोलणारे ते अज्ञानी जाणावेत. याप्रमाणें सर्वभूतांचे ठायीं गुप्त राहणारा त्याचें अहं ब्रम्हास्मीति निश्चयानें प्रत्यक्ष दर्शन होऊन प्राणी अनंत सुखास पावतो तस्मात् जरायुजादि सर्वांच्या शरीरीं मनांत प्रगटरूप अग्नीसारखा प्रकाशात्मा पुरुष-जीव म्हणून जाणावा व त्याचीही सृष्टी जाणावी. असाविषय या अ-ध्यायांत आहे.

१५ अध्याय पंधरावा :— भृगुसांगतात हे भरद्वाज, ब्रम्हदेवानीं पूर्वी प्रजेचे पती सूर्याग्नि सारखे तेजस्वी ज्यांचीं नामें मरीचि, अंगिरादि असे ब्राम्हण उत्पन्न केले. नंतर सत्य, धर्म, तप, वेदपठण, आचार, शौच, हे धर्म स्वर्गप्राप्तिविषयीं करावेत म्हणून त्यांस ब्रम्हदेवानीं सांगितले, नंतर देव, दानव, गंधर्व, दैत्य, महोरग, यक्ष, राक्षस, नाग, पिशाच, मनुज यांसही उत्पन्न केलें. भूतसमुदायांत ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण मुख्य केले त्यांत शुक्लवर्ण सत्वगुणी ब्राम्हण, लोहितवर्ण रजोगुणी क्षत्रिय, पीतवर्ण रजमिश्रित तमोगुणी वैश्य, कृष्णवर्ण तमोगुणी शूद्र याप्रमाणें चार वर्णानीं आपापले स्वभावानें राहवें. भरद्वाज-प्रश्नकरतात हे भृगो, सर्ववर्णांत कामक्रोधादिकांच्या योगानें वर्णसंकर दिसत आहे व सर्वांच्या देहांत पित्तशोणितादि आहे मग वर्ण-विभाग करण्याचें कारण दिसत नाहीं. तेव्हां भृगु सांगतात ब्रम्हदेवानीं जग केलें त्यावेळेस एकरूप सर्व ब्राम्हणजाति केली त्यांत स्वधर्मरूप कर्मे न केल्यानें तेच ब्राम्हण क्षत्रिय झाले. याचारी वर्णांस वेदाचा-अधिकार ब्रम्हदेवानीं पूर्वी दिला होता; परंतु त्यानीं आचार टाकल्या

नें ते शूद्रझाले म्हणून त्यांस वेदाचा अधिकार नाहीं.तीन वर्णांस वेदाचा अधिकार आहे. आतां आत्मज्ञानाविषयीं ज्याचा निश्चय आहे त्याच्यातपाचा नाश होत नाहीं. परब्रम्ह अभेदानें सर्वत्र व्यापक आहे असें न जाणणारे ब्राम्हण ,पिशाच्च ,राक्षसादि नाना प्रकारच्या म्लेंच्छ जातीस पावले आहेत म्हणून ऋषीनीं वेदोक्त संस्कारानें ज्या प्रजा केल्या त्यांस ब्राम्हण म्हणावें. असाविषय या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळावा:— भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, कोणच्या कर्मानें ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र होतात हें सांगावें. भृगु सांगतात हे भरद्वाज,जातकर्मादि अठ्ठेचाळीस संस्कार आहेत. संध्या,स्नान, जप, होम, देवपूजा, आतिथ्य, वैश्वदेव, व वेदाध्ययनादि करणारा ब्राम्हण सायुज्यता व सरूपता मुक्ती पावतो. वेदाध्ययन, दान, युध्द करणे, प्रजारक्षण, प्रतिग्रहादिग्रहण न करणें ह्या कर्मांच्या आचरणानें क्षत्रिय व क्रयविक्रयादि, पशुरक्षण, कृषी, दानग्रहण न करणें, वेदाध्ययनादि या कर्मानें वैश्य जाणावा. व सर्वभक्षण करणारा, सर्वकर्म करणारा, वेदत्याग, अनाचार, या कर्मानें शूद्र. आतां ब्राम्हण आहे आणि शूद्राचा आचार करील तरतो ब्राम्हण नव्हे म्हणून ब्राम्हणानें कामक्रोधादि त्याग, निष्काम बुध्दीनें यज्ञादि कर्म, काम्यादि सर्वकर्म फलत्याग, आत्मज्ञान निष्ठा, शौचादि सदाचार संपन्न, भूतदया, अशा लक्षणानीं असावें म्हणजे तो ब्रम्हलोकास पावतो. असाविषय या अध्यायांत आहे.

१७ अध्याय सत्रावा:— भृगु सांगतात वेद, तप, प्रजेची उत्पत्ति व लोकधारण हीं सर्व सत्यानेंच होतात अनृत हें अज्ञानाचें रूप तेंधारण केल्यानें जीव नरकास जातो; सत्य,अनृत या उभय मिश्रितानीं मानुषत्वास पावतो. ज्यास्थानीं सत्य आहे त्यास्थानीं धर्म, सुख व जेथें अनृत आहे तेथें अधर्म आणि दुःख हीं राहतात. शरीरापासून, मनापासून सुख दुःखें जीं लोकसृष्टींत होत आहेत त्यांस पाहून विवेकी पुरुष मोह पावत नाहींत. जसा राहूनें ग्रासलेला चंद्राचा प्रकाश दिसत नाहीं त्याप्रमाणें तमोगुणानें युक्त भूतांस सुख प्राप्त होत नाहीं. भरद्वाज प्रश्न

करतात हे भृगो, जें काम्य कर्मापासून सुख होतें त्यासुखास आम्हीं सु
ख म्हणत नाहीं. योगैश्वर्याचे ठाईं राहणाऱ्या ऋषींस व ब्रम्हदेवास श्रीना
रायणप्रसादानें आत्मज्ञान प्राप्त झाल्याचे सुखास सुख म्हणावें. ब्रम्ह
चारीही कामसुखाची इच्छा करीत नाहीं साक्षात् पार्वती पति शंकरानीं
कामशमन केलें तस्मात् पुण्यकर्मानें जीव, सुख व पाप कर्मानें दुःख
पावतो तेव्हां तुम्हीं विषय सुखाहून दुसरें सुख नाहीं म्हणतां हा लोक वाद
आहे. असें ऐकून भृगुसांगतात हे भरद्वाज, पुण्य कर्माचा त्याग केल्यानें
अज्ञान होतें व क्रोधलोभ हिंसादि घडतात म्हणून त्यांस इहलोकीं सुखनसू
न परलोकींही सुख होत नाहीं. जे पुण्यकर्म करणारे त्यांस स्वर्गीचें सुख-
प्राप्त होतें ज्यास्वर्गात क्षुधा, तृषा, जरा पाप हीं नाहींत म्हणून नित्यसुख-
स्वर्गीं आहे. इहलोकीं सुख दुःखें दोन्हीं आहेत. नरकांत केवल दुःखच
आहे तस्मात् आतां स्वर्ग सुखाहूनही मोक्ष सुख अधिक आहे. असा
विषय या अध्यायांत आहे.

१८ अध्याय अठरावाः— भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, दा
नरूप धर्म केल्याचें, तपाचें, वेदपठणाचें व हुत केल्याचें फल सांगावें; भृगु
सांगतात हे ऋषे, होम केल्यानें पापशमन, वेदपाठानें शांति, दान केल्या
नें भोग, तपकेल्यानें स्वर्गप्राप्ती या प्रमाणें होतात व स्वधर्माचरणानें स्व
र्ग फलाची प्राप्ती होते. भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, चार आश्रमांचे
धर्म सांगावेत. भृगुसांगतात पूर्वी ब्रम्हदेवानीं धर्म रक्षण व्हावा म्हणून
ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, यति, असे च्यार आश्रम केले त्यांत पहि
ल्या आश्रमानें शौचादि कर्म करून सायंकालीं, प्रातःकालीं, सूर्य,
अग्नि, देव यांचें उपस्थान करावें, गुरूस नमस्कार, वेदाभ्यास, अग्निसेवा,
गुरुसेवा, नित्यभिक्षामागून आणून तें अन्न गुरूच्या आज्ञेनें भक्षण-
करावें. गुरूच्या प्रसादानें वेदाध्ययन आलें म्हणजे त्यास स्वर्ग प्राप्त हो
तो. गृहस्थाश्रमाचे धर्म सांगतों. समावर्तन झाल्यावर पुत्रोत्पत्ति विष-
यीं विवाह, चांगल्या कर्मानें द्रव्य, अतिथीस भिक्षा, भूमीवर होम, पु
त्रादिकांस भोजनादि, यज्ञकर्मानीं देव संतोष, तर्पणानें पितर, वेदशा

स्वाध्यासानें ऋषीस संतोष, पुत्रोत्पादनानें ब्रम्हदेवाचा संतोष व भूतद याहीं करावीं व कठोर भाषण करूनये. अहंकारादि, हिंसाक्रोध वर्ज क- रावेत, पुष्पमाला, अलंकार, वस्त्रे, अभ्यंग यांचा उपभोग करावा. नृत्य, गीत, वाद्यादिकानीं इंद्रियांस सुरव होईल तें करावें; चतुर्विध अन्न भक्ष ण करावें, स्वगृहीं विषय सुखानुभव घ्यावा, अशाधर्मानें राहणारागृ- हस्थाश्रमी इहलोकीं सुखभोगून नंतर ज्ञानसंपन्न शिष्टांच्या गती- स पावतो. असाविषय या अध्या० आहे.

१९ अध्याय एकुणिसावा:— भृगुसांगतात हे भरद्वाज, वा नप्रस्थ धर्माचरण करणाऱ्यानीं पुण्यतीर्थ, हरिण, महिष, वराह, व्या घ्र, वन, गज हीं जेथें आहेत त्या अरण्यांत प्रवास करावा. वस्त्र, भोज नादि ग्राम्यभोगांचा त्याग करून वनातील औषधि, फल, मूळ, पर्णा दिनियमित परिमाणाचा आहार करावा. पाषाण, सूक्ष्मपाषाण, वा ळू व भस्मादिकांवर निद्रा करावी. दर्भ, हरिणचर्म, वल्कलें, यांचें परि- धान करावें. अंगावर केश, श्मश्रु, नखें, रोम होतात त्यांचें धारण करा वें. त्रिकालस्नान, भूमीवर आहुति, होम, कालनियमानें करावेत. समिधा, कुश, पुष्पें आणावींत. सडासंमार्जनादिकानें जागाशुध्द करावी, शीत, उष्ण, पर्जन्य, वायु, यांचें सहन करावें. पंचाग्नि साधनादि योग चर्यानें ते सर्व दोष द- ग्ध करून उत्तम लोकीं जातात. आतां सन्यास धर्म आचरण करणाऱ्यानीं अ ग्नि, धन, स्त्रीपुत्रादि, शय्यादि भोग सामग्री, स्नेह पाशादि त्यागकरून पा- षाण, सोनें, मृत्तिका हीं सारखीं मानून धर्म, काम, अर्थ यांतून बुध्दि दूरक रून शत्रु, मित्र, उदासीन यांवर दृष्टी सारखी ठेवावी. त्यानीं सर्वप्राणिमा त्राशीं द्रोह न करितां पर्वतावर, वाळवंटांत, वृक्षाखालीं, देवालयांत राहवें अथवा नगरांत पांचदिवस, गावांत एकदिवस, वास करून भिक्षामा- गण्यास शुध्द ब्राम्हणाच्या गृहीं जावें, याच्ना न करितां नारायण म्हणून- जें भिक्षान्न घालतील त्यानें प्राणधारण करावेत. काम, क्रोध, मोह, लो भ, कार्पण्य, अपवाद, अभिमान व हिंसादि यांचा त्याग करून सर्वभूतांस- अभय देऊन स्वशरीर प्राणाग्निचें भिक्षान्नानें हवन करून जीवाचें-

परमात्म्याचे ठायीं हवन करावें असायोग केला म्हणजे जसा काष्ठ रहित-अग्नी शांत होतो तसाहा वृत्तिलीन झाल्यानें ब्रम्हलोकास पावतो. भरद्वाज प्रश्न करतात हे भृगो, ह्यालोकाहून परलोक आहे असें ऐकतों; परंतु अनुभव नाहीं यासाठीं तो जाणावा अशी इच्छा झाली आहे. असें ऐकून भृगु-सांगतात हे भरद्वाज, हिमवान पर्वताच्या उत्तर भागीं परलोक आहे त्या देशांत मृत्यु, व्याधि नाहीं तेथें लोभ, मोहादिकांचा त्याग करणारे मानव राहतात, अधर्मादिक त्यास्थानी होत नाहींत, जे गुरूची उपासना करतात ते ज्ञान संपन्न होऊन इंद्रादि सर्व लोकांचा मार्ग जाणतात. हे भरद्वाज, हा धर्म मी तुला संक्षेपानें सांगितला. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, भृगुपासून अद्वैत श्रवणानें भरद्वाज संतोष पावून त्यानें भृगुऋषीची पूजा केली. असाविषय या अध्यायांत आहे.

२० अध्याय विसावा:— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, तुम्हीं सर्वज्ञ आहांत यास्तव मला आचार विधि सांगावा, भीष्म सांगतात हे धर्मराज, दुराचार करणारे जे ते असंत म्हणून विख्यात आहेत. जे आचार लक्षणानें राहतात ते संत म्हणून लोकांत प्रसिध्द होतात जे मानव राजमार्गांत, गोठ्यांत, गायींमध्यें, धान्यांत विष्ठा व मूत्र करीत नाहींत त्यांचें कल्याण होतें मनुष्यानीं शौच आचमन करून नदींत स्नान करावें. मग देवतातर्पण करून सूर्योदयीं निद्रा करूं नये, प्रातःकालीं पूर्व दिशेस, सायंकालीं पश्चिम दिशेस उभें राहून गायत्री जप करावा. नंतर सूर्योपस्थान करावें. पाद, हस्त, मुख यांचें प्रक्षालन करून पूर्वाभिमुखीं, मौन धारण करून अन्नाची निंदा न करितां उत्तम उत्तम म्हणोन भोजन करावें उत्तरापोशन करून उठावें. आतां नारद ऋषीनी सांगितलेला आचार तुला सांगतों. यज्ञशाला, चतुष्पथादि, देवालय, सदाचार संपन्न ब्राम्हण, यांस प्रदक्षिणा नित्यनेमानें करावी. स्वकीयजन, सेवक, अतिथी, यांसही पाक भेद न करितां भोजन घालावें, मनुष्यानीं सायंप्रात भोजन दोनवेळ करावें या रेवरीज मध्यभागीं भोजन करूं नये. होम कालीं हवन, ऋतु कालीं स्त्रीगमन, परस्त्री वर्ज करणाऱ्यास ब्रम्हचारीच जाणावा. ब्राम्हण भोजन करून राहिले

लें जें अन्नतें अमृत, मातेच्या हृदया सारखें हित करणारें आहे त्याचें भक्षण करणाऱ्यास सत्यस्वरूपी ब्रम्हजें तें प्राप्त होतें. मृत्तिका मर्दन करणारा, तृणच्छेद करणारा, नखांनीं छेदून यज्ञशेषमांस खाणाऱ्यास ब्रम्हस्वरूपाची प्राप्ती होतनाहीं. यज्ञांत संस्कार केलेले मांस अध्वर्यूनें दिलें असतां भक्षण करूंनये, श्राध्दशेषभक्षण करूंनये, तात्पर्य हिंसायुक्त धर्म करूंनये, गृहस्थाश्रमी असून तो स्वदेशीं अथवा परदेशीं असलात रीत्यानें अतिथींस अन्न घालावें त्यांस उपवासी ठेऊंनये, गुरूंस पित्रादिकांस सत्कारानें अन्नादिद्यावें व बसावयास आसन द्यावें. नमस्कार करावा, त्यांची पूजा करावी, त्यांच्या आशीर्वादानें आयुष्य, यश, लक्ष्मीत्यांस प्राप्त होते, सूर्योदय समयीं सूर्याकडे, नग्नपरस्त्री यांजडे पाहूंनये, मैथुन करणेंतें एकांत स्थळीं करावें. सायंप्रातःकालीं ब्राम्हणास नमस्कार करावा, त्यांचें दर्शन होतांच सुखानें त्याशीं भाषण करावें, देवालयांत, गायींचे समुदायांत, ब्राम्हणाचे श्रौतस्मार्त कर्मानुष्ठानीं दक्षिण बाहूचे खालून वस्त्र परिधान करून बाहु मोकळा ठेवावा, जशी उत्तम शेतकी केलीम्हणजे धान्यमिळतें तसें ब्राम्हण पूजन केल्यानें दिव्यस्त्री अन्नपानादि इष्टफल प्राप्ती होते. श्मश्रुकर्म, शिंक, स्नान, भोजनादि झाल्यावर ब्राम्हणांस नमस्कार करावा म्हणजे आयुष्य वृध्दी होते. सूर्याभिमुख बसून मूत्रोत्सर्ग करूंनये व आपली विष्टा पाहूंनये, स्त्रीसह निद्रा व भोजन करूंनये, वडिलांस तूं असें नाम घेऊन बोलूंनये, धर्म जो केला त्याचा उच्चार करूंनये, पापकेल्याचा उच्चार करावा न उच्चार करील तर जसा राहु चंद्रास ग्रासतो तसें पाप कर्म यास ग्रासतें तस्मात् स्त्रियादिकांची सहायता नधरितां एकस्थानेंच धर्माचरण करावें हा धर्म केला असतां तो देवत्व मनुष्यत्वादि पाववणारा आहे आणि शेवटीं धर्म करणारे यांस मोक्षाख्य सुख प्राप्त होतें. असा वि० या० अ० आहे.

२१ अध्याय एकवीस :— धर्मराजप्रश्न करतात हे भीष्मा, पुरुषास चिंतन करण्या विषयीं योग्य असें अध्यात्म नामक शास्त्र कोणतें आहे किंवा अध्यात्म (चित्तास अधिकार पावून स्वरूप चिंतनीं ए

कामना रूप योग धर्म होणें ),याचें लक्षण, प्रकार, काय आहेत ते सांगा. तेव्हां दोन अध्यात्म शब्दांचा अर्थ व स्थावर जंगमात्मक विश्व कोठून उत्पन्न झालें तें प्रलय कालीं कोठें जातें ? भीष्म सांगतात हे धर्म, प्रत्यंतश्रेयस्कर, सुखप्राप्त होणारें, सृष्टि प्रलय संयुक्त ब्रम्हवेत्यानीं वेद वाक्यें करून प्रत्यक्ष साक्षात्कार रूप दाखविलेलें तें अध्यात्म तुलासांगतो. जें जाणलें असतां पुरुष इहलोकींच प्रीति, ब्रम्हसौख्य, फललाभादि पावतो. जरायुजादि सर्वभूतांची उत्पत्ति व लय, पृथ्वी, वायु, आकाश, उदक, तेज ह्या पंचमहाभूतांचें ठायींच होते. मूल प्रकृतीरूप परमात्मा सर्वभूतांची उत्पत्ति व लय पंचमहाभूतांचें ठायींच करतो. जशा समुद्रा पासून लाटा होतात आणि नाश समुद्रांतच पावतात त्याप्रकारें-अथवा जसा कूर्म आपलीं हस्त पादादि अंगें पसरतो आणि उपसंहार आपले ठायींच करतो त्याप्रमाणें परमेश्वर विश्व करतो. मी देही म्हणून अभिमानानें जीव, सुख दुःख भोगणारा होतो. व ईश्वराहून भिन्नमी आहें असें मानितो. हें वैलक्षण्य ईश्वरानेंच केलेलें जीव पाहात नाहीं. देह अन्ना पासून झाला व अन्नानेच वाढला व देहनाश अन्नरूप पृथ्वीचे ठायीं होतो. तेव्हां मी देहा पासून पृथक् आहें अशारीतीनें जीवाचा त्याग करून ब्रम्हरूपच मी आहें असें ज्ञानानें पाहावें तें पाहात नाहीं म्हणून जीवास बंध होतो. आकाशाचे तीन गुण शब्द, श्रोत्र, छिद्रें, वायूचे स्पर्श, चेष्टा, त्वचा अग्नीचे रूप, चक्षु, अन्नादिपचन, उदकाचे रस, क्लेद, जिव्हा, पृथ्वीचे गंध, घ्राण, शरीर, अशागुणानीं युक्त पंचमहाभूतें आहेत. श्रोत्र, चक्षु, त्वक्, जिव्हा, घ्राण, हीं पंच ज्ञानेंद्रियें मन, बुध्दि यांचा चलन वलन करणारा क्षेत्रज्ञ परमात्मा आहे. चक्षूनें विषय ग्रहण, संशय होणें हा मनाचा गुण, निश्चय करणें हा बुध्दीचा गुण या प्रमाणें आहेत. पादतला पासून ऊर्ध्व स्थित जें शरीर त्याच्या वर खालीं चहूंकडे व्यापक असणारें जें साक्षिचैतन्य त्यास ज्ञानचक्षूनें पाहावें म्हणजे चैतन्यानें आकाशादि व्यापिलें आहे असें ध्यानांत येतें. सत्व, रज, तम हे तीन गुण मूलप्रकृ-

ति पासून होतात व जरायुजादि सर्व भूतांची उत्पत्ती आणि लयहीं मूल प्रकृतीचे ठायींच होतात. अशा प्रकारें जाणलें म्हणजे शम प्राप्त होऊन मन निर्मल होतें. मग निश्चयात्मक बुध्दी होऊन समाधि सुखास पावतो. सुषुप्ति सुख आणि समाधि सुख हीं सारखींच आहेत; परंतु सुषुप्तीचे ठायीं मोहरूपी जें अज्ञान त्याचा नाश होत नाहीं म्हणून त्यास कमी पणा आहे. समाधीचे ठायीं अज्ञान राहतच नाहीं म्हणून समाधि सुख प्रशस्त आहे. हें जाणलें असतां समुद्रा सारिखा पूर्ण बोधि होतो. प्राण्यांच्या हृदयांत सत्व, रज, तम हे तीन गुण आहेत त्यांत हर्ष, प्रीति, आनंद, सुख, निर्विकल्प सुखानुभव हीं प्राप्त झालीं म्हणजे सात्विक गुणी जाणावा; असंतोष, परिताप, शोक, लोभ, अक्षमा हीं रजोगुणाचीं लक्षणें आहेत. अवमान, मोह, प्रमाद, निद्रा, आलस्य हीं तमोगुणाचीं लक्षणें आहेत. ज्याचें मन शांत झालें तो पुरुष इहलोकीं, परलोकीं सुखी जाणावा. बुध्दि आणि क्षेत्रज्ञ यांचा भेद इतकाच आहे कीं, दोघे एके ठिकाणीं मशक, उदुंबरासारखे असून त्यांत बुध्दि अहंकारादि गुणास उत्पन्न करते. क्षेत्रज्ञ साक्षिरूपानें पाहतो. याच ज्ञानानें ध्यानशील आणि ज्याची प्रीति आत्म्याचे ठायीं असते तो जसा उदकांत राहणारा हंसपक्षी उदकानें लिप्त होत नाहीं तसा हा ज्ञानी, लोकांत असून लिप्त होत नाहीं. प्रारब्ध कर्म आहे तों पर्यंत देह रहातो त्याची समाप्ती झाली म्हणजे उत्तम सिद्धीस जातो. याप्रमाणें बहुत विद्वानांस मोक्ष होतो. असे बहुत प्रकार सांगून हे धर्मराज, यांस अध्यात्मज्ञान म्हणतात याचा स्वीकार करणारा पुरुष मुक्त होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बाविसावा:— भीष्म म्हणतात हे धर्मराज, आतां च्यार प्रकारचा ध्यान योग तुला सांगतों जो योग जाणून महर्षि सिध्दीस पावले त्या योगानें संसार दोष दूर होतो तो योग करण्यास स्त्रियादि संग ज्या स्थानीं नसेल व विवाद नाहीं शांतिरूप अशा स्थानावर बसून इंद्रियांचा समुदाय मनाच्या स्वाधीन करणें हेंच पिंडिकार करणें म्हणजे काष्ठासारिखा देह अकुंचित करून मनाची एकाग्रता झाली म्हण

जे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच विषय तो जाणत नाहीं. जशी मेघांत विद्युल्लता चंचलरूप तसें हें मन अतिचंचल म्हणून योगाभ्यासानें वश करून ध्यानमार्गी लावावें. तसें लावलें असतां ही पुनः वायूसारखें भ्रांती पावतें तथापि पुनः दृढ वैराग्यानें एकाग्रता करावी. या प्रमाणें अभ्यास करतां प्रथम विचाराख्य ध्यान केल्यानें क्रमानें चित्त समाधिसुखास पावतें या प्रकारच्या निश्चयानें चित्त, ध्यान मार्गास लावून योगी मोक्ष सुखास पावतो. असा वि० या० अ० आहे.

२३ अध्याय तेवीस :— धर्मराज प्रश्न करतात. हे भीष्मा, तुम्हां पासून मी च्यार आश्रम आणि ज्यांत बहुत कथा असे राजधर्म ऐकिले आतां जप करणाऱ्यास फल प्राप्त कोणतें होतें. व जपाचा विधि, म्हणजे वेदांतविचार किंवा चित्तवृत्तिनिरोध? जप हा शब्द ब्रम्हयज्ञासच म्हणतात कीं कसें हें सर्व सांगावें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, यमाचा आणि कालस्वरूपी ब्राम्हणाचा संवाद मी ऐकिला आहे तो सांगतों अप्रकरणाऱ्यास मोक्ष प्राप्तीसाधनें, ऋषींनीं सांगितलीं तीं सांख्य, योग, वेदांतश्रवणा विषयीं सन्यास व मनाचा समाधि, इंद्रियजय, हीं मुख्य कारणें होत सत्य, अग्निसेवा, एकांत देशसेवन, ध्यान, तप, दम, क्षमा परगुणावर दोष न ठेवणें, अल्प आहार, कामजय, मितभाषण, मनविक्षेप रहित करणें, या प्रकारचा धर्म आचरण केला म्हणजे जपकरणारा मोक्षमार्गाधिकारी होतो नंतर दर्भावर बसणें, हातांत दर्भ, सार्वकाल दर्भानीं वेष्टिलेला असून ब्रम्हचिंतनादि करणारा जापक, मोक्षास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

२४ अध्याय चोविसावा :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, जपानुष्ठान करणाऱ्यास जरामरण नाहीं, योगसिध्दी, इच्छेनें देहत्याग, ब्रम्हलोक गमन, विशुद्ध मोक्ष, इतक्या गती त्यास प्राप्त होतात यावांचून दुसरी गति त्यास आहे किंवा नाहीं? हें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, जापक यथाशास्त्र जपानुष्ठान पूर्णांग सहित न करणारा व अवमानानें जप करणारा, अहंकारानें पराचमान करणारा नरकास जातो. फलाभिसंधि

( जो जो विषय पाहिल्यावर प्रीति धरून अणिमादि ऐश्वर्य मिळावें या कारणानें जपानुष्ठान करणारा ) आणि ज्याच्या बुध्दीस परमार्थाची वार्ता ही नाहीं अशा प्रकारचे सर्व जापक मोहानें नरकास जातात. असा विषय या अध्यायांत आहे.

२५ अध्याय पंचविसावा :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, जपानुष्ठान करणारे जापक कोणकोणत्या नरकास जातात ? असें ऐकून भीष्म सांगत हे धर्मराजा, नानाप्रकारचीं दिव्य विमानें, सभा, बाग व सुवर्णमय स्थानें आहेत असे जे इंद्र, वरुण, यम, कुबेर, शुक्र, बृहस्पति, मरुत, विश्वेदेव, साध्य, अश्विनदेव, रुद्र, आदित्य, वसु इत्यादिकांचे लोक स्वर्गीं आहेत ते नरकरूप जाणावेत. ज्या स्थानीं शोक व कालादिकांचें भय नाहीं त्याला विष्णुपद म्हणतात. तेंच परम स्थान होय त्या वांचून जितके लोक आहेत ते नरक संज्ञित जाणावेत. असा विषय या अध्यायांत आहे.

२६ अध्याय सव्विसावा :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, काल, मृत्यु, यम, इक्ष्वाकु आणि ब्राम्हण यांचा संवाद झाला आहे असें पूर्वी तुम्हीं बोलला तो सांगा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, कोणी एक ब्राम्हण षडंग वेदाध्ययन करणारा तत्वदर्शी जापक होता त्यानें हिमाचलावर संहिता जप करून सहस्त्र वर्षें तप केलें त्यास वेदमाता गायत्री देवी प्रसन्न झाली आणि बोलली हे विप्रर्षे कोणते कारणानें जपानुष्ठान करितोस तें सांगावें ? ब्राम्हण बोलतो हे देवि, मजावर इतकाच द्यावा कीं, जप करण्याविषयीं निरंतर माझी बुद्धि व्हावी. म्हणजे माझे मनाचा समाधि दिवसेंदिवस होत जाईल. नंतर देवीनें त्या ब्राम्हणास वर दिल्हा आणि ती बोलली तूं नरकास जाणार नाहींस; ब्रम्हलोकास जाशील. तुझे जवळ धर्म, काल, मृत्यु, यम हे येऊन तुझा व त्यांचा संवाद होईल असें सांगून देवी गुप्त झाली. ब्राम्हण जप करीत आहे तों जप समाप्तीचे वेळेस साक्षात धर्म येऊन बोलतो हे ब्राम्हणा, त्वां जप केलास त्या योगानें देवांचे उत्तम लोक तूं जिंकलेस तरि शरीराचा त्याग करून उत्तम लोकास जावें. हें ऐ

कून ब्राम्हण म्हणतो त्यालोकीं करवमला कांहीं नाहीं; यास्तव देहमी राकीत नाहीं. धर्मम्हणतो हे ब्राम्हणा, अवश्य देह टाकून स्वर्गी जावेंस ब्राम्हण म्हणतो हेधर्मा, यादेहा वांचून स्वर्गीवास करण्याची मला इच्छा नाहीं. धर्म म्हणतो हे ब्राम्हणा, तूं शरीर टाकून स्वर्गी जातनाहींस तरि काल, मृत्यु, यम हे तुला नेण्या करितां आले आहेत ते पाहा. असें म्हणतांच यम-बोलतो हे ब्राम्हणा, तुला जपाचें फल द्यावें म्हणून मी आलों आहें. तसाच-काल म्हणतो हे ब्राम्हणा, तुलास्वर्गी न्यावयास मी आलों आहें. तसाच मृत्यु म्हणतो हे ब्राम्हणा, कालानें तुला स्वर्गी नेण्यास मलापाठविलें आहे. त्यांचीं भाषणें ऐकून ब्राम्हण बोलतो आपण आलां आहांत त्यायोगानें मी कृतार्थ आहें कोणच्या कारणानें आपलें येणें झालें तें मलासांगावें असें बोलून त्यानें अर्घ्यपाद्यादि देऊन त्यांचीपूजा केली तों अकस्मात त्याजागीं तीर्थयात्रा करीत करीत इक्ष्वाकु राजा प्राप्त झाला नंतर राजानें सर्वांस पाहून नमस्कार केला आणि कुशल प्रश्न विच्यारून त्यासर्वांचीपूजाकेली. नंतर जप करणाऱ्या ब्राम्हणानें राजास आसन देऊन त्याची पूजाकेली. आणि कुशल विचारून म्हणतो तुमच्या आगमनानें मलासंतोषझाला इच्छा असेल तें मागावें. राजाम्हणतो मीराजा, तूं ब्राम्हण षट्कर्म करणारा, तुला कांहीं द्रव्याची इच्छा असेल तर माग. ब्राम्हण म्हणतो मी प्रतिग्रहापासून निवृत्त आहें जे प्रपंचांत असणारे ब्राम्हण त्यांस त्वां द्रव्य द्यावें तुझी इच्छामी तपसामर्थ्यानें पूर्ण करीन. राजाम्हणतो मीक्षत्रिय युध्दा वांचून दे असें कोठेंहीं भाषण केलें नाहीं, परंतु मागतों शतवर्षपर्यंत केलेल्या जपाचें संपूर्ण फल तूं मलाद्यावें. ब्राम्हणम्हणतो युध्दा वांचूनयाच्या केलीनाहीं म्हणालास आतां पुनः याचना करितोस; तरि तुजला जपाचें संपूर्ण फल देतों. राजा म्हणतो त्वां सर्वजपाचें फल मला दिलेंस त्यानें मी तृप्त झालों आतां जपाचें फल कोणतें तें सांगावें. ब्राम्हण म्हणतो, फल प्राप्ती मी जाणत नाहीं परंतु धर्म, काल, यम, मृत्यु हे जाणत आहेत. राजाम्हणतो धर्माचें फल काय हें तुला ठाऊक नाहीं मग हें जपाचें-फल तुझें तुलाच पावो मलानको. ब्राम्हण म्हणतो हे राजा, आतां अस-

त्र्यवाणी त्यांबोलूंनयेस. फल द्यावें म्हणालास त्या प्रमाणें मी दिलें मला फल कायहें ठाऊक नाहीं म्हणून तूं सत्यसोडून कोस. सत्यहे एकाक्षर ब्रम्ह आहे, सत्यहे एकाक्षर तप आहे, सत्यहा एकाक्षर यज्ञ आहे, सत्यहें एकाक्षर ऋत आहे तस्मात् सत्यानेंच पंचमहाभूतें चालली आहेत सर्व सत्यानेंच आहे. धर्म आणि सत्य या दोघांची तुला केली तों सत्य अधिक भरलें तस्मात् तूं सत्याचे ठायीं स्थिर हो. धर्म म्हणतो उभयतांस फलसारखें आहे तों रूप धारण करून स्वर्गत्या स्थानीं आला आणि म्हणतो- मी स्वर्ग आहें तुम्हां उभयतांस फल सारखें आहे तरि स्वर्गी चलावें. राजा म्हणतो मला स्वर्ग नको ब्राम्हणास इच्छा असेल तर माझें श्रध्दा फल घेऊन स्वर्गी जावो. ब्राम्हण म्हणतो बाल पणांत कळूं लागल्या- पासून मी हा तपसरला नाहीं प्रतिग्रहापासून मी निवृत्त आहें. राजा म्हणतो तूं माझेंही फल घे. अशा प्रकारें दोघे वाद करीत आहेत तों त्यास्थानीं वेष धारण केलेले दोन पुरुष ज्यांस काम, क्रोध म्हणतात ते येऊन बोलूं लागले कीं आमचा वाद निवडावा तों त्या दोघांतील, एक क्रोध रूपी विरूप बोलतो हे राजा, हा कामरूपी विकृत जो आहे यानें गोप्रदानाचें फल- मला दिलें तें मी धारण केलें परंतु माझें फल हा गृहण करीत नाहीं नंतर विकृत म्हणतो हे राजा, हा क्रोधरूपी विरूप जो आहे हा मी आपलें फल देत असतां धारण करीत नाहीं आणि तुजप्रत मिथ्या बोलतो- राजा म्हणतो हे विरूप, सत्यभाषण जें झालें असेल तें सांगावें. विरूप म्हणतो हे राजा, ह्या विकृतानें पूर्वी गाय ब्राम्हणास दान केली नंतर- मी याचे जवळ येऊन बोललों कीं, तूं दान केलेल्या गायीचें फल आपलें मला द्यावेंस हें ऐकून त्यानें फल मला दिलें नंतर मी कपिलागायी दोन, ब्राम्हणास दिल्या त्यांचें द्विगुणित फल देत असतां हा विकृत- घेत नाहीं तेव्हां यांत शुध्द कोण व दोषी कोण आहे हें तुम्ही सांगावें. राजा म्हणतो हे विकृत, हा विरूप आपलें फल देत असतां तूं ग्रहण करीत नाहींस? तेव्हां तूं दंडास अधिकारी आहेस. असें ऐकून विकृत म्हणतो हे राजा, मला जाण्याविषयीं आज्ञा द्यावी या विरूपानें

याञ्चा केली म्हणून यास फल दिलें हा आपलें फल मला घे म्हणतो तें मी घेतनाहीं. ब्राम्हण म्हणतो हे राजा, या उभयतां काम क्रोधांचा संवाद ऐकि-लास आतां माझे जपाचें फल संपूर्ण घे न घेसील तर शाप देईन. असें बोलू-न राजाचे हातावर उदक ब्राम्हणानें घातलें नंतर राजा म्हणतो हें फल-तुल्य व मला सारखें असो. नंतर विरूप बोलतो हे राजा, ब्राम्हणाचा आ-णि तुझा वाद झाला त्याचा निर्णय व्हावा म्हणून आम्ही उभतां रूपें घेऊन आलों होतों. उभयतांला फल सारखें आहे असा निर्णय झाला आम्हीं. काम, क्रोध व हा काल, मृत्यु, धर्म यांचे आज्ञेनें त्वां ब्रम्हलोकादि उत्तम लोकांस यथेच्छ जावें. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, ही जापकाची क-था तुम्हांस सांगितली तो जापक ब्राम्हण, देवी गायत्रीचे प्रसादानें मु-क्तीस पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्तावीसः— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, पूर्वाध्यायांत विरूपाचें भाषण श्रवण केल्यावर ब्राम्हण आणि राजा या दोघांनीं त्यास उत्तर काय दिलें व त्यांचा संवाद कसा झाला? पुढें त्यांनीं का-य केलें हें सांगावें. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, विरूपाचें वाक्य श्रवण के-ल्यावर त्या ब्राम्हणानें धर्मादिकांची पूजा केली व अन्य ऋषी त्यास्थानीं आले होते त्या सर्वांची पूजा त्यानें करून तो राजास बोलतो हे राजा, त्वां दि-लेल्या फलानें त्वां स्वर्गीं जावें मला गायत्री देवीचें वरदान आहे यास्तव-पुनः मी जप करतों हें ऐकून राजा म्हणतो मला तुम्हीं फल दिलें तें व्हां मी पु-नः जप करून फल सिद्धि करून घेणार तर मला फल दिलें हें पुण्य झा-लें या पुण्य फल वृध्दीनें तुला ही जपाचें फल प्राप्त होवो. नंतर देवांसहित इंद्र, लोकपाल, वेद, सरस्वती, नारदादि, ब्रम्हदेव, विष्णु व शेष त्यास्थानीं आले नंतर आकाशांत वाद्यें वाजूं लागलीं, पुष्पवृष्टी झाली, अप्सरा नृत्य करूं लागल्या. नंतर स्वर्गानें सांगितल्या प्रमाणें ब्राम्हण व राजा या उ-भयतांनीं योगाभ्यासानें मस्तकाचे ठायीं प्राण धारण केले नंतर ब्रा-म्हणाचे प्राण ब्रम्हरंध्रास फोडून तेज निघालें तें सर्वांचे दृष्टीस पडत अ-सतां ब्रम्हलोकास गेलें तें ब्रम्हदेवानीं पाहतांच त्या तेजाचा वीनभर

लांब पुरुष झालेला पाहून त्यास ब्रम्हदेव म्हणतात हे जापक, जपक रणारे ब्राम्हणाशीं तुल्यफलता योगिपुरुषांचीहि आहे आतां तूं माझे-लोकीं राहा अथवा मत्स्वरूपीं ऐक्य पाव असें ऐकतांच ब्राम्हणानें ब्रम्हदेवाचे मुखांत प्रवेश केला नंतर राजाही याचविधीनें ब्रम्हमुखीं गेला. नंतर देव ब्रम्हदेवास नमस्कार करून बोलतात हे ब्रम्हदेव, आज योगानें व जापकाचें फल उत्कृष्ट पाहिलें हें ऐकून ब्रम्हदेव बोलले हे देवहो, संहितापठण करणाऱ्यास जें फल तेंच मन्वादिस्मृति पठण करणाऱ्यास-होतें असे जे ते माझ्या लोकास पावतात तुम्हीं निघून जावें. असें ऐकून ब्रम्हदेव त्यास्थानींच अंतर्धान पावले असें पाहून देव आपापले स्थानीं निघून गेले. असाविषय या अध्यायांत आहे.

२८ अध्याय अठ्ठावीस:— धर्मराज बोलतात हे भीष्मा, योगही ज्ञान सहायच असला तर ज्ञान फल देतो असें मानून मी आपणास-प्रश्न करतोंकीं, ज्ञान सहित जे योग, वेद, अग्निहोत्रादि नियम, यांचें फल कोणतें व जीवाचें स्वरूप कसें जाणावें हें मला सांगा? असें ऐकून भीष्म सांगतात हे राजा, याविषयीं मनु व बृहस्पती यांचा इतिहास सांगतों. बृहस्पति प्रश्न करतो हे मनो, जगतास कारण, ज्याच्या निमित्तानें कर्मकांड प्रवृत्त झालें व ज्ञान झालें असतां ब्राम्हण फल कोणतें सांगतात, ज्याचा प्रकाश वेदवाक्यानीं होत नाहीं तें मलासांगा. व त्रिवर्ग प्रतिपादक शास्त्र, वेद, वेदांतर्गतमंत्र जाणणारे पुरुष, अनेक यज्ञानीं, मोठमोठ्या गोप्रदानानीं, जें फल प्राप्त करून घेतात तें कोणतें व त्याची प्राप्ती-कोणत्या प्रकारानें होते व तें फल देशांतरीं किंवा प्रत्यगात्म्याच्या ठायीं होतें; पृथ्व्यादि स्थावर, जंगम, स्वर्ग, देव हीं सर्व ज्यापासून उत्पन्न-होतात तें मलासांगा. मनुष्य, ज्यानें ज्ञान इच्छितो त्या परमात्म्यानें स्वरूपमी त्या ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वण वेद, शिक्षादि चतुष्टयास-हीन व्याकर्ण या सर्वांचें अध्ययन केलें असून जाणत नाहीं यास्तव अस्ति, उपलब्धव्या इत्यादि सामान्य शब्द व सत्यज्ञान इत्यादि विशेष-णानीं ईश्वराचें स्वरूप, ज्ञान व कर्म यांचें फल काय? तसेंच प्राणी दे

प्राप्त कसा होतो व पुनः त्यास देहप्राप्त कसा होतो हें सर्व तुम्हीं मला सांगा. असा प्रश्न ऐकून मनु सांगतो हे बृहस्पते, ज्या प्राण्यास जें प्रिय असतें तेंच त्यास सुख व ज्यास जें अनिष्ट तेंच त्यास दुःख असें म्हणतात. मला इष्टप्राप्त व्हावें अनिष्ट नसावें याविषयीं कर्म कांड प्रवृत्त झालें आणि इष्ट, अनिष्ट हीं मला नसोत याविषयीं ज्ञानमार्ग प्रवृत्त झाला. वेदांत विषय प्राप्ति करितां कर्म मार्ग सांगितले आहेत यास्तव विषय सुखाची इच्छा करणारा पुरुष अनेक प्रकारच्या कर्ममार्गांत प्रवृत्त होऊन अंतीं नरकांत जातो यास्तव कर्माच्या फलाची इच्छा सोडून ज्ञान मार्गाचाच आश्रय सर्वांनीं करावा. असें ऐकून बृहस्पति बोलतो हे मनो, प्रिय व अप्रिय जीं सुख दुःखें आहेत त्यांत इष्ट जें सुख तें ग्रहण करावें. अनिष्ट जें दुःख त्याचा त्याग करावा. असें जो पुरुष इच्छितो त्यास त्याची ती इच्छा कर्मांनीं पूर्ण होते. यास्तव मला असें वाटतें कीं, या हून कर्माचें फल दुसरें नाहीं. असें ऐकून मनु बोलतो हे बृहस्पते, विषय सुखाची इच्छा -सोडून कर्माचें अनुष्ठान करून परब्रम्ह प्राप्ती करून घ्यावी या करतांच मुख्यत्वें करून कर्म विधि प्रवृत्त आहे. स्वर्गादि फलश्रुती तर विषयी पुरुषासच आवर्ण घालते तस्मात ब्रम्हज्ञानार्थच कर्में करावीं; परंतु क्षुद्रफला करितां तीं करूनयेत. आतां कर्मांला बंध कल असतांती बंध निवर्तक कशीं होतील? अशी शंका घेऊन मनु बोलतात हे बृहस्पते, मन व कर्म हीं संसार प्रवर्तक असून ब्रम्ह प्राप्तीस साधन आहेत, कारण वेदानें सांगितलेलें कर्म क्षुद्र फलास कारण असल्यामुळें नाशास कारण आहे तथापि तेंच कर्म फल रहित असल्यामुळें मोक्षास-कारण आहे त्यांत मनानें कर्माच्या फलाची इच्छा न धरितां कर्म करावें याचें नाव कर्म त्याग होय. जसे नेत्र रात्रीच्या अंतीं अंधःकारानें आपल्या स्वरूपाचें आच्छादन न झाल्यामुळें प्रकाशानें वर्जनीय-कंटकादिकांस पाहतात तसें ज्ञान विवेकानें युक्त झालें असतां अशुभ कर्मांस पाहातें मनुष्य ज्ञानाच्या योगानें सर्प, कुशाग्रें, कूप इत्यादिकांस जाणून वर्ज करितात. कोणी ज्ञान नसल्यामुळें त्याजवर पडता

त यास्तव ज्ञानानें फल किती श्रेष्ठ आहे तें पहा. ज्ञानपूर्वक केलेलें कर्म ही सफल होतेंनें असेंकीं, यथाविधीनें योजिलेले सर्व मंत्र यथोक्त केलेले यज्ञ व विध्युक्त दक्षिणा, तसेंच यथाशास्त्र अन्नदान, ज्या देवतेस हविर्दान कर्तव्य आहे त्या देवतेच्या ध्यानाविषयीं मनाची एकाग्रता, हीं सर्व बरोबर असल्यास त्या कर्माचें फल प्राप्त होतें असें विद्वान सांगतात, कर्त्यांच्या स्वभाव भेदानें कर्मांचे फल भेद होतात, वेदांत, कर्में, विधी, मंत्र या सर्वांचे सात्विक, राजस, तामस असे तीन भेद आहेत आणि त्यांचे कर्त्यांच्या स्वभावाच्या भेदानें ही भेद होतात, ते असें कीं, मोक्षार्थ जो विधी तो सात्विक, स्वर्गार्थ जो तो राजस, अभिचार कर्मार्थ जो तो तामस, ज्ञानपूर्वक जो कर्म करतो तो सात्विक, ज्ञान नसून केवळ प्रवृत्ति मात्र परजो करतो तो राजस, दांभिक कर्म जो करतो तो तामस इत्यादिकांचें जें कर्म तें क्रमानें वीर्यवत्तर व निर्वीर्य होतें. तसेंच सात्वीक, राजस, तामस, यां पैकीं कर्त्यांचें मन जसें असेल तसें त्यास फल प्राप्त होतें. मनुष्यास या लोकीं, जसें शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श या विषयांचें सुख होतें असेंच स्वर्गांत ही पुण्यकारक कर्मानें होतें यास्तव त्या विषयांची उपेक्षा करून ज्ञानाचाच आश्रय मनुष्यानें करावा; म्हणून मनुष्य ज्ञानाचाच अधिकारी आहे. कदाचित कोणी म्हणतील कीं कर्मापासूनच मोक्ष घडतः असतां ज्ञानाचा उपयोग काय? असें मनांत आणून मनु बोलतात हे बृहस्पते, हा जीव शरीरानें जसें जसें कर्म करतो तसें शरीरानेंच कर्माचें फल भोगतो कारण शरीरच सुख दुःखाचें स्थान आहे. कोणी म्हणतील वाणीनें व मनानें केलेल्या कर्मानेंच मोक्ष प्राप्त होईल तर असें घडत नाहीं; कारण वाणीनेंच हा पुरुष जें जपादिक कर्म करतो त्या त्या फलाचा उपभोग वाणीनेंच भोगतो. मनानें जें करतो त्याचा उपभोग मनानेंच भोगतो यास्तव वाणी व मन यांस अगोचर जी वस्तु तीचा लाभ कसा होईल? हा जीव फलाचे इच्छेनें सात्वीक राजस, तामस जसें कर्म करील तसें तसें शुभाशुभ भोगतो. त्यांत शुभ घडलें असतां संतोष मानणें, अशुभ प्राप्त झालें असतां असंतोष मानणें

हें मूर्खत्व आहे. जितचीत पुरुष परमेश्वराचें स्वरूप जाणून त्या-
च्याश्रेष्ठपदास जातात तें मी तुला सांगतो. जें रूप, रस, गंध, स्पर्श, श
ब्द यानीं हीन असून जास स्त्री, पुरुष, नपुंसक, सत व असत् असें कां
हींच म्हणतां येत नाहीं म्हणून जें परिमाण रहित ब्रम्ह त्यास तूं जाण.
असा विषय या अध्यायांत आहे.

२९ अध्याय एकुणतीसः— मनु बोलतो हे बृहस्पते, माया
जास सहाय अशा ब्रम्हापासून आकाशादि पंचमहाभूतें झालीं-
त्यांत पृथ्वीचे ठायीं जग उत्पन्न होतें. पुरुषाचीं शरीरें लवणोदक त्या
यासारखीं जलांत जाऊन तेज, वायु, आकाश यांत जाऊन अज्ञानी
जीव मायारे फिरतात जे ज्ञानी आहेत ते आकाशाहून ही परजें ब्रम्ह
त्यास प्राप्त होतात. याप्रमाणें ज्ञात जें परब्रम्ह तें ऊष्ण, शीत, मृदु, आ
दिकरून सर्वगुणानीं हीन आहे असें जर आहे तर रसादिकांचा ज्ञाता-
कोण? अशी शंका घेऊन मनु सांगतो. त्वगिंद्रिय स्पर्श जाणतें, जिव्हे-
नें रसज्ञान होतें, घ्राणेंद्रियापासून गंध, श्रवणेंद्रियापासून शब्द, च
क्षुरिंद्रियानें रूप हीं समजतात. आत्मयोग न जाणणारे पुरुष त्वगिं
द्रियादिकांनीं परब्रम्हाचें ग्रहण करीत नाहींत, यास्तव योगाचा स्वीकार
करणें अवश्य आहे म्हणून योगस्वरूप सांगतात. गुरुनें सांगितले
त्या युक्तीनें रसापासून जिव्हा, गंधापासून नासिक, शब्दापासून श्र
वणेंद्रिय, स्पर्शापासून त्वगिंद्रिय, रूपापासून चक्षुरेंद्रिय, निवर्तन जो क
रतो तोच आपणास ब्रम्हरूपानें पाहातो. तें स्वरूप असें कीं, कर्ता, कर्म, क
रण, देश, काल, सुखदुःखानुकूल प्रवृत्ती, आरंभ, गमनादिक, राग
द्वेष, अदृष्ट, ईश्वर इत्यादिकांचा समुदाय जापासून होतो, त्यास ब्रम्ह
म्हणतात त्यासमुदायाचें कारण असें कीं, जें ईश्वररूपत्व पावून जी-
वत्व पावलें, जें यालोकांत सर्वठिकाणीं रहातें, जें सर्वांस कारण असून
आत्मस्वरूप करतें तेंच याशरिरांत जाऊन ज्ञानरूपानें राहतें. होय त्या
हूनजें भिन्न आहे तें कार्य त्याज्ञानानें, हीं पांच इंद्रियें प्रकाशित झालीं ह्म
णजे विषयांचा प्रकाश होतो. जसा वृक्षाग्री ठेवलेला दीप अनेक पदार्थास प्रका-

शित करतो तसें या शरीरांत पांच इंद्रियें त्या ज्ञानानें प्रकाशित झाल्यावर तीं इंद्रियें इतर विषयांचा प्रकाश करतात. तें ज्ञान कधींच नाश पावत नाहीं यास दृष्टांत अग्नीची ज्वाला, वायुचा वेग, सूर्याचें किरण, नद्यांचें उदक, हीं सर्व जशीं उत्पन्न व नष्ट होतात तशीं प्राण्यांचीं शरीरें नष्ट होतात, परंतु त्या शरिरांत बुध्दि व ज्ञान हीं उभयतां अदृश्य आहेत याविषयीं दृष्टांत सांगतो. जसा कोणी मनुष्य परशु घेऊन काष्ठांचा छेद करीत असतां त्या काष्ठांत धूम व अग्नी यांस पाहात नाहीं तसें शरीर, उदर, हस्त, पाद, यांचें छेदन केलें असतां ही बुध्दि व ज्ञान हीं दृष्टीस पडत नाहींत त्याच काष्ठांचें घर्षण केलें असतां धूम व अग्नी दृष्टीस पडतो तसें इंद्रियानीं युक्त जो व योगादि उपायानें बुध्दि व ज्ञानरूप आत्म्यास पाहतो. देहाचा नाश व उत्पत्ति इत्यादिकांनीं ज्ञानरूप आत्मा पीडित होत नाहीं. जसें हा जीव स्वप्नामध्यें आत्म्याहून पृथक् जें आपलें शरीर तें पृथ्वीवर पडलेलें पाहतो तसा मन व बुध्दि यानीं युक्त असून श्रोत्रादिक दशेंद्रियें पंचप्राणासहित जो आत्मा तो मरण समयीं आपल्या शरिरास आपल्याहून पृथक् पाहत असतांही तें न जाणून दुसरें शरीर धारण करतो आणि हा शरीरधारण करणारा आत्मा उत्पत्ति, वृध्दि, व्यय, मरण यानीं युक्त होत नाहीं; परंतु सुख व दुःख देणाऱ्या कर्माच्या संबंधानें कोणास दृष्टीन पडतां दुसऱ्या शरिरांत जातो. असें आत्म्यास देह ऐक्याच्या भ्रांतीमुळें संसार संगाहून वस्तुतः तो आत्मा निःसंग आहे असें सांगतो. कोणी नेत्रानें आत्म्याचें रूप पाहात नाहीं व त्याचा कोणताही स्पर्श जाणत नाहीं व तो आत्मा त्या त्या इंद्रियानीं कोणतेंही कार्य साधन करीत नाहीं व ज्यास इंद्रियें पाहात नसून तो मात्र इंद्रियास पाहतो असा तो आत्मा निःसंग असतांही बुध्दीच्या ऐक्य भ्रांतीनें त्यास संसार प्राप्त होतो. जसा लोखंडाचा गोळा अग्नि प्रदीप्त असतां त्याच्या तापानें रूपांतर पावतो तथापि वस्तुतः दुसरें रूप व गुण यांस धारण करीत नाहीं तसें ह्या आत्म्याचें चैतन्य रूप देहांत दिसतें; परंतु तो देह कांहीं चेतन नव्हे तथापि त्या लोखंडाच्या चतुष्कोणपणा अग्नीवर जसा भासतो. तसें देहगत दुःखादिक आत्म्याचे ठायीं भासतें. हा मनुष्य विद्यमान दे

हाचा पंचमहाभूतांत परित्याग करून जवळच्या लोकांस अदृश्य जें शरीर त्यांत शिरून त्यानें रूपधारण करतो तें असें कीं, सन्निध मृत्युप्राप्त-झालेला जीव, आकाश, वायु, अग्नि, उदक, पृथ्वी यांपासून उत्पन्न झालेल्या शरीरांत प्रवेश करून आपल्या कर्मांत विद्यमान जी श्रोत्रादिक इंद्रियें त्यांच्या गुणांचा आश्रय करतो त्यांत कोणतें इंद्रिय कोण त्या भूताच्या गुणाचा आश्रय करतें ही व्यवस्था सांगतो श्रोत्रेंद्रिय आकाश गुण जो शब्द त्याचा आश्रय करतें पृथ्वीचा गुण जो गंध. याचा घ्राणेंद्रिय, चक्षुरेंद्रिय तेजाचा गुण जो रूप याचा, रसनेंद्रिय जलाचा गुण जो रस याचा, त्वगिंद्रिय वायुचा गुण जो स्पर्श याचा आश्रय करितें. असे पंचेंद्रियांचे जे शब्दादिक विषय ते पंचमहाभूतांत राहतात-तीं भूतें पंचेंद्रियांत असतात, तीं इंद्रियें मनाच्या अनुरोधानें असतात, मन बुध्दीच्या अनुरोधानें बुध्दी स्वभावाच्या अनुरोधानें वागत्ये. याप्रमाणें हा आत्मा पुनः पुनः संसार पावतो आणि स्वकर्मार्जित नवीन देह प्राप्त झाला असतां इंद्रियादिक, पूर्वीच्या शुभाशुभ कर्मांच्या वासनेनें युक्त, जें मन याचा अनुरोध करतात. यास्तव पूर्वसंस्कारानें उत्तरोत्तर देही कर्में करतो यामुळें तो आत्मा मुक्त होत नाहीं. तस्मात् वासनाभ्रम परिहार करणारा तत्वज्ञानी पुरुष त्या मूलासहित भ्रमाला नाहींसें करण्यास कसा समर्थ होतो हें सांगतो. जसा नावेंतला-पुरुष नाव फिरूं लागली असतां तीराचे वृक्ष फिरतात असें जाणतो नंतर नौका स्थीर झाली म्हणजे त्यांचें जाणणें खोटें पडतें नसेंच सूक्ष्म पुस्तकाचें अक्षर उपनेत्राच्या बलानें मोठें दिसतें तेंच उपनेत्र काढलें असतां पुनः पूर्ववत् प्रमाणें अक्षर दिसतें व आपल्या मुखाचे-प्रतिबिंब आपल्यास पाहण्यास योग्य नसून दर्पणानें जसें तें दृष्टी पडतें तसें आत्मतत्व सूक्ष्म जरी आहे तथापि बुध्दियोगानें स्थूल प्रपंच-रूपानें दृष्टी पडतें. बुध्दीचा निरोध केला असतां तें स्थूलत्व व दृश्यत्व नाहींसें होऊन पूर्वी प्रमाणेंच होतें. यास्तव बुध्दीच्या निरोधानें भ्रम दूर करून आत्मज्ञान होण्याविषयीं यत्न करावा. अ० वि० या० अ० आ०

३० अध्याय तीस :— मनु बोलतो हे बृहस्पते, मन व इंद्रिय यानीं युक्त असा हा जीव बहुतकाल पूर्वी उपभोग केलेल्या विषयांचें कालांतरीं स्मरण करून म्हणतो मी बाल्यावस्थेंत अमुक विषयांचा अनुभव घेतला तेव्हां मनोरथकालीं विषय इंद्रियें यांचा संबंध नसल्यामुळें बुध्दीच विषयरूप झाली यास्तव बुध्दीहून निराळा जीव आहे. असें म्हणणें अवश्य आहे कदाचित् कोणी म्हणतील कीं बुध्दीनें,- विषय वासनेनें युक्त इंद्रियेंच त्या कालीं प्रकाशित होतात तर तसें म्हणतां येत नाहीं कारण इंद्रियें लीन झालीं असतां शब्दादिक विषयांचें ग्रहण होत नाहीं. तथापि स्वप्नकालीं त्या विषयांचा अनुभव होतो - याजवरून बुध्दीशीं ऐक्य प्राप्त झालेला सर्वोत्कृष्ट ज्ञानरूप आत्मा बुध्दिहून निराळा आहेच, तात्पर्य, जसें जागृत अवस्थेंत घट व नेत्र यामध्यें नेत्र हा पदार्थ घटाचा प्रकाशक आहे व घट हा प्रकाश्य आहे; परंतु सूर्य आपल्या सत्तेनें नेत्रास प्रकाशशक्ति देऊन घटाचा प्रकाश करतो तसा स्वप्नांत विषयाकारानें परिणाम पावलेली बुध्दि असून तिचा प्रकाशक आत्मा आहे असें सिध्द होतें. कारण कीं, स्वप्नावस्थेंत ही भूत व भविष्य वस्तूंचा समूह एककालींच संन्निध असल्या सारखा दिसतो त्या कालीं इंद्रियें आहेत म्हणावीं तर भूत पदार्थाचें ज्ञान होणार नाहीं. कारण त्यांचा व इंद्रियांचा संबंध नाहीं; तेव्हां सन्निध नसलेल्या पदार्थांच्या ज्ञानार्थ इंद्रियांची कल्पना करणे व्यर्थ आहे. रज्जु, उरग इत्यादि ठिकाणी अधिष्ठान ज्ञानार्थ जशी इंद्रियांची अपेक्षा असते तशी स्वप्नकालीं नाहीं. आत्मा किंवा बुध्दि हीं अधिष्ठानत्वानें संमत आहेत तीं इंद्रिय गोचर नाहींत तस्मात स्वप्नांत विषयाकारानें परिणाम पावलेली बुध्दीच तिच्याहून अन्य जो आत्मा त्यानें भासते. आणि तिच्या तीन अवस्था चंचल आहेत. अविशेषानें जागर अवस्थेंतही तीच विषयाकार असते. यास्तव दोन्ही ही अवस्थेंत त्या बुध्दीचा प्रकाशक एकच आत्मा संचार करीत आहे असें जाणावें. जसा काष्ठांतील अग्नीच काष्ठांचें दहन करतो, वायू काहीं दहन करीत-

नाहीं तर वायु अग्नीस प्रदीप्त मात्र करतो तसें इंद्रियस्थ बुध्दीच इंद्रिय जन्य विषय सुखाचा भोग करते. आत्मा केवल बुध्दीचा प्रकाश मात्र करतो. परंतु तिच्या विषय सुखादि कांस भोगीत नाहीं. त्या बुध्दीचीस्थानें त्रिगुणात्मक, जागरादि अवस्था रूप आहेत त्या अवस्थेंतील सुखदुःखादिगुण परस्पर विलक्षण आहेत असें आत्मा जाणतो; परंतु त्या सुखदुःखांचा उपभोग करीत नाहींतस्मात् सुखदुःखादिभोगत्व वसर्व कर्तृत्व बुध्दीलाच आहे. आत्मानिःसंग आहे म्हणून त्याचें ज्ञान इंद्रियानीं होत नाहीं जसा काष्ठास दाहक जो अग्नी तो काष्ठानीं दाहपावत नाहीं तसा श्रोत्रादि इंद्रियानींही आत्मा गोचर नाहीं; कारण तो आत्मा शब्द रहित आहे. कदाचित योगादि साहाय्यानें इंद्रियानीं आत्मस्वरूपाचें ज्ञान जरी झालें तरी तें ज्ञान शेवटीं नष्ट होतें व श्रोत्रादिक इंद्रियें आपापल्यास्वरूपासही पाहात नाहींत मग परमात्म्यास कसें पाहतील? तो परमात्मा सर्वज्ञ असल्यामुळें सर्वांस पाहातो. असें आत्मसाधक प्रमाण दाखवून बाधकाभावही सांगतात. जसा हिमालयाचा पार्श्वभाग व चंद्राचा पृष्ठभाग मनुष्यानीं पुर्वी पाहिला नाहीं म्हणून तो नाहींच असें नाहीं तसें ज्ञानस्वरूप सूक्ष्म आत्मा चक्षूनीं पूर्वी पाहिला नाहीं यामुळें तो नाहीं म्हणणें योग्य नव्हे. आत्माज्ञान विषय असूनही ज्ञान होत नाहीं. जसें हे जग चंद्राचें ठायीं चिन्हित असतां जाणत नाहीं तसा हा मनुष्य आत्मज्ञान जाणत नाहीं आतां जे पुरुष सूर्याचा उदयास्त पहात असून ते दूरत्व दोषानें प्रत्यक्ष जरीं सूर्याची गती दृष्टी न पडली तथापि देशांतर प्राप्ति मुळें बुध्दीनें त्याची गती पाहतात, याप्रमाणें दृश्यमान पदार्थ नाहीं व अदृश्य मान पदार्थ आहे याविषयीं विद्वज्जन सूर्याच्या गती प्रमाणें दुर्लक्ष्य जो आत्मा त्यास ज्ञानरूप दीपानें पूर्वी सांगितल्या प्रमाणें पाहातात. आणि प्रपंचात असून आत्म्याचे ठायींलय पावविण्याची इच्छा करतात हें उपायानेंच सिद्ध होतें. या विषयीं दृष्टांत- जसे मच्छ आहारी सूताच्या जाळ्यानें मच्छांस बंधन करून त्यांची मासीक रून घेतात तसें ज्ञानाच्यायोगें आत्म्यानें गृहण करितात. जसें इंद्रियें आपलें स्वरूप जाणण्यास शक्य होत नाहींत तसेंच येथेंही आहे. चर्म बुध्दि दृत्ति-

जशी घटास पाहात नाहीं तशी शुध्द ब्रम्हास ही पाहत नाहीं. तात्पर्य ब्रम्हास केवल बुध्दिवृत्तीच व्यास करते, परंतु बुध्दि वृत्तीचें जें फल तें ब्रम्हास व्यापित नाहीं. आतां बुध्दिवृत्तिरूप उपाधी चालय जरी झाला तरी ब्रम्ह आहे तें केवल शून्यासारखें नाहीं ही गोष्ट दृष्टांत पूर्वक सांगतो. जसा चंद्र अमावास्येचे दिवशीं सूर्याशीं संगत असून तो जसा दृष्टी पडत नाहीं म्हणून तो नाहीं असें नाहीं तसा हा आत्मा आहे. अमावास्येस स्थूल शरीर क्षीण झाल्यामुळें चंद्र जसा प्रकाशित होत नाहीं तसा बुध्दिवृत्ती पासून पलिकडे असणारा आत्मा भास होत नाहीं पुनः चंद्र अवकाश भेदानें जसा प्रकाशित होतो-तसा शरीरांतर प्राप्त झालें म्हणजे आत्मा प्रकाशित होतो. चंद्रमंडलाचा असा धर्म आहे कीं, कलेचाच क्षय व वृध्दि होत्ये. तसा या देहाचा क्षय व वृध्दि-प्रत्यक्ष होतात. आत्म्यास तें कांहीं नाहीं याविषयीं परमतानें युक्ति सांगतो. उत्पत्ती, वृध्दी, व्यय यांच्या योगानें शरीर जरीं भिन्न आहे तरीं तोच हा आत्मा असें ज्ञान होतें. अमावास्येस अदृश्य झालेला चंद्र पुनः उदय पावतो तेव्हां तोच हा चंद्र असें म्हणतात तसा हा आत्मा एकच आहे. देह व देही यांचा संबंध दिसत असून विचारानें पाहिलें असतां तो कधींच नाहीं. तें असें कीं, अंधःकार चंद्रास स्पर्श करताना किंवा सोडताना जसा दृष्टी पडत नाहीं तसा हा देह ज्ञानरूप आत्म्यास स्पर्श करण्यास किंवा सोडण्यास समर्थ नाहीं. असें असतांही देहावांचून आत्म्याचा प्रकाश नाहीं त्या वांचून देहाचा प्रकाश नाहीं याविषयीं दृष्टांत. जसा राहु अदृश्य असतांही दृश्य जे चंद्र सूर्य त्यांशीं युक्त झाला म्हणजे प्रकाशित होतो तसा आत्मा देहानें युक्त झाला असतां प्रकाशित होतो. शरीर नाश झाला असतांही आत्म्यास दुसरें शरीर प्राप्त होतें. जसा-अमावास्येस सूर्याशीं सहवास पावलेला चंद्र आम्हीं नक्षत्र युक्त असलेला जरी न पाहिला तथापि तो नक्षत्रानीं युक्तच आहे तसा एका शरीरापासून-मुक्त झालेला आत्मा कर्मफलभूत शरिरांतरानें युक्तच होतो यास्तव शरीर नाहीं म्हणून आत्मा नाहीं म्हणणें योग्य नव्हे. असा विषय या अध्यायांत आहे.

३१ अध्याय एकत्तीस :— मनु सांगतात हे बृहस्पते, जसें हें स्थू-

लशरीर शयन करतें व स्वप्नांत लिंगशरीर त्यास्थूलशरीरापासून वियोगपावून संचार करतें तसाहा संसारआहे तसेंच इंद्रिययुक्त लिंगशरीरही शयन करतें निद्रेंत केवल ज्ञान,लिंगशरीरापासून वियुक्त होऊन संचार करतें. तसाहा मोक्ष आहे. जसें उदक स्वछझालें असतां त्यांत चक्षुरिंद्रियानें रूपदिसतें तसें इंद्रियें प्रसन्नझालीं म्हणजे बुध्धीनें आत्मादिसतो म्हणजे युक्त होतो. तें ज्ञान इंद्रियें जिंकल्यानें होतें.तेंच उदक गढूळ झालें असतां रूपजसें दिसत नाहीं तसा इंद्रियें विषयानें व्याकूळ झालीं असतांज्ञानांत आत्मादिसत नाहीं. अज्ञानानें अविद्याप्राप्त होते ती अनित्य, अशुचि, दुःखरूप,देहादिकांचे ठायीं असून नित्यसुख, शुध्दत्व, आत्मबुध्दीस विपरीत स्वरूप जीचें अशी आहे. तिच्यायोगानें मनविषयाक्रांत होतें तेव्हां मनःप्रधान श्रोत्रादिक पांचइंद्रियें दुष्ट होतात. मोहानें पूर्णझालेला जीव अत्यंत विषयांत निमग्न होऊन तृप्त होत नाहीं तो जीवधर्माधर्मानीं जसायुक्त होईल तसा विषयापासून भोगार्थ पुनः उत्पन्न होतो. जोंपर्यंत पुरुषानें पाप आहे तोंपर्यंत तृष्णा त्याची जात नाहीं. जेव्हां पापनष्ट होतें तेव्हां त्याची विषयतृष्णा नाशपावते. अनादिकालविषयसंबंध असल्यामुळें मनानें सुखदुःखसाधनाचें विपरीत इच्छितो यामुळें जीव ब्रह्मस्वरूपास प्राप्तहोतनाहीं. पुरुषाच्या पापकर्माचा नाशझाल्यानंतर ज्ञानउत्पन्न होतें जसें स्वच्छ आरशांत आपल्या रूपास पाहतो तसा पुरुष बुध्दीचे ठायीं आत्मस्वरूपास पाहतो. हीं इंद्रियें विषयांत निमग्न झालीं म्हणजे हाजीव दुःखी होतो त्याच इंद्रियांचा निग्रह केला म्हणजे सुखी होतो. तस्मात् विषयांपासून इंद्रियांचा मनानेंच निग्रह करावा. कारण इंद्रियांहून मनश्रेष्ठ, त्याहून बुध्दि, बुध्दीहून ज्ञान, त्यापेक्षां आत्मा श्रेष्ठ होय यास्तव त्या सर्वांचा लय आपआपल्या कारणांत होतो. आतां यांच्या उत्पत्तीचाही प्रकार सांगतो. आत्म्यापासून ज्ञान, त्यापासून बुध्दि, तिच्यापासून मन तें मन जेव्हां श्रोत्रादिक इंद्रियांनीं युक्त होतें तेव्हां शब्दादिक विषयांस उत्तमत्वानें पाहतें. जो शब्दादिक विषयांचा व त्याविषयांस कारणभूत आकाशादिमय शरिराचा त्याग करून स्थूल सूक्ष्म कारण शरीराचा त्याग करतो तोच मोक्ष पावतो. जसा सूर्य उदय पावत असतां रश्मिमंडलास जसा तो उत्पन्न करतो व तोच अस्ताकाळा

ऊं लागला असतां तेंच रश्मिमंडळ आपल्यांत घेतो तसा अंतरात्मा इंद्रियर श्मीनीं देहांत प्रवेश करून त्या इंद्रियांच्या पांचगुणांचा स्वीकार करून स्वस्व रूपास जातो आतां आत्म्यास पुनः पुनः देह प्राप्त होण्याचें कारण मनुसांग तो. आत्मा कर्मानें प्राप्त झालेल्या शरिरांत शिरून कर्मानें सुखदुःखें भोगि तो कारण आत्मा प्रवृत्ति मार्गांतील पुण्य पापात्मक धर्म करतो यास्तव-सुखदुःखादिक भोगतो त्याच्या परिहारार्थ निवृत्त धर्म करावा. तो असा कीं, विषय भोग वर्ज केलेल्या पुरुषा पासून विषय निवृत्त होतात; परंतु वि षय वासना निवृत्त होत नाहीं तथापि तो जेव्हां परमात्म्यास पाहतो तेव्हां-त्याच्या विषय वासना निवृत्त होतात जाकाळीं विषय संगानीं हीन बुध्दिम नाचेठायीं प्राप्त होते तेव्हां तें मन ब्रम्हाचे ठायीं प्राप्त होऊन तेथेंच लीन होतें. तें ब्रम्ह असें आहे कीं; स्पर्शादिकानीं हीन असल्यामुळें स्पर्शनादिंद्रियां स आश्रय होत नाहीं. श्रोत्रेंद्रिय हीन असल्यामुळें श्रवण करीत नाहीं. जि व्हाशून्य असल्यामुळें रसाचें ग्रहण करीत नाहीं. घ्राणेंद्रिय नसल्यामुळें गं धाचें ग्रहण करीत नसून अनुमानानेंही जाणण्यास योग्य नाहीं अशाप रब्रम्हांत बुध्दिप्रवेश करते. मनानें संकल्पित सकल विषय मनांतच लीन होतात, मन बुध्दीचेठायीं लीन होतें बुध्दिज्ञानांत, ज्ञान आत्म्यांत लीन हो तें. इंद्रियें मनास, मन बुध्दीस, बुध्दी आत्म्यास जाणत नाहीं; परंतु आत्मा, सर्वांस पाहतो. तात्पर्य कार्य कारणास जाणत नाहीं परंतु कारण कार्यास जाणतें. असा विषय या अध्यायांत आहे.

३२ अध्याय बत्तीसः— मनु बोलतो हे बृहस्पते, शरीरास व्याधी, मनास शोक, प्राप्त झाला असतां योगाभ्यास होत नाहीं यास्तव त्या व्या धीचें व शोकाचें चिंतन न करितां त्यांचा परिहार करावा. दुःख प्राप्त झा लें असतां त्याचें चिंतन न करणें हें औषध होय. कारण जसें जसें त्याचें चिंतन करावें तसें तसें वारंवार तें वाढतच जातें यास्तव ज्ञान बलानें मा नस दुःख, औषधानीं शरीर दुःख नष्ट करावें हें विज्ञानाचें सामर्थ्य आहे. पं डित पुरुषानें यौवन, रूप, जीवित, द्रव्यसंचय, आरोग्य, प्रियपदा-र्थांचा सहवास हीं सर्व अनित्य आहेत असें मनांत जाणून त्याविष-

यांलोभ धरूनये व सकल देशास होणाऱ्या दुःखाचें एकस्थानें चिंतन न करि तां आपणा कडून होईल तर त्याचें निवारण करण्याविषयीं उद्योग करावा. जिवंत असतां सुखापेक्षां दुःखच फार आहे असें असून अज्ञानानें विषय लंपट झालेल्या जीवास मरण प्राप्त होतें. जे पुरुष दुःख व सुख याउभय- तांचा परित्याग करतात ते ब्रम्हस्वरूपास प्राप्त होऊन पुनः शोक पावत ना हींत. आणि अर्थच दुःखास कारण आहे व त्याचें पालन केलें असतांही दुः ख पावतात आणि तें प्राप्त होण्यासही दुःख फार व तें दुःख घडलें अस- तांही अर्थ कदाचित् प्राप्त होत नाहीं यास्तव त्याचें चिंतन कधींही करूं नये. असें दुःख निवृत्तीला कारण वैराग्य सांगून सुखप्राप्तीचें साधनरूप ब्र- म्हात्मज्ञान सांगतो. जेव्हां ज्ञान (ब्रम्ह), ज्ञेय (अहंकारादिघटापर्यंत), तद्रु प अविद्येच्या योगानें होतें; यास्तव मन हें ज्ञानाचा धर्म होय. जसें सुवर्णा चें कडें तसें तें मन ज्ञानेंद्रियानीं युक्त होतें. नंतर बुध्दी विषयाकार होत्ये. जेव्हां कर्मजन्य संस्कारासहित बुध्दी, मननरूपज्ञानवृत्तीच्या ठायीं प्रवृत्त होते तेव्हां आत्मरूपानें परिणाम पावत्ये त्या कालीं ब्रम्हज्ञान होतें. अशाज्ञान- वृत्तीच्या उदयास कारण यमनियमादिक जीं पूर्वांगें त्यासहित जो ध्यानरू प योग त्यानें उत्पन्न झालेला समाधि (ब्रम्हाकारवृत्ती विशेष) हा आहे. ती बु- ध्दी अज्ञानानें इंद्रियादिकानीं संयुक्त होते तेसमयीं रूपादिक विषयांच्याठा यींच असते. अज्ञाननाशकालीं ध्यान (ध्येयवस्तु) बुध्दि वृत्तीच्या ठायीं अ- भिव्यक्त होतें; तेव्हां ब्रम्हज्ञान होतें. यास दृष्टांत जसें सुवर्ण कसोटीवर रे- खांच्या उत्कर्षानें निःसंशयज्ञान होतें. सुवर्णाच्या दृष्टांतानें ब्रम्हज्ञान जर होतें तर तें जड आहे अशी शंका आली असतां ब्रम्ह तसें नाहीं; कारण अखंडाकार वृत्तिजें मन तें अखंडचैतन्य प्रकाशित होण्याच्या पूर्वींच अ खंड प्रकाशानें तिरोभूत झाल्यामुळें तें केवल इंद्रिय सन्निधविद्यमान जे शब्दादिक विषय याचेंच प्रकाशक होतें तें रूपादिहीन ब्रम्हाचें प्रकाश- होत नाहीं यामुळें ब्रम्हास जडत्व नाहीं. जेव्हां हा जीव सर्व इंद्रियांचें निवा- रण करून केवल मनाचे ठायीं संकल्प मात्रानें राहतो तेव्हां त्या संकल्पाचा ही बुध्दींत लय करून आत्माकार होऊन ब्रम्हरूप पावतो. याप्रमाणें सां-

गितलेल्या लयक्रमाचें युक्तीनें कथन करतो. जशीं पंचमहाभूतें शब्दादिक विष यांचा क्षयझाला असतां नष्टहोतात तशी बुध्दी अहंकारांत स्वकार्य भूत इंद्रियां चेंही ग्रहण करून लयपावत्ये. जे समयीं बुध्दि निश्चयात्मक धर्मानें युक्त अस तांही अहंकारांत संचार करिते तशीच मनाचे ठायीं प्राप्त होत्ये, तेव्हांती मनो- रूपच होत्ये. यास दृष्टांत असा कीं, आकारांतरानें युक्त असतांही कुंडल हें सु- वर्णांतच आहे. तशी बुध्दिमनांतच आहे. आणि जेव्हां ध्यानानें मन,सत्वो त्क- र्षरिव्य गुणानें युक्त होतें व रूपादिकानीं युक्त जे विषय त्यांसहीत मूलप्रकृती मत प्राप्त होतें तेव्हां सकल गुणात्मक त्याप्रकृती चाही त्यागकरून निर्गुण- होतें. त्या निर्गुण ब्रम्हाशीं तुल्य अन्य दृष्टांत करणेंच नाहीं कारण जेथें वाणी चा व्यापार नाहीं तेथें दृष्टांत करणें योग्य नाहीं. तेव्हां त्याच्या प्राप्ति विषयीं त- प, स्वधर्म, वेदांतश्रवण, शम, दमादि ह्या साधनानीं ब्रम्हसाक्षात्कार होतो. अ साज्ञानी झाला म्हणजे निष्प्रपंच मार्गास पावतो द्वैत पहात असतांही पाहात- नाहीं त्यास विषय शून्य बुध्दि झाली म्हणजे ब्रम्ह प्राप्ती होते जसा सुषुप्ती- चे ठायीं कार्याचा त्याग आणि कारणाज्ञानानें राहणे याप्रमाणें चवथी तुरी- य अवस्था इचे ठायीं कारणाचा त्याग आणि केवल ब्रम्हरूपानेंच राहतो. ब्र- म्ह मूल प्रकृतीहून पर आहे जे पुरुष अज्ञाना पासून निवृत्त झाले ते मोक्षा स पावतात व जे अज्ञानाचे ठायीं राहणारे ते कर्म फलाच्या इच्छेनें स्वर्गा- स पावतात जीव, प्रकृति, बुध्दि, विषय, इंद्रियें, अहंकार, अभिमान, हीं- नाश रूप आहेत असें जाणावें. भूतसमुदायाची उत्पत्ति प्रथम माये पासू न नंतर मिथ्या पासून होते. जशी घट, शराव, उदंचनादि यांस कारण मृत्ति का तशी ह्या सर्वसृष्टीस कारण माया अशा रीतीनें जाणून जो विरक्त झा लातो ज्ञानी होऊन कृतार्थ होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

३३ अध्याय तेहतीसः— मनुसांगतात हे बृहस्पते पंचज्ञानेंद्रियें, म न, बुध्दि, यांचा शब्दादि पंचविषयांपासून निग्रह केला म्हणजे ब्रम्हसाक्षा त्कार होतो. जसें सूत्रांत ओंविलेले सुवर्ण, प्रवाल, मृत्तिका, रुपें यांचेम णी सूत्राला सोडून नाहींत व सूत्रही त्या मण्यांस सोडून नाहीं तसा आत्मा गायी व अश्व, मानव, हत्ति, मृग, कीट पतंगादि यासर्वांचे ठायीं व्यापक आ

हे. जे मनुष्य पितृ, देव, गंधर्व इत्यादि लोकांच्या प्राप्तीसाठीं शरिरानें जें जें यज्ञादि कर्म करतात त्यांस तें तें फल प्राप्त होतें. तेव्हां फलास कारण कर्म- त्यास कारण ज्ञान (जीवस्वरूपमी) ज्ञानास कारण, कार्य कारणात्मा (मूल प्रकृति) ह्यासर्वांत राहणारें असून जें थोर तें ब्रम्ह. पृथिवी हून उदक थोरया प्रमाणें पंचमहाभूतांहून थोरमन, त्याहून बुध्दि, त्याहून काल, त्याहून थो- रविष्णु त्यास परब्रम्ह म्हणावें. ज्याचा अंतपार वेदांसही लागत नाहीं म्ह णून त्यास गुणातीत म्हणतात. त्या ब्रम्हाच्या आदि कोणी एक नाहीं म्ह- णून त्याची शम, दम, तितिक्षा, उपरति, श्रध्दा, समाधान इत्यादि साधना नें जे भक्ति करितात ते विष्णुपदास जातात यास्तव चित्तशुध्दि होण्यास का रण प्रथम कर्म, मग उपासना मग ज्ञान अशा प्रकारें निर्गुण ब्रम्हाची भ- क्ती झाली म्हणजे तो मनुष्य कृतार्थ होतो म्हणून मोक्षधर्म श्रवण के- ल्यानें कृतार्थता होईल असें जाणून जो करितो तो निर्गुण ब्रम्हास पाव तो. असा विषय या अध्यायांत आहे.

३४ अध्याय चवतीस:— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, श्रीकृ ष्णास अच्युत, विष्णु, नारायण, हृषीकेश, गोविंद, केशव म्हणतात तस्मा त् या नामांचा तत्वार्थ काय? तो सांगावा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या ना माचा अर्थ भार्गवराम, नारद, व्यास, असितदेवल, वाल्मीकि, मार्कंडेय हे कथन करीत असतांना मी प्रत्यक्ष ऐकिला तो सांगतों. पुरुष सूक्तांत जो वर्णि लातो केशव होय याने अवतार घेऊन केलेलीं कर्में मी कथन करितों ह्यापु रुषोत्तमानें पंचमहाभूतांस उत्पन्न केलें. आणि शेषास उत्पन्न करून त्या- जवर उदकांत शयन केलें म्हणून तो नारायण नाम पावला त्याचे नाभी- पासून कमल उत्पन्न झालें त्या कमलाचे ठायीं ब्रम्हदेव झाला त्याला ग्रासा वें म्हणून मधुनामा दैत्य उत्पन्न झाला त्याला मारून नारायणानीं ब्रम्ह- देवाचें रक्षण केलें म्हणून देव त्या कृष्णास मधुसूदन म्हणतात. नंतर- ब्रम्हदेवानीं मरीचि इत्यादि सहा ऋषी व आपले अंगुष्ठा पासून उत्पन्न के लेला सातवा दक्ष प्रजापति असे मानसिक सात पुत्र केले त्यांत मरीचि- पासून कश्यप झाला त्यास दक्षप्रजापतीनें आपल्या [illegible]

दश कन्या दिल्या व धर्मास दश कन्या दिल्या. नंतर त्यापासून धर्माचे पुत्र अष्टवसु, रुद्र इत्यादि झाले. दक्षप्रजापतीनें सत्तावीस कन्या चंद्रास दिल्या. अदिति कश्यपाची स्त्री, तिजपासून द्वादशादित्य देव झाले त्यांतील विष्णु जो त्यानेंच वामन अवतार घेऊन आतां तोच हा कृष्णावतार झाला आहे याचेच मुखापासून ब्राम्हण, तसेंच बाहुपासून क्षत्रिय, ऊरूपासून वैश्य व पायांपासून शूद्र व त्यानेंच अष्टौ लोकपालादि उत्पन्न केले. याप्रमाणें सर्व जग उत्पन्न यानेंच केलें. कृतयुगादि चार युगांत दरयुगीं अवतार हाच घेतो, त्यात्या युगांत धर्म व आयुष्यादिकांची मर्यादास्थापन देव, ब्राम्हण, गायी, आपले भक्त, यांचें रक्षण करितो तो हा मत्यक्ष पुंडरीकाक्ष कृष्ण आहे यास केवल वसुदेवाचा पुत्र म्हणून मानुष आहे असें मानूंनये हा साक्षात् परमात्माच जाणावा. असा विषय या अध्यायांत आहे.

३५ अध्याय पसतिसावा:– धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, प्रजापती मुख्यत्वें करून कोण कोण ते झाले, तसेंच ऋषी दिशांचे गायीं कोण ते झाले हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, पूर्वी ब्रम्हदेव, त्याचे पुत्र मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ हे सप्तऋषी पुराणांत विख्यात आहेत नंतर अत्रिवंशांत जो उत्पन्न झालेला प्राचीन बर्हि त्यास दशपुत्र झाले, त्या दशपुत्रांपासून दक्ष प्रजापति या नामें एक पुत्र झाला, त्याचीं दोन नामें दक्ष, व क, अशीं आहेत. मरीचि पुत्र व कश्यप त्याचीं दोन नामें अरिष्टनेमि, व कश्यप म्हणून आहेत व त्या अत्रिऋषीलाच पुत्र सोम व अर्यमा झाले त्या अर्यमास पुत्र बहुत झाले, त्यांत शशबिंदु या नामाचा पुत्र विख्यात झाला. त्याला दश सहस्र स्त्रिया होत्या, त्यांत एकेक स्त्रीस सहस्र सहस्र पुत्र झाले. त्या शशबिंदूच्याच वंशांत वृष्णिचा वंश झाला आहे. आतां देवांची उत्पत्ति सांगतो. भग, अंश आदिकरून दहा, अकरावा इंद्र, बारावा विष्णु हे द्वादशादित्य म्हणून कश्यपाचे पुत्र आहेत. नासत्य, दस्र हे दोन अश्विन देव सांगितले. त्वष्ट्यास विश्वरूप म्हणून एकच पुत्र होता, अष्टवसु पूर्वींच सांगितले आहेत. अज, एकपात् इत्यादि एकाद

शरुद्र सांगितले व विश्वेदेव, ऋभू व मरुत असे विख्यात देव आहेत. नंतर देवांत चार वर्ण आहेत ते सांगतो. अंगिरस म्हणून जे देव ते ब्राम्हण जाणावेत. आदित्य देवांस क्षत्रिय, मरुत देवांस वैश्य, अश्विन देवांस शूद्र म्हणतात. याप्रमाणें जो मनुष्य प्रातः काळीं उठून या देवांचें स्मरण करतो तो सर्व पापां पासून मुक्त होतो पुढें यवक्रीत, रैभ्य इत्यादि सप्त ऋषी पूर्व दिशेस, अगस्ति इत्यादि सप्त ब्रम्हर्षी दक्षिण दिशेस, एकत, द्वित, त्रित इत्यादि सप्तर्षी पश्चिम दिशेस, आत्रेय, वसिष्ठ, काश्यप, जमदग्नि इत्यादि सप्तर्षी उत्तर दिशेस राहतात. याप्रमाणें ज्याज्या दिशेस ऋषी आहेत त्या त्या दिशेच्या ऋषींस नमस्कार करणाऱ्या पुरुषांचीं पापें दूर होऊन त्यांस पुण्य प्राप्त होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

३६ अध्याय छत्तिसावा:— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, ह्या चकृष्णानें पूर्वी वराह रूप धरून महत् कर्म कोणच्या कारणानें केलें ही कथा सांगावी. भीष्म सांगतात हे धर्मराजा, मी पूर्वी मृगया करीत करीत मार्कंडेय ऋषीच्या आश्रमीं आलों तेथें बहुत ऋषि होते त्यानीं माझी मधुपर्कानें पूजा केली नंतर कुशल वर्तमान परस्पर विच्यारल्यावर मला कश्यप ऋषीनीं वराहावताराची कथा सांगितली ती तुला सांगतों. पूर्वी क्रोध, लोभ, बल इत्यादिकांनीं मत्त झालेले दानव व नरकासुर इत्यादि शतावधि दैत्यानीं पृथ्वीला व पृथ्वीवर राहणारे ब्राम्हण, गायी इत्यादि सर्वांस बहुत पीडा करून देवांसही पीडा केली. नंतर ते देव आपल्यास व पृथिवीलाही पीडा झालेली पाहून ब्रम्हलोकीं गेले. आणि त्यानीं ब्रम्हदेवास पृथ्वी सहित आपलें दुःख निवेदन केलें नंतर ब्रम्हदेवानीं त्यांस सांगीतलें कीं हे देवहो, याविषयीं मी योजना केलीच आहे. ते वर प्राप्त झाल्यानें मदोन्मत्त होऊन विष्णूचें सामर्थ्य जाणत नाहींत तरि विष्णु यज्ञात्मक वराह रूप धरून त्या सर्व दैत्यांचा नाश करील. असें ऐकतांच देवांस हर्ष झाला. नंतर विष्णूनीं वराहरूपी अवतार घेऊन जेथें ते दैत्य राहत होते त्या अंतर भूमींत प्रवेश केला तों ते सर्व दैत्य वराह रूप पाहतांच आपल्यांत बोलतात कीं, कायहो हें मानुष नसून कोणता हा प्राणी आहे असें बोलून त्या वराह रूपी भगवंतांवर मोठ्या बलाच्यावे

गानें येऊन पडले आणि त्या वराहास धरून न्यावा अशी परस्पर मसलतक रून त्यास आकर्षण करूं लागले. परंतु तो वराह त्या स्थानापासून थोडाही चलन पावला नाहीं. नंतर त्या सहस्रावधि दैत्यांच्या मनांत संशय आलातों देवाधिदेव वराहरूपी भगवान् यानीं आपले योगसामर्थ्यानें मोठा शब्द केला. त्या शब्दानें ते सर्व दैत्य नाश पावले. तसेच ब्रम्हदेव व महादेव मोहित झाले. नंतर भय पावलेले देव ब्रम्हदेवास म्हणतात कीं, हे ब्रम्हदेवा, कोणते कार णानें हा भयंकर शब्द झाला कारण आह्मांस मूर्च्छा आली आणि सर्व जगही मूर्च्छित झालें यास्तव सांगावें. असें ऐकून ब्रम्हदेव सांगतात हे देवहो, ज्या दैत्यांनीं पीडा केली होती त्यांस मारण्या करितां हा शब्द वराहरूपी भगवंतानीं केला आहे आतां तुम्ही ऋषीं सहवर्तमान वराहरूपी भगवंताची स्तुती करावी, नंतर महर्षीनीं वेदमंत्रानीं भगवंताची स्तुती केली. तो हा भगवान कृष्ण यानेंच वराहरूपी अवतार घेतला म्हणून या कृष्णास जगदीश्वर म्हणतात. असा विषय या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतीस :— धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, मोक्षप्राप्त होण्याविषयीं जो योग आहे तो कोणते प्रकारचा आहे? भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं गुरु व शिष्य यांचा संवाद झालेला आहे तो सांगतों. आपण मुक्त व्हावें अशी इच्छा करणारा आणि परम बुद्धिमान असून समस्त अंतर्यामीं विषय वासना ज्या आहेत त्यांपासून मुक्त झालेला असा एक शिष्य कोणी एके समयीं तेजोराशी, जितेंद्रिय, ब्रम्हवेत्ता, आचार्यादि लक्षणानीं युक्त ब्राम्हणास पाहून त्यास शरण गेला. नंतर कांहीं दिवस त्यानें त्याची सेवा केली तेव्हां गुरु प्रसन्न झाला नंतर गुरूस नमस्कार करून शिष्य म्हणतो हे गुरो, मी कोण? झालों कोठून? आपण कोठून झालां, हें जग कसें झालें? परब्रम्ह आहे तें कोणतें आणि वेदाचे ठायीं ब्राम्हणानें बृहस्पति सव म्हणून यज्ञविशेष आहे तो करावा. राजानें राजसूय यज्ञ करावा, या प्रमाणें च्यार वर्णांची धर्म व्यवस्था इत्यादि प्रकार जे सांगितले आहेत ते कोणाच्या कारणाचे हें सर्व यथार्थ सांगावें. असा प्रश्न ऐकून गुरु सांगतात हे शिष्य, अध्यात्म शास्त्र हें सर्व विद्येंत श्रेष्ठ आहे आणि तें वेदगोप्य आहे हें तूं चांगले रीतीनें वैराग्य धारण

केलेला आहेस यास्तव सांगतों. प्रणव, सत्यज्ञान, यज्ञ इत्यादि सर्व जे धर्म आहेत तो हा वासुदेव शाश्वत परब्रम्हरूपी आहे असें जाण. म्हणजे ज्याचे ठायीं सर्व भूतें वास करतात तो वासुदेव म्हणजे केवल निर्गुण ब्रम्हस्वरूपच असें वेदार्थ जाणणारे म्हणतात तोच सगुण अवतार धारण करितो म्हणून वसुदेवाचा पुत्र असें म्हणतात परंतु अनेक ब्रम्हांडें ज्याचा उदरांत राहतात, ज्याचे ठायीं त्रैलोक्य चक्रासारखें परिभ्रमण पावते. पितर, देव, ऋषि, यक्ष, राक्षस, नागादिकांस तशींच वेदशास्त्रें, लोकधर्मादि सर्वांस उत्पन्न करतो, बृहस्पति वेदांग जाणतो, भार्गवानें नीतिशास्त्र जगाच्या हितार्थ केलें, ऋषींनीं तार्किक, वैशेषिक, पातंजलादि न्यायशास्त्रें केलीं. त्यांत जें ब्रम्ह सांगितलें आहे त्याची उपासना करावी. परब्रम्ह थोर केवढें आहे याचा अंत देव व ऋषींस ही लागला नाहीं; परंतु एक नारायण त्या ब्रम्हास जाणतो नंतर नारायणापासून ऋषी, देव, दैत्य, राजर्षि हे जाणतात. तात्पर्य ब्रम्हाचा मोठेपणा कळत नाहीं. जसा कोणी एक मनुष्य समुद्रस्नानास गेला होता तो समुद्रस्नान करून आपले ग्रामीं आला नंतर ग्रामचे लोकानीं त्यास विचारिलें तूं समुद्रस्नान करून आलास त्यास समुद्राची लांबी व रुंदी व खोली किती आहे? नंतर तो म्हणतो आपण जें विचारलें तो प्रकार मला कांहींच कळत नाहीं परंतु समुद्र कसा आहे हा प्रत्यक्ष मी पाहिला तसा ब्रम्हाचा अनुभव आहे. ब्रम्हाचा अंत व पार नारायणावांचून इतर कोणा एकास ही नाहीं तस्मात् यावरून ब्रम्हसाक्षात्कार आहे तो कसा, जागृतावस्थेंत मी आहें हा अनुभव तुला आहे तसा स्वप्नांतही मी आहें हा अनुभव सांगतोस आतां सुषुप्तिंतला अनुभव नाहीं म्हणतोस परंतु जागें झाल्यावर सांगतोस कीं, आज मला गाढ निद्रा लागली परम सुख पावलों तेव्हां सुषुप्तिचा अनुभव आहे यावरून ब्रम्ह अवस्थात्रयातीत आहे तूंही अवस्थात्रयातीत ब्रम्हस्वरूप आहेस याविषयीं भ्रांती दूर होते कशी. जशी रज्जुवर सर्पभ्रांति होते परंतु हस्तानें रज्जु घेऊन पाहिली असतां निःसंशय सर्पभ्रांति दूर होते तशी परमात्मज्ञानाविषयीं निःसंशय बुध्दि झाली म्हणजे हा कृतार्थ होतो आणि याच्या देहांतून ज्ञानाचा प्रकाश बाहेर पडतो जसा छिद्रें पाडलेल्या घटांत दीप ठेविला म्हणजे त्या दीपाचा प्रकाश

घरातून बाहेर पडलेला दिसतो तसा यादेहास नऊछिद्रें आहेत त्यांतून प्र- काश बाहेर पडतो. आतासांख्य शास्त्रांत तत्वविचार सांगितला आहे तो- तुलासांगतों. पूर्वी एक परब्रम्ह, त्यापासून मूल प्रकृति याचक्रमानें महत्तत्व रूप बुध्दि, अहंकार, पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, पंचविषय, सो ळावें मन याप्रमाणें चोवीस तत्वें देवरूपी आहेत अशीं तूं जाणावीस याच तत्वानीं सर्वजग व्यापिलें आहे तस्मात् ह्यातत्वांचा उत्पन्न कर्ताजो ब्रम्ह स्वरूप तो वृष्णिकुलांत उत्पन्न झालेला त्यास वासुदेव म्हणतात अशी क थागुरूनें शिष्यास सांगितली. असाविषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय अडतिसावा:— भीष्मसांगतात हे धर्मराजा, वृक्षपाषा णादिक आणि मनुष्य पश्वादिक भूतें च्यार प्रकारचीं आहेत यांची उत्प- त्तिवनाश अदृश्य कारणापासून होतो जसा बीजांत वृक्षआहे परंतु दृश्य नाहीं तोच वृक्षउत्पन्न झाला असतां दृश्य होतो तसामनुष्य जन्मास आला म्हणजे दृश्य होतो. आतांदेह धारण केलेल्या पुरुषास पूर्वसंस्कार कारण कर्मापासून झालेलें अर्थ व काम, कर्म वासनादिभाव प्राप्त होतात, जसें लो ह अचेतन असतांही लोहचुंबकास पाहून सन्मुख जातें तसें ब्रम्हसत्तेनें ज गाचें चलन वलनादिक होतें जसासूर्योदय झाला असतां लोक आपापले उ- द्योगास प्रवृत्त होतो हीसूर्याचीच सत्ता आहे तसें ब्रम्हसत्तेनें जगउत्पन्न होतें म्हणून याजगास कारण ब्रम्ह आहे तें याजगांत व्यापक असून लिप्तहोतनाहीं यांस दृष्टांत जसा अग्नी चुलीवर ठेविलेल्या पात्रांतील तंडुलादिकांस पक्क क- रितो आणि आपण वेगळा असतो त्याप्रमाणें ब्रम्हाची व्यापकता सांगून हें जग आज्ञानानें मोहपावतें, प्राणी जन्मास आला म्हणजे आज्ञानानें व्याप्त होतो पुढें अभिमानानें कार्याकार्य व्यवस्थान पाहिल्यामुळें संसारांत अध- र्मादिकांचें आचरण करितो, त्यायोगानें उत्तम व नीच योनींत जन्मास पा वतो. तात्पर्य जन्म व मरण हीं त्या प्राण्यास वारंवार होत आहेत. यास्तव ज शीं बीजें दग्ध झालेलीं उत्पन्न होत नाहींत तशीं हाप्राणी जो कर्में करतो तीं ज्ञानानें दग्ध केलीं म्हणजे पुनर्जन्मास कारण होत नाहींत. असाविषय या अध्यायांत आहे.

३९ अध्याय एकुण चाळीस:— भीष्म सांगतात हे धर्मराजा, कर्मनिष्ठ पुरुषानीं संसारांत प्रवर्तक असून धर्म केलेला स्वर्गप्राप्त होण्यास जसा त्यांस सफल होतो तसा मोक्षनिष्ठ पुरुषास मोक्षधर्माहून अन्य धर्म कांहींच रुचत नाहीं तस्मात् मोक्षधर्माची इच्छा करणारे पुरुष दुर्लभ आहेत आणि त्यांसच महा बुद्धिमंत असें म्हणावें कारण ज्ञानानें ते उत्तम गतीस पावतात. लोहयुक्त सुवर्ण ताऊन न काढल्यामुळें जसें शोभत नाहीं तसें रजोगुणी व तमोगुणी पुरुषाचीं चित्तें मलिन असल्यामुळें त्यांस ज्ञान प्राप्त होत नाहीं. जसा सन्याशी मार्गी देह निर्वाह करतो तसा हा संसारमार्गी राहणारा गृहस्थाश्रमी यानें वेदांतश्रवणासाठीं देहनिर्वाहार्थ अन्न अल्प भक्षण करावें. कारण सत्व, रज, तम हे गुण या पुरुषास मोह करतात त्या गुण दोषानीं पुरुष संसारांत निमग्न होतो. असें ऐकून धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, मुमुक्षु पुरुषानीं मनानें कोणते दोष टाकिले व त्या दोषांपेकीं त्यांस पुनः प्राप्त होतात ते कोणते, त्या दोषांचा बलाबल विचार ज्ञानी कसा करतो आणि दोषांतून मुक्त कसा होतो हें मला सांगा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, दोषास कारण जें अज्ञान त्या अज्ञानाचा पुरुषानीं च्छेद करावा आणि रजोगुण व तमोगुण यांचा त्याग करून सत्वगुणाचें सेवन करावें मग सत्वगुणाच्या सेवनानें शुध्द धर्म प्राप्त होतो त्या धर्मानें पुरुष देहधारी असून मळरहित होतो आणि त्यास सात्विक भक्तीनें ज्ञान उत्पन्न होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

४० अध्याय चाळीस:— भीष्म सांगतात हे धर्मराजा, मनुष्यास रजोगुण व तमोगुण यांपासून मोह होतो त्यापासून क्रोध, लोभ, भय, दर्प हे होतात, त्या योगानें ते परमात्म्या विष्णूस विसरून त्याच्या मायेनें ज्ञान नष्ट होऊन सुखदुःख कर्मारंभानें जन्म व मरण प्रवाहरूप संसारांत निमग्न होतात मग ते स्त्रियांशीं स्नेह केल्यानें शोकास पावून गर्भवासांतील दुःखें भोगितात मग जन्मास आले म्हणजे बाल अवस्थेंत खेळण्यांत दिवस घालवितात, तरुण अवस्थेंत विषयांध होतात, वृध्द अवस्थेंत माझें गृह, माझी स्त्री, माझी वृत्ति, मी गेलों म्हणजे कसें होईल

या प्रकारच्या चिंतेनें व्याकुळ होतात यासाठीं विषयापासून इंद्रियांचा निरोध करावा. मगतींच इंद्रियें वासना रहित होतात आणि त्या योगानें मनुष्यांस पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

४१ अध्याय एकेचाळिसावा :— भीष्म सांगतात हे धर्मराजा, आतां पुरुष, तत्वज्ञानानें मोक्षास कसे पावतात हें सांगतों. सर्वभूतांत मनुष्यश्रेष्ठ त्यांत द्विज, त्यांत मंत्रवेत्ते, त्यांत सर्वज्ञ आणि सर्वज्ञांत वेदशास्त्रांचा अर्थ जाणून तत्वार्थ जाणणारे ब्रम्हवेत्ते श्रेष्ठ आहेत. जसा नेत्रानीं हीनपुरुष मार्गांत दुःख पावतो तसा ज्ञान हीन पुरुष लोकांत दुःख पावतो. यासाठीं वाणी, देह, मन, यांची शुध्दी, क्षमा, सत्य, धृति, स्मृति, हे गुण सर्वधर्मांतश्रेष्ठ आहेत असें धर्माचरण केलें म्हणजे त्यास ब्रम्हचर्य म्हणावें. उत्तम वृत्तिनें पुरुष मोक्षास पावतो. कांहीं मध्यम वृत्तीनें ब्रम्हलोकास जातो, अधम वृत्तिनें ब्राम्हण जन्म पावतो, ब्रम्हचर्याचरण करणाऱ्यानें — स्त्रियांची कथा ऐकूं नये, नग्नस्त्रियांस पाहूं नये, पाहिल्यास विषय प्रीति उत्पन्न झाली तर कृच्छ्रव्रत करावें, स्वप्नावस्था झाली तर स्नान करून तीन वेळां अघमर्षण करावें. याप्रमाणें वागणारास देह बंध प्राप्त होत नाहीं. मनुष्यांचे वात, पित्त, कफादिकांनीं युक्त देह अन्नरसानीं नाडी तृप्तझाल्या असतां पुष्टहोतात. देहांत दशनाडी आहेत त्या पंच इंद्रियांचे विषय ग्रहणाविषयीं कुशल असल्यानें अन्नरसार्पण द्वारा देह वृध्दिकरितात. अन्यसूक्ष्मनाडी मनुष्याच्या देहांत सहस्रावधि आहेत त्यांत मनोवहानाडीजी आहेती स्वप्नांत पुरुषाला प्रत्यक्ष स्त्रीसंगनसतांही संकल्प मात्रानें प्रीतिउत्पन्न होऊन रेतस्खलन करविते, यास्तव रेत उत्पन्न होण्यास कारणें अन्नरस, मनोवहानाडी, संकल्प, हीं तीन आहेत. यासाठीं ज्ञानी पुरुष जे आहेत ते मनास वासना उत्पन्न होण्यास कारण जे रजोगुण व तमोगुण यांचा त्याग करून शम दमादि साधनभूत सत्वगुणाच्या स्वीकारानें गुण बंधन दोषांतून निघून मोक्षास पावतात. असाविषय या अध्यायांत आहे.

४२ अध्याय बेचाळिसावा :— भीष्मसांगतात हे धर्मराजा, दुः

ख देणाऱ्या विषयांचे ठायीं प्रीति ठेविणारे मनुष्य यासंसारांत दुःख व पावतात प्रीति न करणारे पुरुष जे आहेत ते आत्मज्ञानानें उत्तम गती स जातात. जन्म, मृत्यु, जरा, दुःखादि व्याधींच्या योगानें हा लोक निरंतर बुडालेला आहे. यासाठीं बुध्दिमान् पुरुषानें मोक्षाविषयीं यत्न अवश्य करावा. वाणी, मन, शरीर हीं सर्वकाल शुचि ठेवावीत आणि अहंकार टाकावा. कोणतीही वासना न धरितां भूतांवर कृपादृष्टीनें पाहवें त्या सच ज्ञानवान् आणि सुखी असें लोक म्हणतात यास्तव अहिंसा, सत्य भाषण, सर्वभूतांशीं आर्जव, क्षमा, प्रमाद न करणें, यापुण्य कर्मांनीं पुरुष सुखी होतो तस्मात सर्वभूतांत परमात्मा आहे. असा निश्चय बुध्दीनें करून मन सर्वांभूतीं ठेविलें म्हणजे भेद बुध्दि दूर होते व त्यानें दुःखही निवारण होतें आतां पुरुषानें सत्यवाणी बोलावी, कठोरभाषण करूं नये, क्रूरस्वभाव धरूं नये, दुसऱ्याचें छिद्र दुसऱ्यास सांगूं नये, मितभाषण करावें, बुध्दीच्या निश्चयानें मनोनिग्रह करावा, कारण रजोगुणानें युक्त होऊन कर्में केलीं म्हणजे तो संसारांत दुःख पावून नरकास जातो. यासाठीं मनुष्यानीं धैर्यानें रजोगुण व तमोगुणात्मक कर्में टाकिलीं म्हणजे त्यांचें कल्याण होतें. यास्तव निःसंशय, निरीच्छ, सर्वपरिग्रहापासून मुक्त, एकांतस्थलीं राहणारा, मितभोजन करणारा, तपस्वी, इंद्रियनिग्रह करणारा ज्ञानी परब्रम्हास पावतो. पुरुषानें निःसंशय बुध्दीच्यायोगानें मन वश करून घेतलें असतां त्यावर देव अनुग्रह करतात. मग तो पुरुष ब्रम्हभावा कारणें योग्य होतो याप्रकारानें सात्विक कर्में करणारा पुरुष जन्म व मृत्यूस जिंकून परब्रम्हास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

४३ अध्याय त्रेचाळिसावा:— भीष्म सांगतात हे धर्मराजा, निष्काम ब्रम्हचर्य आचरण करणाऱ्या पुरुषानें निद्रा त्याग करावी म्हणजे त्यास स्वप्नदोष घडत नाहींत, ज्ञानाभ्यासासाठीं जागरण रात्रंदिवस करावें म्हणजे ब्रम्ह नित्य कसें आहे व माया अनित्य कशी आहे- हा विचार त्यास होतो याविषयीं साक्षात् योगेश्वर हरि व महर्षी, देव

र्णन करितात कीं, इंद्रियांचा निग्रह करण्याविषयीं पुरुषास पूर्वी विषा-सारखें दुःख वाटतें पश्चात् तींच इंद्रियें आपल्या स्वाधीन झालीं म्हणजे अमृता सारखें सुख होतें यास्तव कामासक्त पुरुषांस असंख्यात संसार प्राप्त होत आहेत यासाठीं सात्विकधर्मानें इंद्रियें प्रसन्न करून घ्यावींत-म्हणजे योग प्राप्त होतो. तात्पर्य सर्वभूतांत व्यापकता मनाची होऊन एकाग्रता झाली म्हणजे त्यापुरुषांस जें कांहीं ऐश्वर्य पाहिजे तें संकल्प केल्या-नें प्राप्त होतें. असें ज्ञानी आत्म प्रसादानें सूर्यासारखें मन निर्मल करून प्रकाश रूपब्रम्हास जाणून तेउत्तम गतीस पावतात यास्तव ब्रम्ह प्राप्ती-चीइच्छा करणाऱ्या पुरुषानीं इंद्रियांचाजय करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

४४ अध्याय चवेचाळीस :— भीष्म सांगतात हे धर्मराजा, ब्रम्ह-प्राप्तीविषयीं साधनें पूर्वीं सांगीतलीं आहेत आतां नारायणानीं ज्ञानप्राप्तिविषयीं जे चार प्रकार सांगितले त्यांस जो पुरुष जाणत नाहीं तो परब्रम्हास ही जाणत नाहीं. साक्षात् वेदानें मृत्यु, मोक्ष, संसार प्रवृत्तकधर्म, हे तीन सांगून चतुर्थशाश्वत ब्रम्ह सांगीतलें त्यांत ब्रम्हदेवानीं प्रवृत्ति लक्षणधर्म सांगीतला, त्याधर्मानें पुरुषास पुनर्जन्म होतो व मोक्षधर्माच्या सेवनानें तत्व जाणून तो उत्तम गतीस पावतो. ऋषीनीं, स्वप्न, सुषुप्ति, सगुणमूर्ति, निर्गुण ब्रम्ह हे चारप्रकार सांगीतले आहेत. आतां मूल प्रकृति, पुरुष, जीव, ईश्वर हे चार प्रकार नारायणानीं सांगितलेले जाणलेअसतां पुरुष परब्रम्हास जाणतो. जसापुरुष अंगावरील तीनवस्त्रांचा-त्याग करून पृथक् राहतो, तसा हा जीवात्मा, सत्वादि तीनगुणानीं युक्त असून त्यांचा त्याग करून पृथक् राहतो तस्मात् स्थूल, सूक्ष्म, कारण यातीन देहांपासून जो पृथक् राहतो तोपरमात्मा जाणावा. योगि पुरुषांस मुक्तिदोन प्रकारच्या आहेत त्यांत स्थूल, सूक्ष्म, कारण यातीन देहांचा निरास करून राहणारा योगी जीवन्मुक्त होतो परंतु प्रारब्ध कर्मआहे तों पर्यंत त्याचा देहपात होत नाहीं यास सद्योमुक्ति असें शास्त्रज्ञम्हणतात. आणि देहाचीं मुखादि द्वारें बंद करून ब्रम्हरंध्रांतून प्राणनि-

धून गेल्यानंतर तोयोगी सूर्यादि लोकांस जाऊन मग ब्रम्हलोकास जातो पुढें तेथून मुक्त होतो यास क्रममुक्तिम्हणतात. ज्यानां पुरुषानीं विपरीत बुध्दिधरिली असतां त्यांस मोक्ष वार्ताही मास होतनाहीं. कारण वासनेनें-बध्दझालेलें जग चक्रासारखें जन्म व मरण, यांत फिरत आहे यास्तवविवेकी पुरुषानीं वासना टाकून केवल तत्वज्ञानाची उपासना केली असतां. ते पुरुष निःसंशय विष्णुलोकास जातात. अशी कथानारायणानीं पुरुषांचे कल्याणार्थ सांगितली आहे. असाविषय या अध्यायांत आहे.

४५ अध्याय पंचेचाळिसावा :- धर्मराज प्रश्न करतात हे भीष्मा, कोणच्या वर्तणुकीनें सर्वभोग टाकून जनकराजा मोक्षास गेला? भीष्म-सांगतात हे धर्मराजा, जनदेव या नामेंराजा जनकाचे वंशांतील होता, तोनिर्गुणि धर्माचरण चिंतना विषयीं युक्त होता त्याचे गृहीं शत ब्राम्हण आचार्य पृथक्धर्मसांगणारे होते त्यांत कोणी पाखंडी देहनाश झाला असतां. आत्मनाश होतो असें बोलणारे व कोणी आत्म्याचा नाश नाहीं, कर्ता, भोक्ता, विभु, आत्मा आहे. अशारीतीनें बोलणारे होते त्यांचीं भाषणें ऐकून-राजाचे मनास संतोष वाटला नाहीं. इतक्यांत त्यास्थानीं कपिलमहामुनी सारिखा पंचशिख यानामें विख्यात ऋषि आला तो पूर्वी ऋषीचा शिष्य असून विष्णुप्रसन्न होणारें पंचरात्रागमशास्त्र, पंचउपनिषदें, अन्न-मयादि पंचकोश, शांत, दांतादि पंचगुण, इत्यादिकानीं युक्त आणि कपि-ला यानामें ब्राम्हणाची स्त्री होती तिचापुत्र म्हणून यास कापिलेय म्हणतात त्यास राजानें पाहून सत्कार केला. तोंतेथें शत ब्राम्हण होते त्यांचा आणि या पंचशिख ऋषींचा संवाद झाला. त्यांत ब्रम्हास प्रतिपादि दाखविणारे हेतु हा पंचशिख बोलूं लागला तेव्हां ते शत ब्राम्हण मोह पावून स्तब्ध-बसले हें पाहून जनदेवराज शत आचार्यांस टाकून त्याऋषीस शरणगेला. नंतर राजाची निष्ठा पाहून त्या कापिलेय ऋषीनें राजास मोक्षधर्म-सांगण्यास आरंभ केला. ऋषिम्हणतो हे राजा, पुरुषानीं वारंवार जन्मग्रहण करणें हें मिथ्या असून दुःखरूप आहे कारण मृत्यु, वयोहानि, -रोगइत्यादि दुःखें जन्मघेणाऱ्यास होतात. यास्तव मोक्षमार्गाचा त्यानीं

यत्न करावा. आतां यागादि कर्मे केल्यानें पुरुषास ब्रम्हलोकादि सर्व लोक प्राप्त होतात; परंतु त्या लोकांचाही नाश आहे तेव्हां यज्ञ यागादि कर्म निष्काम न केलें तरि दोषरूप आहे याविषयीं बृहस्पतीचें वाक्य आहे कीं, अग्निहोत्र, वेदत्रयीं सांगितलेला धर्म, त्रिदंडी सन्यास, भस्मधारण, ह्यांवर जीविका करणारे पुरुष, बुध्दि व पराक्रम हीन जाणावे. यास्तव पुरुषानीं निष्काम कर्म करावें. आतां या देहांत चैतन्य आहे तें देहांत असून निराळें आहे. जसें लोहचुंबकानें लोहचलन होतें तसें चैतन्यानें इंद्रियसमुदायाचें चलनवलनादिक होतें याजवरून देहधर्मांचा आणि चैतन्याचा संबंध नाहीं म्हणून परमेश्वर कर्ता असून अकर्ता आहे असें पुरुषानीं जाणावें. अविद्या, संस्कार, नाम, रूप, वेदना, जाति, जरा, मरण, शोक, विलाप, दुःख इत्यादि दोषानीं प्राणी जन्मास आला म्हणजे दुःख पावलो यासाठीं लौकिक धर्म न पाहतां मोक्ष धर्माचा आश्रय सर्वांनीं करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

४६ अध्याय शेचाळिसावा:— भीष्मसांगतात हे धर्मराजा, पुनः जनदेवराजा पंचशिख ऋषीस प्रश्न करतो हे ऋषे, आपण संसार व मोक्षयांचीं लक्षणें सांगितलीं त्यांत स्वर्गांतील सुख विनाशरूप आहे. व मोक्षसुख जशी सुषुप्ति व मूर्च्छा आली असतां अत्यंत विस्मृती होत्ये तसें आहे यास्तव यागादिक कर्में केलेलीं निष्फल होतात. यावरून कर्मादिकांचा सर्व उच्छेद होतो यासाठीं खरें तत्त्व सांगावें. असें ऐकून पंचशिख ऋषी म्हणतो हे राजा, तूं भ्रांतीनें व्याकुल झाला आहेस; कारण भगवंताच्या मायेनें जीवांच्या स्वस्वरूपानंदाचें आच्छादन करून विषयसुखास अधिकत्व दाखविलें आहे. यामुळें जीवांस अनर्थ प्राप्त होतो त्या अनर्थाचा उपशम होण्याविषयीं शास्त्रांत भक्तियोग सांगितला आहे त्यानें भगवान् प्रसन्न होतो मग भगवत्प्रसादानें माया दूर होत्ये. नंतर जसा कंठांत सुवर्णाचा हार कंठगत असतांही विस्मरण झाल्यानें पुरुष व्याकुळ होतो तोच हार प्राप्त झाल्यानें पुरुष आनंदास पावतो तसा जीवांस स्वस्वरूपानंदानें विस्मरण झाल्यानें ज-

न्म मरणादि दुःखानर्थ प्राप्त होतात तोच स्वस्वरूपानंदन प्राप्त झाल्यानेंजीव कृत कृत्य होतात यास्तव त्या विषयीं नियमादि साधनानीं जो यत्न केला त्यास निष्फल मानूं नये. भूतांत आकाशादिपंच महाभूतें स्वभावानेंच राहतात आणि त्यानेंच वियोगास पावतात. या शरीरांत जीं छिद्रें अवकाशरूप आहेत. त्यांस आकाश म्हणावें शरीरांतील प्राणांस वायु जाणावा तसा उष्मा जो आहे त्यास अग्नि, जें लोहितादिस्नेहासारखें आहे त्यास उदक,कठिण अस्थ्यादिक आहेत त्यांस पृथ्वि म्हणावी.या प्रमाणें जी वांच्या इंद्रियादिकांची उत्पत्ति तत्वापासून स्वभावानेंच होत आहे असें सर्वांनीं जाणावें.जशी शिंपूल्याचे ठिकाणीं रौप्य भ्रांति मिथ्यारूप भासते तशी अहंकार, देह, इंद्रियादिकांस आपले ठाई अभेदानें पाहून मी कांणा आहें मी गोरा आहें अशा रीतीनें मिथ्या भ्रांति भासते यामुळें प्राणी दुःखांस अधिकारी होतो जो पुरुष ज्ञान योगानें मी परमात्म स्वरूप आहें असें जाणून बोलतो तो मुक्त होतो. यास्तव द्रव्य,भोग,सुख इत्यादिकांचा त्याग केला असतां पुरुष स्वानंदास पावून मुक्त होतो. यास्तव यास त्यागशास्त्र असें योगी बोलतात. नंतर पंचशिखऋषीनें राजास मनासहित एकादशेंद्रियांचीं व सत्वादि तीन गुणांचीं लक्षणें सांगून ऋषी म्हणतो हे राजा, परत्मा शाश्वत असतां तो उच्छेदवान् कसा होईल यास्तव तूं पूर्वी आत्मोच्छेदाविषयींची शंका केलीस ही व्यर्थ निराधार आहे आतां जो पुरुष हा मोक्ष निश्चयाचा संवाद श्रवण अथवा पठण करितो तो उपद्रवादि सर्व संकटांपासून मुक्त होऊन वैकुंठ लोकास जातो. असा विषय या अध्यायांत आहे.

४७. अध्याय सत्तेचाळिसावा:— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, या लोकांत पुरुष कोणतें कर्म केल्यानें सुख पावतो व कोणतें केल्यानें दुःख पावतो तसेंच कोणत्या कर्मानें सिद्ध होतो हें सांगावें.असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, वेदार्थ जाणणाऱ्या पुरुषानीं सर्ववर्णांस व त्यांत ब्राम्हणास विशेषें करून दमाची प्रशंसा केली आहे. दम म्हणजे इंद्रिय निग्रह, तो केला असतां पुरुष सर्व ठिकाणीं सुख पावतो इंद्रिय निग्रह न करणारे पुरुष व्याघ्रादिकांसारखे भूतांस पीडा करितात यास्तव ब्रम्हदेवानीं राजा उत्पन्न

केला या साठीं सर्व आश्रमीं याणीं दम सेवन करावा. त्या दमाचीं लक्षणें सांगतों. अदीनत्व, संतोष, श्रद्धा, अक्रोध, आर्जव, अतिवाद न करणें, अभिमान त्याग, गुरु पूजा, अनुसूया, भूतदया, दुसऱ्याचें छिद्र अन्यास न सांगणें, जनवाद, मिथ्या वाद, स्तुति, निंदा यांचें विवर्जन, मोक्ष धर्माची इच्छा, सुख दुःखादि प्राप्त झालें असतां हर्ष व खेद न करणें, वैर न करणें, कपट वर्जन, प्रसन्न चित्त, निंदा व प्रशंसा केली असतां समभाव, चांगली वर्तणुक, शील संपन्न, धैर्यवान्, कामादि दोष जिंकणे, आत्मज्ञानाविषयीं यत्नवान् त्या लक्षणांचें सेवन करणारा पुरुष त्या लोकीं सत्कार पावून सुख भोगतो आणि देहपात झाल्यावर स्वर्गास जातो. सर्व भूतांस नमस्कार करणारा पुरुष जितेंद्रिय होतो तस्मात् कामक्रोधादिकांस जिंकून पूर्वोक्त लक्षणानीं युक्त असा ब्राम्हण मोठ्याही व्यसनापासून मुक्त होऊन आत्मज्ञानी होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

४८. अध्याय अठ्ठेचाळिसावा:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, यज्ञदीक्षा ग्रहण करणाऱ्या तीन वर्णांनीं देवताशेष मांस व मद्यादि भक्षण केलें असतां तें त्यांस युक्त किंवा अयुक्त होतें? तपस्वी ब्राम्हण उपवास रूप तपास तप म्हणतात त्यास हेंच तप किंवा अन्य तप आहे व भोजन करणारा ब्रम्हचारी सदोपवासी कसा होतो हें सांगावें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, केवल वेदोक्त व्रत गृहण न करितां जे मांसादि भक्षण करितात ते पतित होतात आणि जे यज्ञादि दीक्षा गृहण करून मांसादि भक्षण करितात त्यांस स्वर्ग व पशु पुत्रादिक प्राप्त होतात; परंतु ते पुण्यक्षीण झाल्यावर पुनर्जन्मास येतात आणि आत्मविद्या घात केल्याचें पाप त्यांस प्राप्त होतें आतां तपस्वी ब्राम्हण मासोपवास व पक्षोपवास रूप तप करावें म्हणून सांगतात; परंतु त्यानें आत्मविद्येचा उपघात होतो यास्तव सत्पुरुष त्या तपास मान्य करीत नाहींत तेव्हां आत्मविद्योपकारक तप केलेलें सत्पुरुषास मान्य होतें या साठीं सन्याशी गृहस्थाश्रमी याणीं आत्मविद्यासंपादन केली असतां त्यानीं उत्तम तप केलें असें सत्पुरुष म्हणतात. आतां सायंप्रातर भोजन करणारा व ऋतुचे ठायीं स्त्रीगमन करणारा, सत्यवादी, वृथा मांस भक्षण न करणारा ज्ञानाभ्यासी,

दान करणारा, दिवसानिद्रात्याग, भृत्य व अतिथी इत्यादिकांस भोजन घालू न आपण भोजन करणारा, पंचमहायज्ञादि धर्म करणारा यांस ब्रम्हचारी आणि सदोपवासी म्हणावें ते त्या लोकीं पुत्र व पौत्रादि संततीनें युक्त होऊन पुढें स्वर्गलोकीं अप्सरादि भोग प्राप्त झाल्यानें आनंद पावतात. असा विषय या अध्यायांत आहे.

४९. अध्याय एकूणपन्नासावा:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा,-पुरुषानें पुण्यकर्म व पापकर्म केलें तर तें पुरुषास फल देणारें होतें तेव्हां त्या कर्मांचा कर्ता हा पुरुष होतो किंवा नाहीं हें सांगावें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं प्रल्हादाचा व इंद्राचा संवाद झालेला सांगतों. कोणी एके समयीं अनंत गुणानीं युक्त प्रल्हादास पाहून एकांतस्थलीं इंद्र प्रश्न करितो हे प्रल्हाद, तूं व्यसनें करून युक्त असतांही शोक करीत नाहींस यास्तव कोणत्या धैर्यानें स्वस्थरूप राहतोस हें सांगावें. असें ऐकून प्रल्हाद सांगतात हे इंद्र, भूतांची संसारांत प्रवृत्ति व निवृत्ति करणारी मूल प्रकृति असतां तीस जो पुरुष जाणत नाहीं तो कर्तृत्व व भोक्तृत्वाचा अभिमानी होतो. जो ज्ञानी पुरुष तो प्रकृतीनें केलेल्या कर्मांचा कर्ता मी म्हणून अभिमान करीत नाहीं तेव्हां शोक व मोहादि त्यास होत नाहींत आतां जो पुरुष उत्तम अथवा असाधु कर्म करणारा आत्म्यास मानतो त्याचें ज्ञान दोषरूप जाणावें तेव्हां तत्त्व जाणणारा पुरुष तो नव्हेच असा माझे बुद्धीचा निश्चय आहे जर पुरुष कर्ता होईल तर त्याच्या आरंभ केलेल्या कर्मांचा पराभव कधींच होणार नाहीं यास्तव प्रयत्न न करणाऱ्या पुरुषांसही स्वभावानेंच द्रव्यलाभ होतो आतां पुरुषास जें ज्ञान होतें तेंही स्वभावानेंच होतें तस्मात् सर्व स्वभावानें होतें असा निश्चय माझा आहे म्हणून मला शोक नाहीं व ब्रम्हलोकापासून पातालपर्यंत सर्व नाशरूप आहे असें मीं जाणतों याकारणानें माझा अहंकार व ममतादि सर्व दूर झालें. असें ऐकून इंद्र प्रश्न करितो. हे प्रल्हाद, ज्या उपायानें शांतिरूप ज्ञान प्राप्त होतें तो उपाय मला सांगावा. प्रल्हाद सांगतात हे इंद्र, सर्व भूतांचीं आर्जव, अप्रमाद, चित्त प्रसाद, वृद्धसुश्रूषा या गुणानीं युक्त पुरुषास स्वभावानेंच ज्ञान प्राप्त होतें असें ऐकून इंद्रानें प्रल्हा-

दाची पूजा केली आणि त्यास विचारून इंद्र आपले लोकीं गेला. असा विष-
य या अध्यायांत आहे.

५०. अध्याय पन्नासावा :— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, क्लीपतका
लानें ग्रस्त झालेला राजा बुद्धीनें लक्ष्मीपासून भ्रष्ट होऊन लोकांत कसा
राहतो हें सांगावें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं इंद्राचा व विरो-
चनाचा पुत्र बली यांचा संवाद सांगतों कोणी एके समयीं इंद्रानें सर्व दैत्यांस
जिंकिलें आणि बलीस जिंकण्याचें सामर्थ्य इंद्राजवळ राहिलें नाहीं तेव्हां
तो इंद्र ब्रह्मलोकीं गेला आणि ब्रह्मदेवास नमस्कार करून म्हणतो हे ब्रह्म
देवा, बलीसह वर्तमान मी युद्ध करण्यास जाणार नाहीं कारण लोकपाला
सारिखें सामर्थ्य त्यास दिसतें यास्तव बलीला इतकें सामर्थ्य येऊन तोरा-
हलो कुठे हें मला कांहींच कळत नाहीं यास्तव त्यास कोणते स्थानीं पा
हवा. व मी पाहिला असतां त्याचा वध करावा किंवा न करावा. हें सांगावें. ब्र-
ह्मदेव सांगतात हे इंद्र, तूं बलीस मारीलें असतांही त्याचा वध होणार ना
हीं यास्तव मारूं नये त्यास न्यायानें विचारावें स म्हणजे तुझ्याशीं तो बोलेल
आतां तो बली उष्ट्र, वृषभ, गर्दभ, अश्व, अथवा शून्य मंदिर, इतस्थांचे ठा
यीं तूं पाहा म्हणजे सांपडेल. नंतर ब्रम्हदेवाचें वाक्य ऐकून पृथ्वीवर इं-
द्रानें बलीचा शोध केला. तो एके ठिकाणीं शून्य मंदिरांत खरवेषानें बसले
ला पाहून इंद्र म्हणतो हे बले, तुला पूर्वीं ऐश्वर्य प्राप्त झालें होतें तेव्हांस
हस्त्रावधि वाहनें, ज्ञाती, पृथ्वी नागरल्यावांचून धान्य पिकविणारी, सर्वां
वर तुझी आज्ञा चालत होती, सहस्त्र देवांगना तुझ्यापुढें नृत्य करीत हो-
त्या, साहा सहस्त्र गंधर्व नृत्य व गायन करीत होते, तुझे यज्ञांत सुवर्णाचीं
पात्रें व स्तंभ होते, तूं लक्षावधि गायी दान केल्यास, आशा प्रकारचीं अ-
नेक ऐश्वर्यें तुला प्राप्त होऊन आतां गर्दभाच्या अधमयोनीस पावून क-
सारे शोक करीत नाहींस? तिस्मात् तूं शत्रूस वश झाला आहेस. असें इंद्राचें
वाक्य ऐकून बली म्हणतो हे इंद्र, छत्रें व रत्नादिक ऐश्वर्यें माझीं गुप्त आहेत.
ज्यावेळेस सुदिन काल येईल त्यावेळेस तूंच पाहाशील ज्यांचीं प्रज्ञा ब्रह्मा
चे ठायीं आणि ज्ञानानें जे तृप्त झाले ते साधू दुःखादिक प्राप्त झालीं असतां

हर्षशोकादिक पावत नाहींत. तूं प्राकृत पुरुषा सारिखा विपरीत बोलतोस तूं मला ऐश्वर्यवान् जेवेळीं पाहाशील तेवेळीं आतां बोलतोस असें बोलणार नाहींस. असा विषय या अध्यायांत आहे.

५१. अध्याय एकावन्नावा:- इंद्र म्हणतो हे बले, तूं सर्व लोकांत प्रतापवान् होऊन आतां ज्ञाती व मित्रहीन झाला असतांही कसा शोक करीत नाहींस, असें ऐकून बली क्रोधानें म्हणतो हे इंद्र, कालपर्यायधर्मानें मी शोक करीत नाहीं कारण मनुष्यादि सर्वांचे देह नाशिवंत आहेत असें जाणून मी बुद्धिलाभानें अर्थसिद्धि, अनर्थ, जीवित, मरण, सुखदुःखतकीं प्राप्त झालीं असतां हर्ष व शोक करीत नाहीं. आतां गर्दभरूप मी घेतलें म्हणून माझी निंदा तूं करितोस; परंतु मला त्रैलोक्याचें ऐश्वर्य प्राप्त झालें तेव्हां तुमचीच अवस्था कशी होती हा विचार करून तूं आपले बुद्धीस ब्रम्हनिष्ठा धरावीस, जर काल अनुकूल असता तर मी एक्या मुष्टीनें वज्रसहित तुला आज मारून इंद्रपद घेतलें असतें; परंतु तो काल हा नव्हे या करितां मी हा शांतिचा काल आहे असें जाणून बसलों आहें अशा प्रकारचा बहुत विचार सांगून बली म्हणतो हे इंद्र, तुझे सारिखे इंद्र सहस्त्रावधि मागें गेले व पुढेंही होणार या करितां सर्वांत श्रेष्ठ आणि ब्रम्हदेवादि सर्व देवांवर ज्याची सत्ता असा देव स्वप्रकाशरूप आहे त्याची प्राप्ती करून घेण्याविषयीं तूं शांत व्हावेंस आणि मजविषयीं खेद मनांत आणूं नयेस. असा विषय या अध्यायांत आहे.

५२. अध्याय बावन्नावा:- भीष्म सांगतात हे धर्मराजा, या प्रमाणें दोघे भाषण करीत असतां बलीच्या देहांतून उत्तम स्वरूप व कांतीनें देदीप्यमान अशी साक्षात् लक्ष्मी मूर्तिमंत निघाली तिला पाहून इंद्र म्हणतो हे बले, स्वप्रकाशानें शोभायमान आणि अलंकारानीं युक्त स्त्री तुझ्या देहांतून निघाली ही कोण आहे हें मला सांग. बली म्हणतो हे इंद्र, या स्त्रीस मी जाणत नाहीं यास्तव तूंच तिला विचारावेंस नंतर इंद्र म्हणतो हे स्त्रिये तूं कोण आहेस व तुझें नाम काय हें सांगावें. असें ऐकून स्त्री बोलते हे इंद्र, मला बली व तूं ही जाणत नाहींस माझीं नामें भूति, लक्ष्मी, श्री, इतकीं आहेत.

इंद्र म्हणतो हे लक्ष्मी, तूं बलीचा त्याग कोणत्या अर्थास्तव केलास देव मनुष्या दिकांत एक पुरुषही तुला सहन करण्याविषयीं समर्थ नाहीं अशी तूं असतां माझा त्याग कां केला नाहींस हें सांगावेंस. लक्ष्मी बोलत्ये हे इंद्र, या बलीनें ब्राह्मणांची निंदा केली व उच्छिष्ट असतां हविजें घृत यास स्पर्श केला आणि लोकांचा अपकार फार केला यामुळें या बलीचा त्याग करून मी तुझ्रे जवळ राहिलें आहें तूं आतां चार ठिकाणीं माझी स्थापना केली असतां मी त्या स्थानीं राहीन असें ऐकून इंद्रानें भूमी, जल, अग्नि, विद्वान् यांचे ठायीं एक एक पाद या क्रमानें चार विभाग करून लक्ष्मीस सांगितलें कीं, तूं पूर्वोक्त चार ठिकाणीं राहावेंस असें ऐकून लक्ष्मी बोलत्ये हे इंद्र, त्वां सांगितल्याप्रमाणें एकएक पाद ठेवितें असें इंद्रास सांगून चार ठिकाणीं लक्ष्मीनें चार पाद स्थापन केले आणि बलीस टाकून ती निघून गेली नंतर बली इंद्रास म्हणतो हे इंद्र, ब्रम्हदेवाच्या मध्यान्हाच्या भासीचे समयीं पुनः देव व दैत्यांचें युद्ध होईल त्या समयीं युद्धांत तुला जिंकून इंद्र मी होईन हें ऐकून इंद्र क्रोधानें म्हणतो हे बले, ब्रम्हदेवाची आज्ञा तुला न मारण्याची आहे यास्तव मी वज्र तुजवर सोडीत नाहीं तूं यथेच्छ गमन करावेंस. भीष्म सांगतात हे धर्मराजा, असें इंद्राचें भाषण ऐकून बली दक्षिण दिशेस व इंद्र उत्तर दिशेस निघोन गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

५३. अध्याय त्रेपन्नावा :- भीष्म सांगतात हे धर्मराजा, पूर्वी इंद्राचा आणि नमुचिनामे दैत्याचा संवाद झाला तो तुला सांगतों. कोणी एके समयीं शत्रूच्या स्वाधीन राहिलेल्या नमुचीस इंद्र म्हणतो हे नमुचे, तूं लक्ष्मीहीन झालेला असतां शोक करावास तो कां करीत नाहींस ? असें ऐकून नमुची म्हणतो हे इंद्र, शोक केल्यानें संताप होतो त्यापासून आयुष्य, धर्म, लक्ष्मी, इतक्यांचा नाश होतो यास्तव जो देव जगाचा शास्ता तो एक आहे त्यास योगी परमात्मा म्हणतात. त्याची भक्ती मनुष्यानीं केली असतां त्याचे प्रसादानें त्यांची मोहनिवृत्ति होते आणि संकट जरी प्राप्त झालें तरी ते निर्भय राहतात कारण त्यानीं धर्माचें तत्व खरेपणानें जाणून सुखदुःखादि व्यसनांचा त्याग केला या कारणानें ते पुरुष शोक करीत नाहींत जे कांहीं

पुरुषास मिळावयाचें तितकें मिळतें व नष्ट व्हावयाचें तितकें नष्ट होतें या प्रकारानीं सर्वज्ञ जो झाला तो पुरुष मोह पावत नाहीं तसा आतां आपत्काल जरी आहे तथापि हे इंद्र, मी शोक करीत नाहीं. असा कि या अध्यायांत आहे.

५४. अध्याय चोपन्नावा:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, व्यसनांत निमग्न झालेला पुरुष तसाच बंधु व राज्यनाश झालेला राजा हे कोणत्या उपायानें सुख पावतात हें सांगावें असें ऐकून भीष्म सांगतात. हे धर्मराजा, व्यसनांत निमग्न झालेला पुरुष धैर्यानें तरून जातो तस्मात् धैर्य धरावें त्या योगें सात्विकी बुद्धि होते त्या योगानें त्यास लक्ष्मी प्राप्त होते याविषयीं बली व इंद्र, यांचा संवाद सांगतों. पूर्वी देव व दैत्य यांचें युद्ध झालें त्यांत दैत्यांचा नाश होऊन देव सुखी झाले नंतर कोणी एके समयीं इंद्र ऐरावतावर बसून त्रैलोक्यांत गमन करीत असतां समुद्रांत पर्वतावर बसलेल्या बलीस पाहून म्हणतो हे बले, तूं शत्रूस वश होऊन स्थानापासून भ्रष्ट झालास तथापि व्यथा पावत नाहींस आणि आम्हीं रत्नादि सर्व ऐश्वर्य तुझें हरण करून घेतलें तरी तूं शोक करीत नाहींस अशा प्रकारचीं अन्य कठोर भाषणें ऐकून बली ह्मणतो हे इंद्रा, पूर्वी आम्हीं तुला जिंकिला ते समयीं तुझें सामर्थ्य कोठें गेलें होतें आतां एकवेळ तूं आम्हांस जिंकिलेंस म्हणून आश्चर्य न व्हे. यास्तव कठोर भाषणानें मला व्यथा करितोस हें तुला योग्य नव्हे. हे इंद्र, या पृथ्वीवर राजे बहुत झाले त्यांची संख्या करण्याविषयीं कोणीही समर्थ नाहीं परंतु त्यांत झालेले कांहीं एक राजे तुला सांगतों. पृथु, ऐल, मयासुर, भीम, नरकासुर, शंबर, प्रल्हाद, नमुचि, दक्ष, विरोचन, बाणासुर, हिरण्यकशिपु, कैटभ, इत्यादिक राजे कालानें नष्ट झालेले पृथिवीचा त्याग करून गेले तेव्हां सर्वांहून काल बलवान् आहे आतां शंभर यज्ञ तूंच केलेस असें नाहीं तर बहुत राजानीं शंभर यज्ञ करून यजन केलें आहे आणि पराक्रमी, शूर, सन्मुख युद्ध करणारे, असे बहुत आहेत तेव्हां हे इंद्र, तूं गर्व टाकून शांत हो. असें ऐकून इंद्र म्हणतो हे बले, तुझी बुद्धि निश्चयात्मक आहे कारण तूं धैर्यानें व्यथा पावत नाहींस. प्राण्यांस पुरातन जो धर्म सांगितला तो सर्वांस सारिखा आहे. हें मी आज करीन दुसरें उद्यीक करीन हें बोलणें कालापुढें कोणा-

चेंही शालत नाहीं. आतां तूं स्फरवी हो असें बोलून ऋषिनीं स्तुती केलेला इंद्र स्वर्गी गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

५५. अध्याय पंचावन्नावा.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, उसन्न होणारा व नाश पावणारा जो पुरुष त्याच्या पूर्वजन्मार्जित संस्कारानें अमुक यास होणार हें कोणत्या योगानें कोणास समजतें हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, मन मनुष्याच्या पूर्व रूपाचें कथन करतें याविषयीं लक्ष्मीचा व इंद्राचा संवाद सांगतों. कोणी एके दिवशीं नारदऋषि, इंद्र, हे दोघे भागीरथींत स्नान करून जप करीत बसले आणि उदयास पावलेल्या सूर्य मंडलास पाहून उभेराहिले आणि उपस्थान करून कांहीं पूर्वींच्या गोष्टी दोघे बोलत बसले आहेत. इतक्यांत विष्णूच्या विमानांत बसून आलेल्या लक्ष्मीस या दोघानीं पाहिलें नंतर विमानांतून लक्ष्मी उतरली तिची पूजा करून इंद्र बोलतो हे सुंदरे, तूं कोण आहेस व कोणते कार्यास्तव येथें आलीस हें सांग. असें ऐकून लक्ष्मी बोलल्ये हे इंद्रा, मी लक्ष्मी आहें. आणि श्री, भूति, श्रद्धा, मेधा, सन्नति, विजिति इत्यादिक माझ्या विभूती आहेत. माझ्या प्राप्तीविषयीं राजे बहुत यत्न करितात परंतु त्या दैत्यांकडेस मी वास करीत नाहीं तुझे जवळ वास करावा असें मी इच्छिल्यें हें ऐकून इंद्र म्हणतो हे लक्ष्मी, दैत्य व दानव यांस तूं कोणते कारणानें टाकून माझे जवळ आलीस हें सांग. असें ऐकून लक्ष्मी बोलल्ये हे इंद्रा, पूर्वीं दैत्य दानव आपल्या स्वधर्मानें आचारादिक करीत होते आतां त्याणीं गुरुशुश्रूषा, सत्यभाषण, पितृ व देव, अतिथि, ब्राम्हण यांची पूजा, इत्यादिक धर्मांचा त्याग केला आणि स्त्रियानीं पुरुषवेष धरावे व पुरुषांनीं स्त्रियांचे वेष धरावे इत्यादिक बहुत अधर्म करणाऱ्या त्या दैत्य व दानवास पाहून हे इंद्रा तुझे जवळ राहावयास मी आल्यें असें त्या लक्ष्मीचें भाषण ऐकून इंद्र व नारद, या उभयतांस मोठा आनंद झाला. नंतर लक्ष्मी सहित इंद्र आपल्या अमरावती नगरीस येऊन आनंद पावला. तसेंच देवनगारे आपले आपणाच वाजूं लागले, महर्षी, तेथें येऊन इंद्रास जय निरंतर असो म्हणून बोलूं लागले नंतर नारदानें इंद्राचा मनोगत लक्ष्मीस सांगि[illegible]र्गांत अमृत दृष्टि झाली. लक्ष्मी इंद्र लोकीं

आल्यावर सर्व समृद्धि इंद्रास प्राप्त झाली. आतां हें आख्यान पठणश्रवण करणारे जे मनुष्य होतील त्यांस लक्ष्मी प्राप्त होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

५६. अध्याय छपन्नावा:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, पुरुष कोणते स्वभावानें आचार, विद्या, पराक्रम, यांतील कोणत्या कर्मानें मोक्षास पावतो? असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, मोक्ष प्राप्त होण्यासजे धर्म सांगितले आहेत त्यांचे ठायीं नियमानें राहणारा पुरुष, ब्रम्ह स्वरूपास पावतो या विषयीं जैगीषव्य ऋषीचा आणि देवल ऋषीचा संवाद झाला आहे तो तुला मी सांगतों. देवल प्रश्न करितो हे जैगीषव्यऋषे, तुला कोणी नमस्कार केला असतां तूं हर्ष पावत नाहींस व तुझी निंदा केली तरी कोप पावत नाहींस अशी निर्मळ बुद्धि तुझी कोणते कारणा वरून झाली हें सांगावें. असें ऐकून जैगीषव्य सांगतो हे देवल, कोणी निंदा व स्तुती केली तरी ज्ञानी पुरुष हर्ष व खेद करीत नाहींत तसेंच ताडन अथवा पूजन इत्यादिकांस समान मानणारा पुरुष सर्व दोषां पासून मुक्त होऊन त्या लोकीं सुख पावतो आणि तो जितेंद्रिय झाल्यानेंच ब्रह्म स्वरूपास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

५७. अध्याय सत्तावन्नावा:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, सर्व लोकांस प्रीय असून सर्व प्राणी ज्यास चांगलें म्हणतात तसाच सर्व गुणांनीं संपन्न असा पृथ्वीवर कोण पुरुष आहे? असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं उग्रसेनाचा आणि श्री कृष्णाचा संवाद झाला तो तुला सांगतों. उग्रसेन प्रश्न करितो हे कृष्णा, सर्व लोक कीर्तनांत नारदाचें स्मरण करितात आणि तो सर्व गुणानीं युक्त आहे असें मी मानितों तेव्हां त्याचें कारण सांगा. असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे उग्रसेना, ज्या नारदास तूं मान्य करितोस, त्या नारदा सारिखा पृथ्वी वर दुसरा कोणी नाहीं असा जो नारद त्याचे गुण तुला मी सांगतों. ज्यास अहंकार, क्रोध, चपल भाव, भय, हे नाहींत आणि दीर्घ सूत्री नव्हे, शूर, उपासना करण्यास योग्य, वेदांत शास्त्राचें विधि युक्त तत्व जाणणारा, क्षमाशील, जितेंद्रिय, सरळ, सत्य-

बोलणारा, तेज व यश आणि ज्ञान जन्म, तप, इत्यादिकानीं वृद्ध, सुशील, शुचि, सुवास्य, सर्वांचें कल्याण करणारा, वेदश्रुतीच्या आख्यानांचे अर्थ सांगणारा, कोणी ही अवज्ञा न केलेला, सहनशील, मना सारिखा बोलणारा, बहुश्रुत, नित्य समाधि सुखांत असणारा, इत्यादिक बहुत गुणांनीं युक्त नारद आहे म्हणून त्याची सर्वत्र ठिकाणीं जन पूजा करितात. हे उग्रसेना, असा जो सर्वज्ञ आणि प्रिय जाणणारा नारद त्याचें प्रिय कोण पुरुष न करील! यास्तव तो सर्वत्र पूज्य आहे. भीष्म सांगतात हे धर्मराजा, असें भगवंताचें भाषण ऐकून उग्रसेनास हर्ष झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

५८. अध्याय अठ्ठावन्नावा.- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, संपूर्ण जीवांच्या संसारास आदिकारण आणि ज्याचे ठायीं जीव लय पावतात असा कोण आहे व त्याचें ध्यानादिक व युगायुगाचे ठायीं मनुष्यांचें आयुष्य, आकाशादिक महाभूतांची उत्पत्ति कोणापासून झाली इत्यादिक पूर्वी भृगु व भरद्वाजऋषी या उभयतांच्या संवादें करून सांगितलेंत. परंतु संक्षेपानें सांगितलेंत यास्तव पुनः सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं वेदव्यासाचा आणि त्यांचाच पुत्र श्रीशुक यांचा संवाद तुला मीं सांगतों. श्रीशुकानीं संपूर्ण वेदांचें तसेंच अंग उपनिषदांचें अध्ययन करून व भूत समूदायाचा कर्त्ता कोण आणि ब्राम्हणानें कर्म कोणतें करावें, नैष्ठिक कर्म व धर्म कोणते आहेत हा प्रश्न व्यासास केला. तेव्हां व्यास सांगतात हे शुका, सृष्टीच्या पुर्वींच सदोदित असणारें आदि व अंत ज्याचा लागत नाहीं व तर्क ही कोणता चालत नाहीं असें जें नित्य, निर्गुण तें ब्रम्ह सर्वांस आदिकारण स्वसत्तात्मक आहे. आतां कालाचें ज्ञान सांगतों. अठरा निमेष म्हणजे एक काष्ठा, तीस काष्ठा म्हणजे एक कला, तीस कला म्हणजे एक मुहूर्त, तीस मुहूर्त म्हणजे अहोरात्र एक दिवस तीस दिवस अहोरात्र म्हणजे एक मास, बारा मास म्हणजे एक वर्ष, सहा मास म्हणजे उत्तरायण, तसेंच दक्षिणायन होतें आतां मनुष्यांचा एक मास म्हणजे पितरांचा अहोरात्र एक दिवस होतो, मनुष्यांचें एक वर्ष म्हणजे देवांचा अहोरात्र एक दिवस होतो, या देव मानानेंच चार हजार वर्षें कृतयुगाचें मान.

तीन सहस्त्रवर्षें त्रेतायुगाचें, दोन सहस्त्रवर्षें द्वापार युगाचें आणि एक सहस्त्र वर्षें कलियुगाचें मान आहे. जे पुरुष शाश्वत लोक धारण करितात त्यानीं शाश्वत ब्रम्ह जाणिलें आहे. आतां देवांचीं बाराहजार वर्षें गेलीं म्हणजे कृतादिक चार युगें होतात. तीं चार युगें हजार वेळ गेलीं म्हणजे ब्रम्हदेवाचा एक दिवस होतो, त्याच मानानें ब्रम्हदेवाची एक रात्र होते या मानानें शंभर वर्षें ब्रम्हदेवाचें आयुष्य आहे त्या ब्रम्हदेवाची रात्र गेली म्हणजे पुनः तो सृष्टी करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

५९. अध्याय एकुणसाठावा.— व्यास सांगतात हे शुक, ब्रम्हदेव प्रथम मनापासून मानसिक सृष्टी करितो आणि त्या ब्रम्हदेवाच्या तेजोमय बीजापासून हें जग उत्पन्न होतें तेव्हां आकाशादिक तत्वें उत्पन्न झाल्यावर ब्रह्मदेवानीं देव, ऋषि, पितर, मानव, लोक, नद्या, समुद्र, दिशा, पर्वत, वृक्ष, नर किन्नर, राक्षसपशु, मृग, सर्प, इत्यादिकांस उत्पन्न केलें त्यांस आपआपले स्वभावानें कर्मे करावीं म्हणून कर्माचा विभाग सांगितला. पुरुषास शमदमरूप तप कल्याण करणारें आहे म्हणून ब्रम्हदेव तपें करून हें जग उत्पन्न करितो ऋषी तप सामर्थ्यानें वेद पठण करितात पूर्वी देव तपें करून देवत्वास पावले तस्मात् हे शुका, शब्दब्रम्ह, परब्रम्ह हीं दोन आहेत त्यांत शब्दब्रम्हरूप प्रणव आहे याचे ठायीं जो निष्णात तो परब्रम्हास पावतो या प्रमाणें व्यास भूतांची स्वभाव विहित जीं कर्मे आहेत त्यांचें कथन करून म्हणतात हे शुक, सृष्टि, काल, यज्ञ, वेद, कर्ता, कार्य आणि कर्माचें फल हीं मीं तुला सांगितलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

६०. अध्यायसाठावा.— व्यास सांगतात हे शुका, ब्रम्हदेवाचा दिवस झाल्यावर त्याच्याच रात्रीच्या आरंभीं महाप्रलय ईश्वर करितो तो तुला सांगतों. शेषाच्या मुखांतून उत्पन्न झालेला अग्नि त्याच्या सप्तज्वाला आणि स्वर्गांतील सूर्य, त्याच्या ज्वाला, त्या सर्व जगाचें दहन करितात नंतर वृक्षादिक नाश पावलेली पृथ्वी कांसवाच्या पाठी प्रमाणें दिसते त्या भूमीच्या गंधास उदक गृहण करतें गंध गेल्यावर ती पृथ्वी उदकांत प्रलय पावते त्या प्रमाणें अग्नीनें उदकाचा गुण हरण केल्यावर तें अग्नीचे ठायीं ना-

श पावतें नंतर वायूनें अग्नीचा गुण गृहण केल्यावर तो वायूचे ठायीं नाश पावतो आकाशानें वायूचा गुण हरण केल्यावर तो वायू आकाशांत नाश पावतो त्या आकाशाचा गुण जो शब्द त्यास मन हरण करतें मगतें आकाश मनाचे ठायीं नाश पावतें नंतर तें मन चंद्राचे ठायीं, चंद्र संकल्पाचे ठायीं संकल्प चित्ताचे ठायीं नाश पावतो तें चित्त वश केलें म्हणजे तें ज्ञान श्रेष्ठ होय त्या ज्ञाना सहित चित्तास काल ग्रासतो त्या कालास मूलप्रकृति ग्रासते मग ती प्रकृति ज्या पासून होते तें शाश्वत ब्रम्ह जाणावें. तें परब्रम्ह अनंतशक्ती युक्त आणि स्वयं प्रकाशरूप आहे म्हणून त्याचा नाश नाहीं यास्तव योगी त्याचा साक्षात्कार प्राप्त होण्याविषयीं यत्न करितात मग ते त्याय-त्नानें त्यास जाणतात या प्रमाणें महा प्रलय तुला सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

६१. अध्याय एकसष्टावा :- व्यास सांगतात हे शुका, आतां ब्राम्हणाचा धर्म तुला सांगतों. जात कर्मादि संस्कार होऊन उपनयन झालें म्हणजे त्यानें वेदाध्ययन करावें नंतर गुरूची आज्ञा घेऊन समावर्त्तन करावें नंतर ब्रह्मचर्याश्रमापासून गृहस्थाश्रम, अथवा वानप्रस्थ अथवा सन्यासाश्रम स्वीकारावा; परंतु चार आश्रमांत गृहस्थाश्रम धन्य आहे कारण हा सर्व धर्मांचें मूल असून तीन ऋणांतून मुक्त होणारा आणि याची जों-काल पर्यंत कीर्ति लोकांत आहे तों पर्यंत उत्तम लोकीं त्या पुरुषाचा वास होतो या प्रमाणें रंतिदेव राजा वसिष्ठ ऋषीस उदक देऊन स्वर्गी गेला; शिबि आपले शरीराचीं अंगें व पुत्र ब्राम्हणास देऊन स्वर्गी गेला, या प्रमाणें अंबरीष, गय, ब्रम्हदत्त. मित्रसह, लोमपाद, मदिराश्व, असे अन्य बहुत राजे, दान व तप इत्यादीकानीं स्वर्गी गेले त्यांची कीर्ति यावत् पृथिवी आहे तावत् राहाणारी आहे. ते दान, यज्ञ, संतती इत्यादि कारणानीं स्वर्गी गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

६२. अध्याय बासस्टावा :- व्यास सांगतात हे शुका, ब्राम्हणानें तीन वेदांचा अर्थ, व अथर्वण वेदाच्या अर्थाचें तात्पर्य पाहावें आणि षट्कर्मे धैर्य धारण, स्नान, अध्ययन, यज्ञ, तप, लज्जा, आर्जव, अल्प आहार, काम

व क्रोध यांचा त्याग, अग्नि व ब्राम्हण यांची पूजा पंचमहायज्ञ, स्वधर्मानें क्रियावान असणें, अशा वृत्तीनें राहणाऱ्या ब्राम्हणाचें तेज वृद्धीस पावतें आणि तो पापापासून मुक्त होऊन ब्रम्हस्वरूपास पावतो जसा बुद्धिमान पुरुष नदीतून नौकादि उपायानें तरतो तशी शरीर हें नदी, इंद्रियें हें जल, लोभ हा तीरें, क्रोध हा चिखल, स्वभाव हा प्रवाह, काल ही वृष्टि मांस हे पाषाण, पक्ष हे तृण, निमिषोन्मेषे हा फेन, अहोरात्र हा उदकाचा पूर, अशा प्रकारच्या नदींतून तरावयास नौका, वेद व यज्ञ, अथवा ज्ञान हींच नौकारुप आहेत यांच्या आश्रयानें विवेकी बहुत पुरुष तरून जातात या करितां ज्ञानी पुरुषासारिखा निःसंशय होऊन अज्ञानी पुरुष तरत नाहीं. यास्तव ज्ञानी पुरुष पापापासून मुक्त होऊन ब्रम्हपदास जातो. असा विषय या अध्यायांत आहेत.

६३. अध्याय त्रेसस्टावा.– व्यास सांगतात हे शुका, नदीच्या प्रवाहांत पडणारा पुरुष जसा नौकेवांचून तरणार नाहीं तसा संसार नदींत असणारा पुरुष ज्ञानावांचून तरणार नाहीं या प्रमाणें निश्चय जाणून बुद्धिमान पुरुष, अज्ञ पुरुषास हीं ज्ञानानें तारून आपण तरतात आतां पुरुषानें पंच ज्ञानेंद्रियांचें नियमन करून कर्मेंद्रियांचा व्यापार सोडावा नंतर मन, बुद्धीचें ठायीं बुद्धी आत्म्याचे ठायीं स्थीर करावी. म्हणजे तो योगी सुखास पावतो आतां परब्रम्ह प्राप्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषास रथाच्या रूपकानें लक्षणें सांगतात. पुरुषाचा देह हा रथ, यज्ञादि कर्म हें सारथ्याचें स्थान, निषिद्ध कर्मत्याग हें रथाचें रक्षण करणारें, उपाय व अपाय हीं युगंधर काष्ठें, अपान व प्राण हे अक्ष व युग सावधान असणें हे दोन फाळ, आचार हा रथनेमि, श्रोत्रादि चार ज्ञानेंद्रियें हे चार घोडे, शमादि साधन हें रथांत बसणाऱ्याचें स्थान, शास्त्रीय ज्ञान निश्चय हा प्रतोद, ज्ञान सारथी, जीव हा रथी असा मुमुक्षूनें योजना केलेला रथ म्हणजे त्याचा देह ब्रम्हलोकीं प्रकाशरूप शोभतो. शम, दम, तितिक्षा, उपरति, श्रद्धा, समाधान, त्या साधनानीं युक्त होऊन आंसनावर बसावें आणि गुरूनें सांगितल्या प्रमाणें योग धारणा करावी. अशा सात योग धारणा सांगितल्या आहेत त्या योग्यास

प्राप्त झाल्या असतां त्यास रोग, जरा, मृत्यु, यांचे भय कांहीं होत नाहीं कारण योगानें अग्नी सारिखें त्याचें शरीर होतें म्हणून तो योगी निर्भय होतो; परंतु कलियुगांत हटयोगाचें साधन करणें कठीण आहे यास्तव सांख्यशास्त्रांत सांगितलेलें ज्ञान तुला सांगतों. पुरुषाच्या शरीरीं पंचवीस तत्वें व जीव आणि परमात्मा हे राहतात आतां पुरुषाचे ठायीं अहंकारशुन्यता, निःसंशयता, समस्त विषयवासना विनिर्मुक्तता, मातीचा गोळा व पाषाण आणि सुवर्ण यांस सारिखें पाहणारा, सर्व भूतांशीं समान असणारा, हे गुण आहेत तो परब्रह्मास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

६४. अध्याय चवसस्टावा.- शुकाचार्य प्रश्न करितात हे व्यासा, ज्ञान कोणतें, विद्या, प्रवृत्ति लक्षण धर्म, व निवृत्तिधर्म कोणता त्या चार प्रश्नांचीं लक्षणें सांगा. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, जो पुरुष मी नित्य प्रकाशरूप आहे असें बोलतो आणि शिष्यांस ही त्या बोधें करून रममाण करितो तो ज्ञानी जाणावा. आतां त्या पक्षाचा आश्रय न करणारे पुरुष अल्प बुद्धी आहेत असें जाणावें. हे शुका, प्रपंच व परमार्थ यांस, साधून दाखविणारी प्रज्ञा थोर आहे कोणी प्रज्ञें करूनच कल्याण पावतात व राजे राज्याचा उपभोग प्रज्ञे करूनच घेताच यास्तव प्रज्ञा वृत्ति, ब्रह्मींलीन झाली म्हणजे तीच विद्या जाणावी अशा ज्ञानानेंच प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंस पुरुषाची प्रज्ञा जाणते तो सर्वज्ञ आणि त्यागी, शब्दब्रह्माचे ठायीं निष्णात, परब्रह्माचे ठाईं अनुभवानें निश्चय पावलेला, त्या पुरुषास देव ब्राम्हण म्हणतात कारण सर्वांभूतीं अंतस्थ राहणारें जें निर्गुण ब्रम्ह त्यास तो जाणतो या कारणास्तव देव. त्या पुरुषावर अनुग्रह करितात. असा विषय या अध्यायांत आहे.

६५. अध्याय पांसस्टावा.- व्यास सांगतात हे शुका, ब्राम्हणानें आत्मज्ञान संपादन करून कर्में करावीं म्हणजे तीं कर्में त्यास उत्तम सिद्धीस योग्य होतात; परंतु संशय रूप ज्ञान ज्या पुरुषाचें आहे त्याला संशय दूर होण्याचें जें विधान आहे तें तुला सांगतों कोणी मीमांसक पुरुषानें त्या जन्मामध्यें अथवा जन्मांतरीं जें केलेलें कर्म तें त्यास फलास कारण आहे

असें म्हणतात. लोकायतिक म्हणतात कीं, देवच साधान आहे कोणी स्व भावच कारण असें बोलतात तें सर्वांचें भाषण तुच्छ आहे आतां सत्व गुणी योगी परमार्थ बुध्दीनें ब्रम्हसत्ताच कारण असें जाणतात तेंच यो ग्य जाणावें. हे शुका, कृत. त्रेता, द्वापार. कली. हीं चार युगें आहेत त्यांत कृतयुगीं ब्राम्हण सत्व गुणानें युक्त आणि तपस्वी. त्रेता युगीं ब्राम्हण वेद पठण व यज्ञ करणारे होतील, द्वापारयुगीं वेदाचें माहात्म्य कमी होईल कलियुगीं वेद नष्ट होतील व स्वधर्माचा नाश होऊन अधर्मानें पीडित ब्रा म्हण तसे आश्रम, वेदोक्त धर्म, हे नाश पावतील जसा पर्जन्य सर्वभूतां चा रक्षण करणारा होता तसे वेद युगा युगाचे ठायीं रक्षण करणारे हो तात; परंतु कलियुगीं वेदाचें सामर्थ्य राहात नाहीं उत्पत्ती काल, धृति. वेद, कर्ता, कार्य कर्माचें फल, ही तुला मी सांगितली असा विषय या अध्यायां त आहे.

६६ अध्याय माहात्म्यावा- शुक प्रश्न करितात हे व्यासा, ज्याची नि र्मल बुद्धी आणि जो सांग वेदाध्यायी यज्ञादि कर्में करणारा असा असून त्यास प्रत्यक्षादि प्रमाणानीं कळत नसून जें वेदासही गोचर नाहीं तें ब्र म्हगोचर कसें होतें व तपादिकांच्या योगानें अथवा मनाची आणि इंद्रियां ची एकाग्रता झाल्यानें पुरुष ब्राम्हास कसा पावतो हें मला सांगा. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, विद्या. तप, इंद्रियनिग्रह, सर्व कर्मांचा फ लत्याग अथवा संन्यास, हीं साधनें केल्यावांचून पुरुष सिद्धि पावत ना हीं. आतां सर्वांच्या शरीरीं पंच महाभूतें व्यापक आहेत त्यांत भूमी अंश देह, जलापासून स्नेह, तेजापासून नेत्र, वायूपासून प्राण व अपान, आ काशाचा अंश नासिकादिक रंध्रें, पादेंद्रियांची देवता विष्णू, हस्ताची देव ता इंद्र, जठराची देवता अग्नी, कर्णांची देवता दिशा, आतां जिव्हा स्थान, वा क् इंद्रिय, यांची सरस्वती देवता, या प्रमाणें सर्व इंद्रियांची स्थानादिक जा णावीं आतां देव ही ब्रह्माच्या मार्गाविषयीं मोह पावतात जसें पक्ष्यांचें आकाशीं गमन, मास्यांचें उदकीं गमन दिसण्यांत येत नाहीं तसें ब्रम्हवेत्ते पुरुषांचें ब्रम्हस्वरूपीं गमन होतें तें दिसण्यांत येत नाहीं. हे शुका, असें जें सर्वत्र

व्यापक तें तूं निर्गुण ब्रम्ह जाणावेंस या शिवाय दुसरें कांहीं एक नाहीं व त्या ब्रम्ह्रास जो पावला त्यास पुर्नजन्म नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

६७. अध्याय सदुसष्टावा:- व्यास सांगतात हे शुका, आतां योगाचें लक्षण तुला सांगतों. बुद्धि, मन, इंद्रियें, त्यांची एकाग्रता करून व्यापक जो आत्मा त्यास पाहावें. उपशांत, दांत, अध्यात्म स्वभावी, आत्मरति, ज्ञानी, शुद्ध कर्म करणारा, अशा पुरुषाचा क्रोध शम धारण केल्यानें जातो. संकल्प वर्ज केल्यानें काम, सत्व गुणाच्या सेवनानें निद्रा जाते तसेंच त्या पुरुषानें धैर्यानें शिश्न व उदर यांचें रक्षण करावें, नेत्रानीं हस्त व पाद यांचें, मनानें परस्त्री दर्शनादि भयापासून नेत्र व कर्ण, यज्ञादि उत्तम कर्मानें मन व वाणी यांचें रक्षण करावें. सावधपणानें भय टाकावें, लोभास कारण जो दंभ तो ज्ञानी पुरुषाच्या समागमानें टाकावा. या प्रमाणें पुरुषानें निरालस्यपणानें योगास विघ्न करणाऱ्या दोषाचा त्याग करावा आणि अग्नि, ब्राह्मण व देव यांस पूजा व नमस्कार करावे. परस्त्रीशीं रत झालेल्या पुरुषाबरोबर गोष्टी सांगूं नयेत. इंद्रियांचा निग्रह, ध्यान, अध्यायनादिक कर्में करणाऱ्या पुरुषाचें तेज वाढून पापाचा नाश होतो. आतां योग साधन करणाऱ्या पुरुषानें मन व इंद्रियांची एकाग्रता करून अहोरात्र नियमानें आसनावर बसावें आणि संकल्प, विकल्प हे मनांत न आणितां आत्म्याचे ठायीं मनाची धारणा करावी. या प्रमाणें अभ्यास करितां करितां षण्मासानीं त्यास ब्रम्ह साक्षात्कार होतो मग तो पुरुष आपल्यास अग्नी, सूर्य आणि विद्युल्लता यां सारिखा पाहतो आतां मनाचा निरोध करण्याचा अधिकार स्त्रीया व शूद्रादिक यांस आहे असा अभिप्राय व्यासानीं शुकास सांगितला त्या योगें शुकास ब्रम्ह साक्षात्कार झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

६८. अध्याय अडुसष्टावा:- शुकाचार्य प्रश्न करितात हे व्यासा, वेदानें कर्म करावें म्हणून सांगितलें आणि तोच वेद कर्माचा त्याग करावा असें सांगतो हे विरुद्ध दिसतें व पुरुष विद्येनें कोणत्या गतीस व कर्मानें कोणत्या गतीस जातात हें सांगा. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, वेदानीं

दोन मार्ग सांगितले त्यांत प्रवृत्ति मार्गी राहणारा पुरुष कर्मानें बंध पावतो व नि वृत्ति मार्गी विद्येनें मुक्त होतो या कारणास्तव मुक्त होणारे योगी कर्म करीत नाहींत कोणी अल्पबुद्धी पुरुष कर्माची प्रशंसा करितात परंतु त्या कर्मानें ते स्त्री लंपट होऊन शतावधि देह घेतात व पुण्य पुरुष कर्माची प्रशंसा न करून उत्तम बुद्धीनें शोक रहित स्थानास पावतात यास्तव कर्मांचें फल सुख दुःख व जन्म, मरण, देणारें आहे म्हणून अचल आणि अक्षय असें जें ब्रह्म तें प्राप्त झाल्यानें पुरुष कृतार्थ होतो. कारण त्याच्या सत्तेनें सर्व लोक होतात या साठीं त्यास जाणण्याविषयीं यत्न करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

६९. अध्याय एकूण हत्तर:— शुक प्रश्न करितात हे व्यासा, त्या लोकीं साधुपुरुष ज्या आचारानें वर्तणूक करितात तो आचार व लोक रीतींत कर्मांविषयीं जे धर्माधर्म आहेत ते सांगा. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, पूर्वीं ब्रह्मदेवानीं जो आचार सांगितला त्या आचारानें महर्षीनीं उत्तमलोक जिंकिले तो आचार तुला सांगतों. ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास हे चार आश्रम आहेत यांत प्रथम ब्रम्हचर्याश्रम करणाऱ्यानें गुरूचे गृहीं दासासारिखें कर्म करावें हस्त जोडून गुरू पुढें उभे राहून गुरु जें सांगतील तें त्यानें करतों म्हणावें, गुरु उपवासी आहे तर आपण ही उपवास करावा. या प्रमाणें उदक प्राशन व बसणें आणि निद्रा इत्यादि कर्मे करावीं. गुरूचे पायांवर मस्तक ठेवून वेदाध्ययन करावें जें कांहीं आपण केलें तें गुरूस निवेदन करावें ब्रह्मचर्याश्रमाचे जे नियम सांगितले आहेत ते सर्व त्यानें करावेत गुरूस दक्षिणा देऊन त्यानें ब्रम्हचर्य व्रत समाप्त करावें नंतर दुसऱ्या आयुष्याचा भागांत गृहस्थाश्रम घ्यावा. असा विषय या अ-आहे.

७० अध्याय सत्तर:— व्यास सांगतात हे शुका, गृहस्थाश्रम घेतल्यावर त्याणें गृहांत वास करावा आणि स्त्रीनीं युक्त होऊन अग्नीची सेवा करावी. यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, हीं कर्मे करावीं. यजन, व कोणी अध्ययन, दान, हीं तीन करावीं, वानप्रस्थानें दान, अध्ययन हीं करावीं. संन्यासी याणें एक प्रणवाची उपासना करावी, आतां गृहस्थानें दिवसाचा व रात्रीचा प्रथम प्रहर आणि चवथा प्रहर यांत निद्रा करूं नये.

दिवसा भोजन द्विवार करूं नये, ऋतुवांचून स्त्रीशीं मैथुन आपण बोलावून आणून करूं नये. आपले गृहीं स्वजन अथवा अतिथि यास उपवासी ठेवूं नये. वेद व शास्त्र, यांचें अध्ययन करावें, अग्निहोत्र घ्यावें, नित्य पंच महा यज्ञ करावे, आपले गृहीं कोणी भिक्षा मागावयास आला तर त्यास जें घरांत असेल त्यांतील अल्प घालावें, ऋत्विक्, उपाध्याय, आचार्य, मातुल, वृद्ध, बाल, अतुर, वैद्य, ज्ञाती, माता, पिता, सगोत्रस्त्रिया, भ्राता, पुत्र, भार्या, कन्या, सेवकवर्ग, इतक्यांशीं अन्नादिक घेण्याकरितां कलह करूं नये, या प्रमाणें पोषण करणारा गृहस्थ उत्तम लोकांस जातो आपल्या ज्येष्ठ बंधूस पित्यासमान मानावें, या प्रकारेंकरून जे कांहीं गृहस्थास धर्म सांगितले आहेत ते त्याणें केले असतां तो विमानांत बसून स्वर्गलोकीं पूज्य होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

७१. अध्याय एकाहत्तर:– व्यास सांगतात हे शुका, गृहस्थानें आपल्या शरीरास अशक्तपणा आला व आपणास नातू झाला म्हणजे वानप्रस्थाश्रम करावा. व अग्निहोत्र, गाई, यज्ञाचीं अंगें, अग्निहोत्राचें साहीत्य बराबर घ्यावें, हेमंतऋतूंत उदकांत उभे राहून जप करावा. ग्रीष्मऋतूंत चार दिशेस चार अग्नि आणि पांचवा सूर्य असें पांचाग्नि साधन करावें, अल्पआहार करावा, भूमीवर शयन करावें, मूळें अथवा पक्व झालेलीं फळें भक्षण करावीं अशा नाना प्रकारच्या दीक्षा धारण करून त्याच युगांत अगस्त्य, सप्तऋषी, मधुच्छंद, अघमर्षण, सांकृति, सुदिवा, तंडि, अहोवीर्य, काव्य, मेधातिथि, कर्णनिर्वाक, शून्यपाल, कृतश्रम, वैखानस, वालखिल्य, सैकत, इत्यादिक ऋषी वानप्रस्थाश्रम करून स्वर्गास गेले. आतां वानप्रस्थाश्रम करीत असतां तो जरा व व्याधी यानीं पीडित झाला तर त्याणें तत्काल इष्टिकरावी आणि आत्म्याचे ठायीं अग्नीचें स्थापन करून सर्व परिग्रह टाकावे. केश, लोम, नखें यांचें वपन करून त्यानें चतुर्थाश्रम घ्यावा. असा विषय या अध्यायांत आहे.

७२. अध्याय बाहात्तर:– श्रीशुक प्रश्न करितात हे व्यासा. ब्रह्माची इच्छा करणारा वानप्रस्थाश्रमी जरादिकानीं पीडीत झाल्या पुढें त्यानें कोणत्या

उपायानें आत्मा जाणावा. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, ब्रम्हचर्य व गृहस्थाश्रम या दोन आश्रमांनी चित्त शुद्ध झाल्यावर वानप्रस्ताश्रमांत ही योगाभ्यास करून सन्यास संस्कार झालेला गृहण करावा त्याचीं लक्षणें सांगतो. त्यानें एकाकी असून अन्नाकरितां ग्रामांत जावें. अल्प आहार करावा, कमंडलु घ्यावा. वृक्षा खालीं राहावें, सर्वभूतांस अभय चिंतूनआकाशा सारिखा व्यापक मी आहें अशा ज्ञानानें पहावें, जें कांहीं अन्न व आच्छादन मिळेल त्यानेंच संतोष करावा, क्रोधादिकांचा त्याग करावा. मरण व जीवित यांविषयीं वाईट चांगलें म्हणूं नये. कोणास नमस्कार करूं नये. स्तुती न करावी, अशा प्रकारें निरिच्छ राहणाऱ्या संन्याशास देव ब्राम्हण असें म्हणतात याप्रकारचा सन्यासी तेजोमय होऊन जीवन्मुक्त अवस्थेस पावतो आणि प्रारब्ध भोगपर्यंत त्याचा देह राहतो या प्रमाणें चतुर्थाश्रमाचीं लक्षणें तुला सांगितलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

७३. अध्याय त्र्याहात्तर.— व्यास सांगतात. हे शुका, प्रकृतीचे विकार देह, इंद्रियें, मन आणी कर्त्ता व भोक्ता, परमात्मा म्हणूनच योजिला आहे परंतु देहेंद्रियादिक परमात्म्यास जाणत नाहींत तो परमात्मा देहादिकांस जाणतो तेव्हां मना सहित साहा इंद्रियें, यांहून विषय श्रेष्ठ आहेत त्याहून मन, मनाहून बुद्धि, बुद्धीहून महत्तत्व, त्याहून अव्यक्त, अव्यक्ताहून परजें तें ब्रह्म तीच परमगती त्याहून अन्य कांहीं नाहीं या प्रमाणें सर्व भूतीं गुप्त राहणारा परमात्मा आकाशरूप दिसत नाहीं तेव्हां त्यास नाहीं असें कोणी म्हणतात, परंतु असें म्हणणाऱ्या पुरुषास ब्रम्हघात केल्याचें पातक होतें म्हणून श्रुतींत सांगितलें आहे. यास्तव तें उत्तम ब्रह्म सूक्ष्म दृष्टीनें पाहाणारे जे तेच बुद्धीच्या सूक्ष्म वृत्तीनें जाणतात नंतर, ते सर्व संकल्पांचा नाश करून ब्रह्माचे ठायीं चित्त लावितात त्या योगानें त्यांस अत्यंत सुख होतें. हे पुत्रा, हें आत्म प्रत्ययास कारण शास्त्र तुला सांगितलें हें निंदादिक करणाऱ्या पुरुषांस तूं सांगूं नको जे कोणी भक्तियुक्त असतील त्यांस सांग. आतां हें शास्त्र श्रवण पठण करणाऱ्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. असा विषय या अध्यायांत आहे.

७४. अध्याय चवऱ्याहत्तर :– श्रीशुक प्रश्न करितात हे व्यासा, अध्यात्म म्हणून जें शास्त्र आहे तें तुम्हीं विस्तारें करून मला सांगावें. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, समुद्राच्या ठायीं जशा लाटा तशी जरायुजादि सर्व भूतां चे ठायीं भूमी इत्यादि पंचमहाभूतें व्यापक आहेत आतां शब्द, श्रोत्र, देह-छिद्रें हे आकाशाचे तीन गुण, प्राण, चेष्टा, स्पर्श, हे वायुचे, रूप, चक्षु, जाठर, हे तेजाचे, रस, जिव्हा, स्नेह, हे उदकाचे, नासिक, घ्राण, शरीर, हे पृथिवीचे तीन गुण, या प्रकारचा इंद्रियां सहित हा पंच भूतांचा विकार आहे. संकल्प विकल्पात्मक मन, निश्चयात्मिक बुद्धि, जसा कूर्म आपलीं आंगें पसरतो आणि गृहण करितो तशी बुद्धी त्या इंद्रिय समुदायांस उत्पन्न करून गृहण करीते यास्तव बुद्धी उत्तम बुद्धी हून परमात्मा उत्तम आहे. आतां सत्व, रज, तम, हे गुण प्रकृतीपासून होऊन सर्व भूतांचे ठायीं समान असणारे आहेत तेव्हां हे शुका, त्या गुणांत सत्व गुणाचें सेवन करणारा पुरुष आत्मज्ञाना विषयीं अधिकारी होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

७५. अध्याय पंचाहत्तर :– व्यास सांगतात हे शुका, पुरुषाच्या शरीरांत जीं मनासहित इंद्रियें आहेत त्यांत बुद्धी थोर आहे कारण सर्व इंद्रियांचे व्यापार बुद्धीच्या योगानें होतात. मनुष्यास कोणत्या काळीं हर्ष होतो व कोण तेकाळीं शोक होतो, तशींच सुख दुःखादिक बुद्धिच्या योगें होतात. आतां सात्विकादिक जे भाव आहेत ते सर्वांच्या मन, बुद्धि, अहंकार, यांचे ठायीं राहतात तेव्हां मनाची एकाग्रता होण्यास कारण, बुद्धिचा जो निश्चय तोच आहे असें जाणून विद्वान पुरुष मोह पावत नाहींत. कोणी पुरुष इंद्रियांच्या योगानें आत्म्यास पाहावें असें म्हणतील तर तें त्यांचें भाषण व्यर्थ आहे कारण इंद्रियें यानीं आत्म दर्शन होणार नाहीं; परंतु विषयांतून बाहेर काढलेलीं इंद्रियें भगवंताच्या भजनीं निमग्न झालीं असतां तींच आत्म दर्शन प्राप्तीस साधन भूत होतील. या प्रकारचा योगी जसा उदकांत संचार करणारा पक्षी उदकीं गमन करीत असतांही लिप्त होत नाहीं तसा हा इंद्रियांनीं विषयांचें सेवन करीत असतां गुण दोषें करून लिप्त होत नाहीं या प्रमाणें शरीर आणि परमात्मायांचें अंतर ज्याणें जाणलें तो मुक्त होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

७६ अध्याय शाहत्तर :- व्यास सांगतात हे शुका, प्रकृति गुणांस उत्पन्न करिते, ते गुण कर्मे करितात, त्या कर्मांचा साक्षिभूत जो परमात्मा तो उदासीनाप्रमाणे राहातो परंतु जसे लोहचुंबकाच्या सत्तेनें लोखंड चलन पावतें तशी परमात्म सत्तेनें देहेंद्रियांपासून कर्मे होतात म्हणून परमात्मा लिप्त होत नाही. यास्तव पुरुषानें क्रोधादिकांचा त्याग करून आत्म्यास जाणावें म्हणजे ब्राह्मण जन्म घेतल्याचें साफल्य होतें व तोच शुद्ध आणि तोच कृतकृत्य होतो म्हणून जी गती ज्ञानी पुरुषास प्राप्त होते त्याहून दुसरी अधिक गती कोणती ही नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

७७. अध्याय सत्याहत्तर :- श्रीशुक प्रश्न करितात हे व्यासा, सर्व धर्मांहून जो श्रेष्ठ धर्म असेल तो मला सांगा. असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, पुरुषानें विषयांपासून इंद्रियांचें नियमन करून बुद्धियोगानें मनाची व इंद्रियांची एकाग्रता करावी नंतर तो आत्मज्ञानानें तृप्त झाला म्हणजे मनाचे ठायीं अन्य कांहीं एक चिंतन न करितां त्यानें केवल ब्रह्मचिंतनच करावें म्हणजे चित्त शांत होतें त्या चित्तासच ज्ञानचक्षु म्हणावें त्यानें तो शाश्वत ब्रह्मास पाहाणार या प्रमाणें ब्राम्हणही त्या ब्रम्हास निरंतर पाहतात असा. आत्म्यास पाहणारा पुरुष सर्व पापापासून मुक्त होऊन जसा सर्प जीर्णत्वचा टाकून सावध होतो तसा हा श्रेष्ठ बुद्धीस पावून ज्वर रहित होतो आणि सर्व लोकांस वाहविणारी जी संसार नदी यांतून तरून आपण ब्रह्मरूपच होतो नंतर सर्व भूतांचे उत्पत्ती व नाश यांस पावतो मग त्या ज्ञानी पुरुषास मुनि, हा श्रेष्ठ आहे असें म्हणतात. या प्रकारें हे शुका, सर्व धर्मांहून श्रेष्ठ धर्म जो तो तुला मी सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

७८. अध्याय अठ्याहत्तर :- व्यास सांगतात हे शुका, पूर्वी सांगितल्याप्रमाणें जो ब्रह्मनिष्ठ झाला त्याचीं लक्षणें तुला सांगतो. गंध, रस, स्पर्श, अलंकार, मान, कीर्ति, यश, इत्यादिकांची इच्छा न करणारा ब्रम्हनिष्ठ जाणावा त्यास भय कोणापासूनही होत नाहीं आणि जो इच्छा व द्वेष रहित होतो तो ब्रह्मास पावतो तसें व जो सर्वभूतीं कर्म, मन, वाणी, इत्यादिकांनीं पापरूप भाव करीत नाहीं तो ब्रह्मास पावतो. जशीं अन्य उदकें समुद्रांत प्रवेश करून

रव पावतात तसे काम ज्या पुरुषांस लय पावतात तो पुरुष सरव पावतो. आतां वेदाचें सार जें उपनिषत् त्यास सत्य म्हणावें याचें श्रवण व मनन करणारा पुरुष शोकरहित, शांत, प्रसन्नचित्त, इत्यादि लक्षणांनीं युक्त होऊन अखंड सुखास पावतो. जसा सूर्योदयानें अंधःकाराचा नाश होतो तसें ब्रम्हसुखानें मननशील पुरुषाचें दुःखनाश पावतें मग तो जन्म व मृत्यूस न जाणतां ब्रम्हपदास पावतो व त्यास पुनर्जन्म नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

७९. अध्याय एकूण ऐंशी:— व्यास सांगतात हे शुका, मोक्षाची इच्छा करणारा पुरुष जो आहे त्याणें पूर्वी सांगितलेलें अध्यात्म शास्त्र श्रवण करावें आतां जरायुजादि चतुर्विध भूतें आकाशादि पंचमहाभूतात्मक आहेत त्या पंच महाभूतांचीं लक्षणें सांगतो. अवकाशात्मक जें आकाश त्याचें श्रोत्र हें इंद्रिय, शब्द हा गुण, गमन, प्राण, अपान, स्पर्शनेंद्रिय, स्पर्श, हे वायूचे गुण, अन्नादिकांची पचनशक्ती, ताप, प्रकाश, ज्योति, चक्षु, रूप हे तेजाचे गुण, आर्द्रपणा, सूक्ष्मभावानें शरीरांत प्रवेशता, स्नेह, रक्त व मज्जादिकांनीं युक्त, रसनेंद्रिय जिव्हा, रस हे जलाचे गुण, पार्थिव धातु, अस्थि दंत, नखें श्मश्रु, रोम, केश, शिर, शिरा, चर्म घ्राणेंद्रिय, नासिका, गंध उत्पत्यादिक हे पृथ्वीचे गुण होत. या प्रमाणें पंचमहाभूतांचीं लक्षणें आहेत मन, बुद्धि, जीव, परमात्मा, हे भाव पुरुषानें जाणले असतां तो मोह पावत नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

८०. अध्याय ऐंशी:— व्यास सांगतात हे शुका, स्थूल शरीरापासून जें पृथक् सूक्ष्म भूत लिंग शरीर त्यास शास्त्र जाणणारे योगी योगानुष्ठानानें समाधीचे अर्थी पाहातात. जसें आकाशाच्या उदरीं मृगजळाचे निबिड समुदाय सूर्यकिर्णांच्या योगानें लोक सूक्ष्म दृष्टीनें पाहातात परंतु स्थूलदृष्टीनें ते दिसत नाहींत तशीं हीं स्थूल देहरहित झालेलीं लिंग शरीरें सत्वगुणाच्या योगानें अत्यंत सूक्ष्म दृष्टी करून योगी पाहातात कारण अवस्थात्रयांतून मुक्त झालेले योगी आपल्या स्वाधीन राहणारा असा लिंग देह कल्पांतच्या देहांत प्रवेश करण्याची योग्यता त्यांस आहे म्हणून योगाच्या स्वा-

पश्वादिक भूतेंव आश्रमादिक हीं सर्व दहन होऊं लागलीं हें पाहून शंकर ब्रम्हदेवास शरण गेले तेव्हां ब्रम्हदेव म्हणतात हे शिवा, मी तुला प्रसन्न झालों वरमा. नंतर शंकर बोलतात. असा विषय या अध्यायांत आहे.

८४. अध्याय चवऱ्याऐंशी— महादेव बोलतात. हे ब्रम्ह देवा, तुमच्या क्रोधा पासून जो अग्नी झाला त्याने प्रजेचा नाश होतो यास्तव हा कोप आपणास नसावा. असें ऐकून ब्रम्हदेव बोलतात हे शंकरा, प्रजेचा भारानें पृथ्वी पीडित झाली तेव्हां तिचा भार दूर व्हावा यास्तव प्रजेचा संहार केला आहे तेव्हां शंकर बोलतात हे ब्रम्हदेवा, तुम्हीं मला वर देतों म्हणालां त्यास आतां प्रजेचा नाश न व्हावा हा वर द्यावा. नारद बोलतात हे अकंपन राजा, ब्रम्हदेवानीं महादेवाचें भाषण ऐकून जो अग्नी प्रजेच्या नाशार्थ उत्पन्न केला होता त्याचें हरण केलें आणि प्रजेच्या नाशा विषयीं जन्म व मरण हीं करावीं असा कल्प नेनें जें तेज हरण केलें त्या तेजाची नारी ब्रम्हदेवाच्या इंद्रिय छिद्रांपासून झाली तिला ब्रम्हदेव व महादेव या उभयतानीं पाहिली नंतर ब्रम्हदेव तिला आपले समीप बोलावून हे स्त्रिये, आजपासून तुझें नाव मृत्यु म्हणून ठेविलें आहे तर तूं प्रजेचा नाश कर. म्हणजे तुझें कल्याण होईल असें ऐकून ती दुःखित झाली आणि तिच्या नेत्रांतून अश्रुपात झाले ते जगदीश्वरानें आपले हस्तांत ग्रहण केले. असा विषय या अध्यायांत आहे.

८५. अध्याय पंचाऐंशी — नारद सांगतात हे राजा, मृत्युरूपी देवी आपलें दुःख दूर करून बोलते हे ब्रम्हदेवा, प्रजेचा नाश करण्याचें काम आपण मला सांगता परंतु हें कर्म फार भयंकर आहे कारण प्राण्यांस मी मारूं लागल्यें म्हणजे ते प्राणी आपआपले पुत्र व संबंधी मृत झाले म्हणजे मला शाप देतील त्या योगानें अधर्म होईल यास्तव मी तुम्हांस शरण आल्यें आहें तेव्हां तप करण्या विषयीं मला आज्ञा द्यावी. असें ऐकून ब्रम्हदेव सांगतात हे मृत्यो, तुला ज्या कारणा करितां उत्पन्न केली तें कारण प्रजेचा संहार करण्याचें आहे तें तूं कर असा अनेक प्रकारें बोध केलेली ती कन्या कांहींएक भाषण न करितां ब्रम्हदेवापुढें हस्त जोडून उभी राहिली नंतर त्यांचा मनोभंग झाला असें पाहून ती कन्या तेथून धेनुक तीर्थास आली त्या ठिकाणीं तिनें पंधरा पद्में

गंडकी गंगा व मेरु पर्वत या स्थानीं दाहा हजार शीसपद्में, उदकांत अष्टसहस्त्र वर्षे हिमाचल पर्वताच्या आग्रभागीं अंगुष्ठावर उभी राहून एक निखर्व वर्षे या प्रमाणें तप केलें असें तिचें तप पाहून ब्रह्मदेव संतोष पावून बोलतात हे कन्ये, माझी आज्ञा तूं मान्य कर. तुजवर मरणाचें निमित्य येणार नाहीं व अधर्मही तुला होणार नाहीं पूर्वी तुझ्यानेत्रांतून आश्रुबिंदु पडले ते मी हस्ताच्या अंजलीनें धारण केले त्या घोर रूप व्याधी प्राण्यांस होऊन व मरणकाळीं काम क्रोध हे त्यांस होतील अशा कारणानीं प्राणी मरण पावतील तेव्हां तुला अधर्माचा व प्राणी मरण पावल्याचा दोष कांहीं एक लागणार नाहीं आतां तूं यथेच्छ प्राण्यांचा संहार कर. नारद म्हणतात हे राजा, या प्रमाणें ब्रम्हदेवाच्या आज्ञेकरून तो मृत्यु, व्याधी व काम क्रोध यांच्या सहाय्यानें प्रजेचा संहार करितो तेव्हां तूं आपले पुत्राविषयीं शोक करूं नकोस कारण प्राण व अपानादि हे वायुरूपी आहेत हे देहांतून गेले म्हणजे देहाचाच नाश होतो तेव्हां तुझा पुत्र स्वर्गीं आनंदरूप आहे या प्रमाणें तुला मृत्यूचें आख्यान सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

८६. अध्याय शाऐंशी:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, सर्व मनुष्यांस धर्माविषयीं शंका येते तेव्हां धर्म किति प्रकारच्या लक्षणानीं युक्त आहे तो सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, सदाचार, स्मृति, वेद आणि अर्थ, अशीं च्यार प्रकारचीं धर्माचीं लक्षणें आहेत म्हणून कवी बोलतात तस्मात् मनुष्यानीं धर्माचें आचरण केलें असतां त्या लोकीं व परलोकीं त्यांस सुख होतें आतां धर्माचरण न करणारा पुरुष पापानें लिप्त होतो जो पुरुष धर्माचरण करणारा असून चौर्य कर्मानें द्रव्य मिळवितो आणि कुटुंबासह वर्तमान आनंद पावतो त्या अधर्म करणाऱ्या पुरुषास हा धर्म करणारा आहे असें लोक बोलतात व जो पुरुष जन्मापासून असत्य भाषण कधींच न करणार आहे परंतु त्याच्या सत्य भाषणानें दुसऱ्याचा घात होत आहे तर त्याचें तें भाषण अनर्थाला कारण होईल या विषयीं कर्णपर्वांत श्रीकृष्णानीं अर्जुनास बोध व्हावा म्हणून सत्यवादी ब्राम्हणाचें आख्यान सांगितलें आहे या कारणास्तव पुरुषानें विचारें करून सत्याचें आचरण करावें ज्यापु-

रुवाच्या देहादिकांपासून पाप झालें नाहीं तो निर्भय आणि शुद्ध सर्वदां राहातो आतां मनुष्यांचा निर्वाह कसा चालेल म्हणून ब्रम्हदेवानीं त्यांस व्यापार वाढीचा करावा म्हणून सांगितलें आहे परंतु तो आपला व दीनजे असतील त्यांचा निर्वाह होण्यापुरताच करावा-अधिक भांडार भरून ठेवण्याचा करूं नये या कारणास्तव धर्म व अधर्म यांचा सूक्ष्म बुद्धीनें विचार पाहून कुटिलभावानें द्रव्य संपादन करण्याविषयीं बुद्धि करूं नये- असा विषय या अध्यायांत आहे.

८७. अध्याय सत्याऐंशी – धर्मराज प्रश्न करिताल हे भीष्मा, आपण धर्माचें सूक्ष्म लक्षण सांगितलें परंतु धर्म एक प्रकारचा आहे असें नाहीं त्यथा रुत्र जाणणाऱ्या पुरुषानीं प्रमाण पूर्वक धर्माचीं लक्षणें सांगितलीं आहेत तसीं वेदांतहीं सांगितलीं आहेत कोणी कृतयुगीं धर्म असुक प्रकारचा करावा. तसेंच त्रेतायुगीं व द्वापारयुगीं आणि कलियुगीं असुक प्रकारचा करावा असें सांगितलें आहे तेव्हां महाजनानीं धर्माविषयीं प्रवृत्त होऊन राजधर्माचा आश्रय केला आहे सर्वांचें हित करणारा असा कोणताही आचार प्रवृत्त होणार नाहीं कारण अनेक प्रकारचे आचार सर्वांस सांगितले आहेत तेव्हां पूर्वीं विद्वान पुरुषानीं जो मर्यादारूप आचार केला आहे त्याची कार्याकार्य व्यवस्था सांगावी- असा विषय या अध्यायांत आहे.

८८. अध्याय अठ्ठ्याऐंशी – भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं इतिहास सांगतो कोणी जाजलिया नामाचा ब्राम्हण होता त्यानें समुद्रांत राहून बहुत वर्षें तप केलें त्या योगानें त्यास सिद्धि झाली कोणी एके वेळीं तो अरण्यांत राहाणारा असून मस्तकीं जटा धारण करणारा व कृष्णाजीनें अंगावर घेऊन मनोवेगानें स्वर्गांतील लोक पाहावे म्हणून निघाला आणि समुद्रासहित सर्व पृथिवी पाहून आपले पूर्वींचे स्थानीं आला आणि म्हणाला कीं, त्यालोकामध्यें माझ्या सारिखा कोणीयेक नाहीं असें भाषण उदकामध्येंच वारंवार बोलूं लागला तें त्याचें भाषण पिशाच्यानीं ऐकून ते त्यास म्हणतात कीं, तुझ्यापेक्षां कांहीं अधिक तुलाधार म्हणून काशी क्षेत्रांत राहणारा वैश्य आहे असें ऐकतांच तो जाजलि मुनि तेथून निघोन काशी क्षेत्रांत तुलाधाराच्या

समीप आला. धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, आजन्मीच जाजलि मुनीस सिद्धि प्राप्त झाली असें कर्म त्यानें कोणतें केलें भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्यानें अत्यंत घोर तप केलें तें तुम्हांस सांगतों अग्नीची सेवा, वेदपठण, उदकांत उभें राहून जप, वायु व उष्ण यांचें सहन, भूमीवर निद्रा, वायूचें भक्षण, इत्यादि प्रकारानीं तप करीत असतां तो पाषाणा सारिखा एके जागीं स्थिरत्व पावून बसला तों त्याच्या मस्तकीं जटावर कुलिंग पक्ष्यानीं तृण व तंतू आणून राहावयास स्थान केलें नंतर स्त्री व पुरुष दोघे पक्षी यानीं त्यास्थानीं अंडें घातलीं कांहीं दिवसानीं तीं पुष्ट झालेलीं अंडें त्यांपासून लहान पक्षी उत्पन्न होऊन कांहीं दिवसानीं तीं थोर झालीं हें पाहून जाजलीस आश्चर्य वाटलें आणि तो म्हणाला कीं एक्या जाग्या वरून मी बहुत दिवस चळून पावलों नाहीं तेव्हां मी सिद्ध झालों असा अभिमान त्यास झाला नंतर ते पक्षी निघून गेले असें पाहून जाजलीनें उठून नदी वर स्नान केलें आणि अग्नि सेवा करून त्यानें सूर्योपस्थान केलें नंतर तो म्हणतो कीं मला धर्म घडला आहे असें त्यानें बोलून आपले बाहु थोपटले इतक्यांत आकाशवाणी झाली कीं हे जाजले, काशी क्षेत्रांत तुलाधार यानावाचा वैश्य आहे त्यासही तुझ्या सारिखा अभिमान झाला नाहीं तूं जसें बोलतोस असें तोही बोल्याविषयीं समर्थ होत नाहीं असें ऐकतांच क्रोधानें जाजली तेथून वाराणशी नगरीस येऊन त्यानें तुलाधारास पाहिलें नंतर तुलाधार त्याची पूजा करून म्हणतो हे ब्राम्हणा, तूं कोणत्या कारणानें आलास हें सर्व मी सांगतों तुझीं समुद्रा समीप जल प्रदेशांत राहून मोठें तप केलें त्या योगानें तुम्हांस सिद्धि प्राप्त झाली आणि तुमच्या मस्तकावर जटांत कुलिंग पक्षी गृह करून राहिले होते त्यांच्या अंडांतून लहान पक्षी झाले त्यास पक्ष उत्पन्न होऊन ते निघोन गेल्यावर तुम्हांस अभिमान झाला नंतर आकाशवाणी झाली ती ऐकून तुम्हीं माझ्या समीप आला आहां आतां प्रियकरणें मी कोणतें असेल तें बोलावें. असा विषय या अध्यायांत आहे.

२९. अध्याय एकुणनव्वद :— भीष्म सांगतात. हे धर्मराजा, तो जाजली ब्रम्हण तुळाधारानें भाषण ऐकून त्यास प्रश्न करितो हे तुलाधारा, तूं उत्त-

दि सर्व रस, कस्तूरी इत्यादिक गंध, वनस्पतिचीं काष्ठें, औषधी, मुळें व फळें, इत्यादिकांचा विक्रय करून निर्वाह करणारा असून तुला सर्व लोकांतील वर्तमान बसले ठिकाणीं कळतें यास्तव ही बुद्धि कोठून आली हें सांग. असें ऐकून तुलाधार सांगतो हे जाजले सर्व भूतांशीं द्रोह न करणें हा श्रेष्ठ धर्म याचा स्वीकार मी केला आहे काष्ठ व तृणादिकांनीं गृह बांधून मद्य वर्ज्य करून सर्व रसादिक दुसऱ्यापासून विकत घेऊन मी विक्रय करितों. कर्मे मन आणि वाणी इत्यादिकांनीं लोकांचें हित करून द्वेष, निंदा, प्रशंसा, कठोर भाषण, भय, इत्यादिक मी न करितां सर्वभूतीं तुला म्हणजे समान राहणारा आहें म्हणून मला तुलाधार असें बोलतात जो पुरुष अंतर्यामी सर्व विषय वासना रहित झाला तो ब्रह्मास पावतो या कारणास्तव सर्व भूतांचें कल्याण असावें अशी इच्छा करणाऱ्या पुरुषास धर्म घडतो व दान ही त्यासच घडतें आतां पशु हिंसा ज्या कर्माचे ठायीं होते तो अधर्म जाणावा तसाच पृथ्वी व वृषभ यांस पीडा करून शेतें करितात त्यांस ही अधर्म घडतो कारण प्राण्यांची हिंसा होते यास्तव सूक्ष्म धर्म पाहाणें हें दुर्बोध आहे यास्तव सर्वभूतांचें अभय इच्छिणारा पुरुष धर्मज्ञ आहे म्हणून त्या पुरुषानें धर्म केला अशी विचारवंत त्याची प्रशंसा करितात असा विषय या अध्यायांत आहे.

९०. अध्याय नव्वद :— जाजलि प्रश्न करितो. हे तुलाधारा, कृष्यादिक कर्मानें पशु व औषधी व अन्नादिकांनीं प्राण्यांची उपजीविका होते व त्यापासून यज्ञ होतात तेव्हां तुझें हे सांगणे नास्तिकपणाचें आहे कारण तुझी ही उपजीविका कृष्यापासून होते यास्तव कृष्य कर्माची तूं निंदा केल्यानें हा लोक ही नाश पावेल. असें ऐकून तुलाधार सांगतो हे जाजले ऋषे, माझें भाषण नास्तिकपणाचें नाहीं व यज्ञाची निंदा ही मी करीत नाहीं ब्रह्मवेत्ते यांचा यज्ञ मी तुला सांगतों ब्रह्माग्नीचे ठायीं जीव हा हवि याचा त्याग करणें त्यास योग म्हणावा त्याला माझा नमस्कार असो अशा प्रकारचा योग यज्ञ ब्राह्मणांनीं टाकून ज्यां मध्यें हिंसा आहे ते ज्योतिष्टोमादि यज्ञ करण्याविषयीं प्रवृत्त होतात कारण वेदामध्यें अर्थवादस्तुति मात्र असल्या-

चा आहे असें न जाणून नास्तिक जे ब्राम्हण इत्यादिकांच्या इच्छेनें केवल कर्मोनुशासन करण्याविषयींच तत्पर होतात म्हणून हे जाजलिऋषे, त्या अज्ञान्याची मी निंदा केली आतां ब्राह्मण यज्ञ जो आहे तो तुला सांगतों. नमस्कार, वेदपठण, व्रीही व यवादिक यांचा पुरोडाशाचें देवतांच्या उद्देशानें हवनकरणें, देव पूजा, इत्यादिकानीं केलेला यज्ञ सात्विक जाणावा त्याच यज्ञानें वृष्टि होते त्यापासून अन्न, अन्नापासून प्रजा उत्पन्न होतात या प्रमाणें श्रुतींत व मनुस्मृतींत ही सांगितलें आहे तस्मात् उत्तम पुरुष या अनुष्ठानानेंच सर्व मनोरथास पावले या प्रकारची बहुत भाषणें ऐकून जाजलि प्रश्न करितो हे तुलाधारा, तुम्हीं सांगितलें या वरून माझे मनाची शांतता झाली आतां कोणत्या यज्ञकर्मानें विष्णु तृप्त होतो तें सांगा असें ऐकून तुलाधार सांगतो हे जाजले, दांभिकपणानें कोणताही यज्ञ करूनयेकोणी करतील तर तो अधःज्ञरूप होईल आतां सात्विक यज्ञ तुला सांगतों. आज्य, पय, दधि, पूर्णाहुती, पितृतर्पण, गोशृंगानें अभिषेकादिक करणे, ब्रम्ह यज्ञ, गोस्पर्श, इत्यादि कर्मानीं केलेल्या यज्ञास सात्विक यज्ञ म्हणावा तो केला असतां विष्णु संतोष पावतो व अशा धर्मानें आचरण करणारा पुरुष उत्तम लोकास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

९१. अध्याय एक्याण्णव.— तुलाधार सांगतो हे जाजलिऋषे, श्रुतीस विरोध न येणारा आणि हिंसा रहित अशा धर्माचें उत्तम पुरुष सेवन करितात त्या मार्गाचें तूं सेवन कर म्हणजे प्रत्यक्ष अनुभव जाणशील. आतां तुझ्या मस्तकावर उत्पन्न झालले पक्षी हे प्रत्यक्ष च हुंकडे संचार करीत आहेत यांस तूं बोलावून आण म्हणजे तुला बाप म्हणून ते भावना करीतील ते. व्हां निःसंशय तूं पिता व ते पुत्र होत. असें ऐकून त्या जाजलिमुनीनें त्या पक्ष्यांस बोलावितांच ते जवळ येऊन बोलतात हे बापा, हिंसा रहित धर्म उत्तम असून त्या धर्मास श्रद्धेनें न सेवन करणारा पुरुष नाश पावतो जे पुरुष श्रद्धेनें अभिमान टाकून फलांची इच्छा न करितां यज्ञ करितात तो यज्ञ श्रद्धारूप होतो कारण श्रद्धाही सत्वगुणाची कन्या म्हणून तिला सात्विकी असें म्हणतात आणि ती पाळन करणारी व विशुद्ध जन्म देणारी आहे यास्तव

निरूपक स्वरूप पुरुष झाला म्हणजे त्यास आत्मज्ञान भास होतें तेव्हां श्रद्धा-रहित पुरुषाचें सर्व कर्म व्यर्थ होतें म्हणून साधूनीं जो धर्म सांगितला तो प्रमाण मानून आम्हीं धर्म जाणावा या हेतूनें यास्थानीं भास झालें तस्मात् तूं श्रद्धेचें सेवन करावें म्हणजे ब्रम्हस्वरूपास पावशील. भीष्म सांगतात् हे धर्मराजा, तुलाधार आणि तो जाजलि ऋषी हे दोघे योगैश्वर्य सामर्थ्यानें स्वर्गीं वास करावया करितां गेले. असें तुलाधाराचें भाषण ऐकून तो जाजलिऋषी शांतीपावला. असा विषय या अध्यायांत आहे.

९२. अध्याय ब्याण्णव.—भीष्म सांगतात हे धर्मराजा, विचख्नु राजानें प्रजेच्या हितार्थ जें भाषण केलें तें तुला सांगतों एके दिवशीं यज्ञमंडपामध्यें वृषभास मारलेला आणि गाई विलाप करितात असें पाहून तो राजा बोलतो आजपासून त्या लोकांचे ठायीं गायींचें कल्याण असो हिंसा करण्यास प्रवृत्त झालेल्या पुरुषानीं हें अभय वचन माझें श्रवण करून हिंसा करूं नये, मर्यादा सोडून वागणारे नास्तिक याणी हा स्वधर्म हिंसात्मक खरा म्हणून यज्ञामध्यें पशुहिंसा श्रेष्ठ केली आहे परंतु त्यानीं ब्राम्हण यज्ञ जाणिला नाहीं यास्तव ते मूढपणानें पशूंची हिंसा करितात केवल कामाच्या इच्छेनें करतील तर हें योग्य नव्हे म्हणून मनुनें ही सांगितलें आहे तस्मात् सर्वभूतीं अहिंसारूप हा मुख्य सूक्ष्म धर्म सांगितला आहे तो न करितां मांस, मद्य, तिलमिश्रित अन्न, यांचें भक्षण ब्राम्हणानें करूं नये. म्हणून श्रुतींत सांगितलें असतां भक्षण करितात. ते त्या दोषानें लिप्त होऊन त्या लोकीं दुःख पावतात. या कारणास्तव विष्णु संतोष पावणारा यज्ञ पायसादि द्रव्यानीं करणारे पुरुष उभयलोकीं सुख पावतात म्हणून हिंसात्मक यज्ञ पुरुषानीं करूं नये. असा विषय या अध्यायांत आहे.

९३. अध्याय त्र्याण्णव.—धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, पुरुषानें कोणतेंही कर्म विचार करून शीघ्र करावें किंवा चिरकालानें केलें असतां तें दोषरूपी अथवा निर्दोषरूपी होतें हें सांगा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं इतिहास सांगतों गौतम ऋषीचा पुत्र चिरकारी या नामाचा होता

त्यानें जागरण, निद्रा, अर्थ संपादन, इत्यादि सर्व कार्यें चिरकालानें करावीं. या हेतुनें त्याचें नाम चिरकारी असें पडलें त्या पुत्रास गौतम ऋषिनीं सांगीतलें कीं, मातेला व्यभिचार दोष घडला आहे यास्तव जिवें मारावी तुझे दुसरे बंधू आहेत त्यांस न सांगतां तुलाच सांगितलें आहे तरी हें कार्य तूं अवश्य करावें असें बोलून गौतम ऋषी वनास गेले नंतर चिरकारी बापाची आज्ञा ऐकून आपले ठिकाणी विचार करितो कीं, पित्याची आज्ञा अधिक मानून मातेचा वध करावा हें प्रशस्त आहे असें म्हणावें तरी मातेचा वध केलेला पुरुष कोणताही सुखी होणार नाहीं या प्रकारें करून पिता अधिक कीं माता अधिक यांत कोणतें केल्यानें सुख होईल अशा रीतीनें धर्मशास्त्राचा प्रकार बहुत विचारानें पाहात असतां त्यास बहुत दिवस गेले तों गौतम ऋषी आश्रमास आले आणि आपली स्त्री आहिल्या तिजला पाहून पश्चात्तापानें गौतम बोलतात कीं अरे माझ्या स्त्रियेचें उत्तम स्वरूप पाहून इंद्रानें अतिथि ब्राह्मणाचा वेष धारण केला. आणि माझ्या आश्रमीं येऊन कपट भावानें माझी स्त्री अनुकूल नसतां बलात्कारानें त्यानें संग केला. तेव्हां हा दोष माझ्या स्त्रियेकडे कांहीं दिसत नाहीं असें गौतमऋषी बोलून चिरकारी पुत्रास म्हणतात कीं हे पुत्रा, तूं धन्य आहेस विचार पूर्वक चिरकालानें कर्म करितोस हा गुण तुझ्या मध्यें थोर आहे कारण विद्वान पुरुष विचार केल्याशिवाय कोणतेंही कर्म करण्याविषयीं प्रवृत्त होत नाहींत तस्मात् तूं माझ्या पुत्रांत श्रेष्ठ आहेस आणि तुझें निरंतर कल्याण असो असें गौतमऋषीनीं बहुत बोलून आपल्या स्त्रियेस शाप दिल्हा नंतर ती पाषाण भूत झाली अशी कथा पुराणांतरींही विख्यात आहे नंतर गौतमऋषी बहुत वर्षें त्या आश्रमीं वास करून पुत्रा सहित स्वर्गास गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

९४. अध्याय चवऱ्याण्णव:— धर्मराज प्रश्न करितात. हे भीष्मा, कोणाचाही घात न करणारा राजा प्रजेचें रक्षण कोणत्या कारणानें कसें करितो हें सांगा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं द्युमत्सेनाचा आणि सत्यवान् राजाचा संवाद तुला सांगतों. द्युमत्सेन प्रश्न करितो हे सत्यवाना, को-

णाचाही वध करूं नये असा जर धर्म आहे तर चोरांसही मारूं नये असें झाल्यावर संकर दोष होईल आणि कलियुगीं तर लोकांचा निर्वाह होणार नाहीं यास्तव राजानें कसें वागावें हें सांगा. असें ऐकून सत्यवान राजा- सांगतो हे द्युमत्सेना, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, या तीन वर्णांनी ब्राम्हण, न्याय शास्त्रादिकांत पाहून जें सांगतील तसें करावें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें जो राजा न करील तो त्या पाप दोषानें लिप्त होईल यास्तव कोणी एकानें स्त्री व माता व पिता इत्यादिकांत एकाचा वध केला तेव्हां त्या चोराचा वध करणे तर राजानें ब्राम्हणाच्या आज्ञेनें त्यास वधाची शिक्षा करावी परंतु त्या चोराच्या बायका व मुलांस मारूं नये व त्याच्या वृत्तीचा लोप करूं नये जे कोणी शरण येऊन बोलतील कीं आम्ही पुनः पापकर्म करणार नाहीं तरी चोरांस मुक्त करावें. आतां कोणी राजे प्रजा निर्दोष असाव्यात म्हणून तपस्वी होतात मग त्याच्या राज्यांत प्रजाही उत्तम स्वभावानें राहतात तेव्हां पुण्यें करूनच राजा प्रजेचें रक्षण करितो जसें श्रेष्ठ आचरण करितात तसेंच इतर मनुष्य आचरण करितात आतां राजानें प्रथम आपलें चित्त जिंकून नंतर प्रजेला शासन करावें म्हणजे राजाची उपहास्यता न करितां प्रजा राजाची आज्ञा पालन करितात. या प्रकारें बहुत सांगून ब्रह्मप्राप्ती विषयीं अहिंसा धर्म सेवन केल्यानें पुरुषास ज्ञान होतें म्हणून मनु बोलतात. असा विषय या अध्यायांत आहे.

९५. अध्याय पंचाणणव :— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, राजानें हिंसारहित धर्म योगाचें आचरण केलें असतां ऐश्वर्यादि साहा गुण व उत्सत्यादि ही दोन्ही त्यास देणारा तो धर्म होतो किंवा कसें व गृहस्थास आश्रमधर्म आणि योगधर्म या दोहोंत श्रेयस्कर धर्म कोणता आहे हें सांगा असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, गृहस्थास दोन्ही धर्म महाफल देणारे आहेत या विषयीं कपिल मुनीचा व गाईचा संवाद सांगतों. पूर्वी नहुषानें गाय मारण्याविषयीं आणलेली कपील मुनीनें पाहून तो बोलतो हे गो, तुला कोणत्या कारणानें आणली तें हें भिन्न रूप आहे, असें ऐकून तेथें स्यूमरश्मी या नावाचा ऋषी होता तो योग सामर्थ्यानें गायीच्या देहांत

प्रवेश करून त्या कपिल मुनीस बोलतो. वेदांनीं सांगितलेल्या धर्मांत कोणी हिंसा करावी व न करावी असें बोलतात तेव्हां कर्म कांड व ज्ञानकांड इत्यादिकांत प्रमाण कोणतें करावें म्हणून सांगितलें आहे हें सांगा. असें ऐकून कपिल मुनी सांगतो हे स्यूमरश्मी, मी वेदांची निंदा करीत नाहीं चार आश्रमीं जे आहेत त्यांस गती कश्या होतात त्या सांगतो. संन्यासी मोक्षास, वानप्रस्थ ब्रम्हलोकीं, गृहस्थ स्वर्गलोकीं ब्रम्हचारी, ऋषिलोकींपावतो यास्तव स्वर्गादिकांच्या प्राप्ती विषयीं कामयुक्त पुरुषानीं यज्ञादिक कर्में करावीं असें हें वैदिक मत आहे परंतु ज्ञानाविषयींचा अधिकार त्यास आला नाहीं तेव्हां श्रद्धा व्हावी यास्तव आश्रम धर्म यानीं करावा तोयज्ञादिकांनीं कसा करावा हें सांगा. असें ऐकून स्यूमरश्मि ऋषी सांगतो हे कपिल मुने, स्वर्ग काम मीयजन करितों अशा फलांचा संकल्प करून यज्ञास आरंभ करावा. अज, अश्व, मेष, गो, पक्षिगण, सिव्ह, व्याघ्र, वराह, महिष, गज, ऋक्ष, वानर, हे पशू व पुरुष पशु उत्तम आहे म्हणून ब्रम्हदेवादिकांनींही प्रशंसा केली आहे यास्तव हें अन्न असें श्रुतींत सांगितलें आहे आतां ओषधी, पशू इत्यादि द्वादश, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यजमान, अग्नि, हीं सतरा अंगें यज्ञाचीं श्रुतींत सांगितलीं, तेव्हां ऋत्विगादिकाशीं सहित सर्व प्रकारांनीं युक्त यज्ञ पुरुषानीं करावा. आतां पशुहिंसारहित यज्ञ ब्रम्हार्पण विधीं युक्त सांगितला आहे तो करावा. तात्पर्य यज्ञ केल्यावांचून स्वर्ग प्राप्ती व पर्जन्यादिक हीं फलें प्राप्त होत नाहींत यास्तव यज्ञ न करणाऱ्या पुरुषास हा व परलोकही नाहीं म्हणून यास वेद प्रमाण भूत आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

९६. अध्याय शाण्णव :— कपिल मुनी सांगतात हे स्यूमरश्मि, यम नियमादि साधनानीं युक्त पुरुषांस ज्ञान उत्पन्न होतें मग ते त्याज्ञानाश्रयानें शोकादिरहित होऊन त्यालोकीं ब्रम्हस्वरूपाचा अनुभव त्यांस होतो तेव्हां पुरुषानीं स्वर्ग काम रूप कर्म करण्याचें प्रयोजन नाहीं. असें ऐकून स्यूमरश्मि बोलतो हे कपिल मुने, गृहस्थाश्रम करणाऱ्या पुरुषांच्या हातून इतर आश्रमीं व इतर सर्व इत्यादिकांचें जसें मातेच्या आ-

श्रयानें सर्व प्राणी आनंदरूप जीवन पावतात तसें गृहस्थाश्रम करणा
ऱ्या पुरुषाच्या आश्रयानें इतर आश्रमी व अन्य हे सर्व जीवन पावतात.
यास्तव गृहस्थाश्रम केल्याशिवाय मोक्ष होत नाहीं. आतां ज्यांत अंध,
बधिर, पंगू इत्यादि दोषानीं युक्त आहेत त्यांस स्वकर्म करण्याची शक्ती
च नाहीं त्यानीं ज्ञामादि साधनें करावीं यास्तव गृहस्थ ऋणत्रया पासून
मुक्त होऊन मोक्षास पावतो. असें ऐकून कपिलमुनी बोलतात हे स्यूमर-
श्मि, गृहस्थानें दर्श, पौर्णमास, अग्निहोत्र, चातुर्मास्य पर्यंत कर्मे करावीं
परंतु पशुहिंसा करूं नये तर तो मोक्षाधिकारी होतो यास्तव असे ब्रम्हज्ञा
णणारे पुरुष स्वइच्छे करून ब्रम्हलोकादि सर्व लोकांचा अनुभव घेतात
तसे कर्म फलाची इच्छा करणारे पुरुष काम व क्रोध इत्यादिकांनीं युक्त हो
ऊन विचार रहित असल्या मुळें जन्मजन्माचे ठायीं दुःख पावतात. अ-
सें ऐकून स्यूमरश्मि प्रश्न करितात हे कपिलमुने, मी आत्मज्ञान जाणण्या
करितां तुम्हांस शरण आलों तरी मला तुम्हीं कल्याण होणारा मार्ग सां-
गा. नंतर कपिलमुनी सांगतात हे स्यूमरश्मि, आत्मविचार अधिक आ-
हे यास्तव तो प्रपंच्यात असणाऱ्या गृहस्थास प्राप्त झाला म्हणून त्या
विचारवान पुरुषानें स्वाश्रम विहित कर्मांचा त्याग करूं नये तर निषि
द्ध व काम्य त्या कर्मांचा त्याग करून विहित कर्म करावें तें कर्म लोकसंग्र
हीं होतें यास्तव सर्व वेद व शास्त्रें यांचा निर्णय आहे कीं, आत्मज्ञान झा
ल्यानें पुरुषास मोक्ष होतो तेव्हां देहाच्या अनुलक्षानें वागणाऱ्या पुरुषा
स द्वेष, काम, क्रोध, दंभ, अनृत, मद, हे गुण नित्यनेमानें असतात त्या
मुळें तो हिंसादि कर्म करणारा होतो यास्तव त्यास मोक्ष धर्माची शास्त्रों-
ही मान्य होत नाहीं म्हणून त्याचें जन्म व्यर्थ होतें या साठीं यतन शी
ळ पुरुष जे आहेत ते मोक्षा विषयीं प्रयत्न करितात, असें ऐकून स्यूमर-
श्मी प्रश्न करितो हे कपिलमुनें पुरुषाने विवाह करून स्त्रीचा आश्रय
केला त्यानें पुत्रोत्पत्ति झाली नंतर दान, अध्ययन, यज्ञ. आर्जव हे धर्मपर-
म कष्टानें केले असतांही पुरुषास मोक्ष होत नाहीं तेव्हां कर्मकांड व्यर्थ नि
रर्थक आहे यास्तव मोक्षाची इच्छा आहे तरी तुम्हीं मला आत्मज्ञान सां-

गा. असा विषय या अध्यायांत आहे.

९७. अध्याय सत्याणव:— कपिलमुनी सांगतात हे स्यूमरश्मी, कर्म व उपासना कांडरूप जे शब्दब्रम्ह व ज्ञान कांडरूप परब्रह्म हीं दोन जाणा वीं आणि क्रोध, असूया, अहंकार, इत्यादिकांस सोडून कर्मयोग करणा न्या पुरुषानीं श्रवण, मनन, निदिध्यासन हीं ज्ञान प्राप्तीस कारणें आहेत असें जाणून ज्ञानाचे ठायीं निश्चय करावा त्या सांगितल्या प्रकारानें स्वक र्माचे ठायीं आदर करून जनकादिक राजे व याज्ञवल्क्यादि ब्राम्हण नि- रुपाधिक ब्रम्ह साक्षात्कारानें युक्त असून ते जीवन मुक्त होतात त्यांस क- र्मांचा बंधही नाहीं असे बहुत ब्राम्हण ज्ञान तपानें मुक्त झाले. कोणी गृ- हीं सदाचार संपन्न होऊन पश्चात् संन्यास घेऊन मुक्तीस पावतात त स्मात् सर्व शास्त्राचे ठायीं निष्ठा आहे ती सांगतो. क्षेत्र, आराम, गृह, प शु, पत्नी, पुत्र, शरीर, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि, अहंकार इत्यादिकांचा त्या- ग निर्विकल्प समाधीचे ठायीं होतो तेव्हां निर्विकल्प समाधी ही श्रेष्ठ आहे असें सर्व वेदांचें अर्थ तात्पर्य आहे तसें शास्त्रें, पुराणें यांचे ठायीं हाच नि- श्चय आहे या कारणास्तव जें ब्रम्ह सर्व सत्तात्मक, शिव, शांत, सत्य, अ- द्वैत, तुरीय, सर्वोत्कृष्ट, आकाशा सारिखें व्यापक सूक्ष्म प्रकाशरूप, इत्या दि सर्व विशेषणानीं जाणून ज्या ब्रम्हास योगी बुद्धी चक्षूनीं प्रत्यक्ष पा- हातात त्या ब्रम्हास मी नमस्कार करितों म्हणून कपिल मुनीनें नमस्कार केला आणि त्यानीं स्यूमरश्मी ऋषीस ही बोध सांगून कृतार्थ केला. असा विषय या अध्यायांत आहे.

९८. अध्याय अठ्याण्णव:— धर्मराज प्रश्न करितात. हे भीष्मा, मनुष्यां चें कल्याण व्हावें म्हणून वेदानीं धर्म, अर्थ, काम, हे सांगितले त्यांत कोणतें केल्यानें मनुष्यास विशेष लाभ होतो हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं इतिहास सांगतों. कोणी एक दरिद्री ब्राम्हण हो- ता त्यानें द्रव्याच्या अर्थास्तव धर्माचें सेवन करून तप केलें नंतर त्यानें देवांची पूजा भक्तीनें केली असतां त्या देवांपासून त्यास द्रव्य मिळालें ना- हीं तेव्हां देवांचा सेवक मेघरूपी कुंडधार यानामाचा होता त्यास ब्रा-

म्हणानें पाहिला आणि हा मला द्रव्य देईल म्हणून भक्तीनें त्याची षो-
डशोपचारानीं पूजा केली नंतर अल्पकालांत तो कुंडधार प्रसन्न होऊ
न ब्राम्हणास बोलतो हे ब्राम्हणा, इतर पापांस प्रायश्चित्तें आहेत परं-
तु कृतघ्न पुरुषानें पाप दूर होण्यास प्रायश्चित्त नाहीं असें सांगून त्या
कुंडधारानें ब्राम्हणास दर्भांवर निजविला नंतर त्या ब्राम्हणानें रात्रीस्व
प्नांत सर्व भूतें पाहून आणि मणिभद्रास पाहिले नंतर तो कुंडधारम
णिभद्राजवळ बोलतो कीं, तुम्हीं या ब्राम्हणास रत्नादि बहुद्रव्य द्यावें.
तें ऐकून मणिभद्र म्हणतो हे कुंडधारा, तुझ्या आज्ञेनें यथेच्छ द्रव्य ब्रा
म्हणास मी देतों परंतु पूर्वीं द्रव्यवान राजे झाले त्यांस स्वर्गीं नरकवा-
सादि दुःखें झालीं हीं पाहावीं तों इतक्यांत ब्राम्हण जागा झाला आ-
णि कुंडधारास बोलतो कीं हे कुंडधारा, या प्रकारें मला स्वप्न पडलें नंत
र कुंडधार म्हणतो हे ब्राम्हणा, तुला मी दिव्यचक्षू देतों त्यानें तूं राजां-
चीगती पाहा मग तो ब्राम्हण त्यानें दिलेल्या दिव्य चक्षूनें सहस्त्रावधी
राजे नरकीं वास करणारे आहेत असे त्यांतें पाहून ब्राम्हण कुंडधारास
बोलतो कीं मला आतां द्रव्यादिकांची इच्छा कांहीं नाहीं असें म्हणतांच
कुंडधारानें ब्राम्हणास आलिंगन देऊन तो कुंडधार गुप्त झाला नंतर कुं-
डधाराच्या प्रसादानें त्या ब्राम्हणास आकाश गमनादि सिद्धि व संकल्पि
त सिद्धि प्राप्त झाल्या. भीष्म सांगतात हे धर्मराजा, मग तो ब्राम्हण
आकाश मार्गानें सर्व लोकांस पाहून सुखी झाला. असा विषय या अध्या
यांत आहे.

९९. अध्याय नव्याण्णव.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, पुरुषा
नें सुख, स्वर्ग, धन, यांच्या प्राप्ती विषयीं हिंसा प्रधान यज्ञ दोषरूपी
असल्यामुळें तो न करून त्यानें ईश्वर प्रीत्यर्थ यज्ञ कोणत्या प्रकारानें
करावा हें सांगा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं विदर्भ देशीं
राहणारा कोणी एक ब्राम्हण होता त्यानें यज्ञ केल्याची कथा नारदानीं
मला सांगितली आहे ती हे राजा तुला सांगतों. उंछवृत्तीनें निर्वाह करणा
रा जो कोणी एक ब्राम्हण होता त्याची भार्या पुष्करधारिणी या नामें—

प्रख्यात असून ती मयूर पिच्छांचें वस्त्र करून परिधान करीत होती तेव्हां तिच्या मनात आलें कीं, हिंसा प्रधान यज्ञ करावा; परंतु पतीशाप देईल या भयानें कांहींएक बोलली नाहीं तेव्हां उंच्छ वृत्ती ऋषीनें श्यामाकधान्य, सूर्यपर्णी, सुवर्चला, त्या शाका व मूलें, फलें इत्यादिकांचा चरु व पुरोडाशादिक करून त्या द्रव्यानीं यज्ञ केला तेणेंकरून देव संतोष पावले; परंतु त्या ऋषिची स्त्री होती तिच्या मनाची शंका पतीनें हिंसा रहित यज्ञ केला या विषयींची होती ती दूर झाली नाहीं तेव्हां साक्षात् धर्म, मूर्तीमान उत्पन्न होऊन तिला सांगतात हे स्त्रिये अहिंसाप्रधान यज्ञ श्रेष्ठ आहे तसा हिंसारूप धर्म कांहीं श्रेष्ठ नाहीं हें माझें भाषण सत्य आहे असें तूं जाण व सत्यवादी ऋषीही या प्रमाणें बोलतात असें धर्माचें भाषण ऐकून ती स्त्री संतोष पावली. असा विषय या अध्यायांत आहे.

१००. अध्याय शंभर :— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, पुरुष पापात्मा कसा होतो व धर्मात्मा होऊन धर्म कसा करितो तसेंच कोणते कारणानें वैराग्य गृहण करितो आणि मोक्षास कसा पावतो हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, पूर्वी शब्दादि पंच विषयांचें सेवना विषयीं इच्छा होते नंतर त्या योगानें पुरुषास काम व द्वेष होतात मग तो काम पूर्ण व्हावा म्हणून पुरुष कर्मास आरंभ करितो आणि पुनः पुनः विषयांचे सेवन करितो त्यापासून त्यास प्रीति उत्पन्न होते नंतर द्वेष, लोभ, मोह, यांचा स्वीकार केल्यानें त्या अज्ञ पुरुषास धर्म बुद्धि उत्पन्न होत नाहीं. धर्म व अर्थ हे कपट भावानें करून द्रव्य संपादन करितो मग द्रव्य मिळालें म्हणजे तो पुरुष पापबुद्धीनें विषय लंपट होतो मग मित्रानीं व कोणी पंडितानीं चांगलें सांगितलें असतां त्यास क्रोध येतो परंतु साधू जे आहेत ते त्या पुरुषाची अधर्माविषयीं प्रवृत्ति पाहून हा पुरुष दोष करणारा आहे असें पाहातात. आतां पापकर्मी पुरुष जे आहेत ते त्या पापी पुरुषासीं मित्रत्वानें भजतात तेव्हां त्या पापी पुरुषास त्या लोकीं व परलोकीं सुख होत नाहीं तो पुरुष पापात्मा जाणा

वा आतां धर्मात्मा पुरुष पुण्यकर्म केल्यानें तो उत्तम गतीस पावतो व धन, मित्र, इत्यादिक त्याच्या उत्तम आचारानें त्याला प्राप्त होतात मग तो पुरुष ज्ञानचक्षूनें वैराग्य धारण करितो नंतर तो धर्मात्मा होऊन मोक्षास जातो यास्तव धर्माचे ठायीं राहणाऱ्या पुरुषांस शाश्वत सिद्धि होते. असा विषय या अध्यायांत आहे.

१०१. अध्याय एकशेएक.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, तुम्हीं उपाय सहित मोक्ष सांगितला परंतु यथान्यायानें तो उपाय श्रवण करण्याची मी इच्छा करितों तर सांग. असें एकून भीष्म सांगतो हे धर्मराजा, घट करणें आहे तेव्हां जी बुद्धि पूर्वी असते तीच बुद्धि घट उत्पन्न झाल्यावर नसते पुरुषाची प्रवृत्ति धर्मी पूर्वी बुद्धि असते तीच बुद्धि निवृत्ति धर्म सेवन केल्यावर नसते. आतां मोक्षाविषयीं उपाय दोन प्रकारचा आहे त्यांत एक प्रवृत्तिरूप व निवृत्तीरूप तेव्हां प्रवृत्तिरूप यागादि धर्म निष्काम बुद्धीनें केला असतां तोच चित्तशुद्धि द्वारा निवृत्तिरूप होतो याहून अन्य कारण नाहीं पुरुष पूर्वसमुद्रास ज्या मार्गानें गेला तो पश्चिम समुद्रास पोंचणार नाहीं तसा मोक्षाचा मार्ग एकच आहे त्या मार्गी जो लागला तो मोक्षासच जातो तो मोक्ष मार्ग तुला विस्तारानं सांगतो. पुरुषानें क्षमा धारण केल्यानें क्रोधाचा नाश होतो, संकल्प वर्ज केल्यानें कामाचा नाश, सत्वगुणाच्या सेवनानें निद्रेचा नाश. सावधपणानें भयाचा नाश, मनाच्या योगानें प्राणचेष्टा दूर होते, इच्छा, द्वेष, काम यांचा नाश पुरुषानें धैर्यानें करावा, भ्रम व अज्ञान त्याचरूपानें अनेक कोटि संशय होतो तो अभ्यासानें दूर करावा, निद्रा व अन्याचें अनुसंधान हीं ज्ञानाभ्यासानें दूर करावींत, उपद्रव व रोग हे अल्पभक्षानें, लोभ व मोह हे संतोषानें, विषय तत्वदर्शनानें, कृपेनें, अधर्मास जिंकावें या प्रमाणें कामक्रोध, लोभ, भय, स्वप्न, हीं योग साधनानें दूर करावींत आतां ध्यान, अध्ययन इत्यादिक धारण केल्यानें पुरुषाचें तेज वाढतें तात्पर्य काम व क्रोध हे ज्या पुरुषानें वश केले तो ब्रम्हपदास पावतो या प्रकारानीं हा मोक्षमार्ग तुला सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

१०२. अध्याय एकशेदोन.—भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं नारदा-

चा आणि देवलाचा संवाद तुला सांगतों. नारद प्रश्न करितात हे असितऋषे, हें विश्व कोठून झालें आणि प्रलयकालीं कोठें लय पावतें हें सांगा. असें ऐकून असित सांगतात हे नारदऋषे, परमात्मा पंचमहाभूतांस उत्पन्न करितो त्या आकाशादि पंचमहाभूतांपासून जरायुजादि भूतें उत्पन्न होतात वास्तव हे जीवास सुखदुःखाहा भाव अचल आणि ध्रुव आहे तउदक, आकाश, पृथिवी, वायु, अग्नि, सर्वसंस्काररूप भाव, अज्ञान, जीव, हीं अष्ट भूतें स्थावर व जंगमात्मक भूतांस उत्पत्ति व लय होण्याचीं स्थानें आहेत आतां पुरुषाचा देह, भूमीपासून, आकाशापासून श्रोत्र, सूर्यापासून चक्षु, वायुपासून प्राण, उदकापासून रक्त होतें. चक्षु, नासिका, कर्ण, त्वक्, जिव्हा हीं पंच ज्ञानेंद्रियें, रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द, हे पंच विषय जाणावे त्या इंद्रियसमुदायांहून चित्त श्रेष्ठ, त्याहून मन, मनाहून बुद्धि श्रेष्ठ, बुद्धीहून परमात्मा श्रेष्ठ आहे. आतां पाणि, पाद, पायु, शिश्न, मुख, हीं पंच कर्मेंद्रियें त्यांत त्यानें मुखानें भाषण व भोजन हीं करावींत या प्रकारें सर्व इंद्रियांचे व्यापार सांगितल्या प्रमाणें करावेत यास जागृदवस्था म्हणावी तींच इंद्रियें कर्में केलीं त्या श्रमानें उपरम पावलीं म्हणजे पुरुष निद्रा करितो तेव्हां सुषुप्ति व स्वप्न ह्या दोन अवस्था, यांचे ठायीं जीव विश्रांतीस पावतो. तेव्हां सात्विक, राजस, तामस, हे भाव वासनारूप जागृदवस्थेच्या ठायीं प्रसिद्ध आहेत त्या कारणानें सुख, ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, हीं सात्विक पुरुषास स्मृति उत्पन्न होण्यास कारण आहेत त्या योगानें तो पुरुष स्वप्नीं सुखादि भावास स्मरतो ही स्वप्नावस्था आतां ज्या अवस्थेंत इंद्रियसमुदाय व अहंकारादिकांचा लय होतो ती सुषुप्ति अवस्था जाणावी. अशा तीन अवस्थांनीं युक्त जीवात्मा इंद्रियादिकांस सदश कलेकरून शरीराचे ठायीं राहातो म्हणून तो शाश्वत भोक्ता होतो नंतर कोणतेही निमित्त झाल्यावर त्याचा देह नाश पावतो पुनः तो जन्मास येतो म्हणून ज्ञानी पुरुष शोक करीत नाहींत अज्ञानी पुरुष देह व पुत्र इत्यादि संबंधानें शोकसागरांत बुडतात वास्तव जे पुरुष सांख्यज्ञानानें युक्त होतात ते उत्तम गतीस पावतात. अ० चि० या अध्यायांत आहे.

१०३. अध्याय एकवेंतीन.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, आम्हीं क्रूरबुद्धीनें राज्यादिकांची प्राप्ती व्हावी म्हणून बंधूव पुत्र इत्यादिकांस मारून पाप केलें तेव्हां त्यापासून आम्हीं मुक्त कोणत्या प्रकारानीं होऊं हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं जनकराजानें मांडव्य ऋषीस बोध केला आहे तो तुला सांगतों. जनकराजा बोलतो हे मांडव्या, मी समस्त विषय वासना त्याग केला यामुळें मला अत्यंत सुख झालें आतां स्त्रिया व पुत्रादिक जीं आहेत हीं माझीं कोणी नव्हेत. मिथिलानगरी अग्नीनें प्रदीप्त केली तरी माझें कांहींएक दहन होत नाहीं ब्रम्हलोक पर्यंत विषय जे संपन्न आहेत ते दुःखरूपी आहेत असें मी जाणतों व त्यालोकीं व परलोकीं जें मोठें सुख आहे तें सुख वासनाक्षय करणाऱ्या पुरुषाचे सुखाचे सोळावे कळेसही योग्य नाहीं आतां जसें वृषभाचें शिंग कालगतीनें वाढत वाढत जातें तसें द्रव्य मिळूं लागलें म्हणजे पुरुषाची वासना अधिक वाढत जाते त्यांलोकीं पुत्रादिकांवर ममत्व करणाऱ्या पुरुषांस जें सुख होतें तें त्यांचा नाश झाल्यानें परिणामीं दुःखास कारण होतें. तात्पर्य पुरुषाच्या अंतर्यामी वासना ज्या आहेत हा प्राणांतिक रोग आहे असें समजून त्यांचा त्याग केल्यानें उत्कृष्ट सुख पुरुषास होतें. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, अशा प्रकारचीं जनकराजाचीं भाषणें ऐकून तो मांडव्य ऋषी संतोष पावला आणि त्याणें मोक्ष धर्माचा आश्रय केला. अ. वि. या अ. आहे.

१०४. अध्याय एकशेंचार.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, मनुष्यांचें आयुष्य काल हरण करितो तेव्हां कोणत्या आश्रमीं पुरुष कल्याणपावतो हें सांगा. असें ऐकून भीष्म, पूर्वीचा घडलेला इतिहास सांगतात. हे धर्मराजा, कोणी एका ब्राम्हणाचा पुत्र मेधावी या नामाचा होता तो पित्यास प्रश्न करितो हे बापा, मनुष्यांचें आयुष्य शीघ्र नष्ट होतें तेव्हां अल्प आयुष्यांत मनुष्यानें कोणता धर्म आचरण करावा हें सांगा. असें ऐकून बाप सांगतो हे पुत्रा, पुरुषानें ब्रम्हचर्याश्रमीं वेदाध्ययन करावें नंतर गृहस्थाश्रम करावा त्यांत अग्नीची सेवा व पुत्र झाले म्हणजे त्यानें वानप्रस्थाश्रम करून पुढें सन्यास गृहण करावा. असें ऐकून पुत्र बोलतो हे बापा,

पुरुषानें चार आश्रम करावे असें तुम्ही सांगितलें; परंतु आयुष्याचा निय म नाहीं तरी तुम्हांस सांगतो हा लोक मृत्यूनें ग्रासिला आहे आणि जरेनें वे ष्टित असून अहोरात्री त्या मनुष्याचें आयुष्य हरण करितात हें तुम्हीं कां जाणत नाहीं? एकेक रात्र गेल्यानें मनुष्याचें आयुष्य अल्प होतें आणि उ- द्यां जें कार्य करावयाचें तें आज करितो इत्यादि प्रकारानें मनुष्य बोलतो परं तु मृत्यु कांहीं या मनुष्याचें कार्य झालें अथवा न झालें हें पाहात नाहींव कोणी पुरुष कोणी एकाचा मृत्युकाल आज होईल असें जाणत नाहीं. कोणी पुरुष हें कार्य मी अमुक दिवसानीं करीन असें म्हणत असतां तेदि वस झाले नाहींत तों त्यास मृत्यु हरण करितो तेव्हां जसा स्वस्थ पुरुष अ सतो या सारिखा तूं कसा राहतोस. तरी धन, बांधव, स्त्रिया इत्यादिकांचा उपयोग परिणामीं तुम्हांस काय होणार या प्रकारानीं पित्यास बहुत सां- गून पुत्र म्हणतो हे बापा. यास्तव या देहांत राहणारा परमात्मा आहे त्या च्या प्राप्ती विषयीं यत्न शास्त्रानें सांगितल्या प्रमाणें करून तुम्ही कृता- र्थ व्हावें भीष्म बोलतो हे धर्मराजा, पुत्राचें भाषण ऐकून पित्यानें त्या प्रमाणें केलें त सा तूंही आचरण करून सत्यधर्म परायण हो. अ. वि. या अ. आहे.

१०५. अध्याय एकशें पांच.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, चांग ला स्वभाव, आचार, ज्ञान, निष्ठारूप धर्म यांत कोणतें केल्यानें पुरुष परब्रह्मास पावतो हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, मो क्षधर्मी सक्त होऊन अध्यात्मज्ञानाचे ठायीं चांगला स्वभाव धरणारा पुरुष मोक्षास पावतो व अल्प आहार इंद्रियें जिंकणारा पुरुष तोही ज्ञा नानें मोक्षास पावतो आतां जो पुरुष सन्यास घेऊन आपले गृहांतून नि घोन जातो आणि तो सर्ववासना टाकणारा, चक्षु व मनवाणी इत्यादिकानीं दुसऱ्यावर दूषण न ठेवणारा, हिंसारहित, वैरशून्य अतिवाद रहित, अप्रि यभाषण न करणारा, लाभ व अलाभ यांविषयीं निरिच्छ असणारा, दुसऱ्या वर दोष न ठेवणारा, शुन्य गृह व वृक्ष अरण्यादिकांत राहणारा, नित्य व- स, प्रसन्न मुख, उदर व उपस्थ इत्यादिकांचा वेग सहन करणारा या प्रका रचे बहुत धर्म करणारो संन्यासी कृतार्थ होतो. भीष्म सांगतात हे धर्मरा-

जा, या प्रमाणें हारित् मुनीनें सांगितलेलें मी तुम्हांस सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०६. अध्याय एकशेंसाहा:— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, आम्हास सर्वजन बोलतात कीं पांडव धन्य धन्य आहेत; परंतु आमच्या सारिखा दुःखी पुरुष कोणी नाहीं कारण देवांचे अंश आम्हीं मनुष्य जन्मास येऊन दुःख पावलों तेव्हां आश्चर्य वाटतें यास्तव दुःखाचा नाश करणारा संन्यास आम्हांस कधीं घडेल आणि राज्य टाकून मुक्त कोणते काळीं होऊं हें सांगावें. असें ऐकून भिष्म सांगतात हे धर्मराजा, आत्मज्ञानी पुरुषास दुःख नाहींच कारण त्याच्या दुःखाचा नाश करणारा मोक्ष समर्थ आहे ज्यावेळीं प्राणी ज्ञानानें अज्ञानापासून उत्पन्न होणारे विपरीत ज्ञानास दूर करितो त्यावेळीं मनुष्यास ब्रम्ह प्रकाशित होतें या विषयीं शुक्राचार्य व वृत्रासुर दैत्य यांचा संवाद सांगतों. कोणे एके वेळीं शुक्राचार्य बोलतात. हे वृत्रासुरा, तूं ऐश्वर्यांतून भ्रष्ट होऊन पराजय पावला असतांही तुला व्यथा होत नाहीं याचें कारण सांग. असें ऐकून वृत्रासुर बोलतो हे शुक्राचार्या, सत्य व तप यांच्या सामर्थ्यानें संशय, जन्म, मरण, हीं मीं जाणतों काल वेगानें जीव नरकांत बुडत आहेत कारण सहस्रावधि जन्म नीच योनींत जीवास होतात तसे नरकांत गमन करतात पुढें सुखदुःखादि भोगून मनुष्य जन्मास कोणे एके वेळीं पावतात तात्पर्य कालानें हा सर्व लोक बांधला आहे. म्हणून जन्म व मरण यांच्या प्रवाहांत लोक सर्वकाळीं पडला आहे असें बहुत वृत्रासुराचें भाषण ऐकून शुक्राचार्य बोलतात हे वृत्रासुरा, तूंहीं परमार्थिक भाषणें करितोस परंतु दैत्य भावास नाश करणारीं अशीं भाषणें तूं दैत्य होऊन कशीं बोलतोस याचें कारण सांग. असें ऐकून वृत्रासुर सांगतो हे शुक्राचार्या, पूर्वीं मीं तप केलें हें तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलें ज्या तपसामर्थ्यानें तीन लोक जिंकून ऐश्वर्य मला प्राप्त झालें पुढें इंद्रासह वर्त्तमान युद्ध मी करीत असतां साक्षात् नारायण हरी ज्यास म्हणतात तो मी पाहिला यास्तव त्याचीं नामें तुम्हांस सांगतों ज्यास वैकुंठ, पुरुष, अनंत, विष्णु, मुंजकेश, हरिश्मश्रु, सर्वभूतपितामह, इत्यादिक अशीं ज्याचीं नामें आहेत तर आतां तुम्हांस मी प्रश्न करितों कीं ब्राह्मणधर्मी

उत्तम ऐश्वर्य असतां तें दूर कसें होतें व सर्व भूतांच्या अंतर्यामीं ईश्वर कोण त्या प्रकारानें व्यापक आहे हें मला सांगा. असा विषय या अध्यायांत आहे.

१०७. अध्याय एकशें सात.- शुक्राचार्य सांगतात हे वृत्रासुरा, ज्याचें त्रैलोक्य हें विराटरूप त्या विष्णूस मी नमस्कार करून त्याचें महात्म्य तुला सांगतों असें दोघे बोलत असतां तों इतक्यांत तेथें सनत्कुमार आले त्यांस आसनावर बसवून वृत्रासुरानें व शुक्राचार्यांनीं त्यांची पूजा केली नंतर शुक्राचार्य बोलतात अहो सनत्कुमार, त्या वृत्रासुराला विष्णूचें माहात्म्य सांगा. असें ऐकून सनत्कुमार सांगतात हे वृत्रासुरा, जसें सुवर्णीं अलंकार तसें विष्णूचे ठायीं हें सर्व जगस्थित आहे सर्व भूतांस उत्पन्न ह्या विष्णूच करितो व त्या सर्व भूतांचा लय त्याचे ठायींच होतो असें तूं जाण. तो भगवान् इतर ज्ञान, तप, इज्या, या साधनानीं प्रसन्न होत नाहीं जो कोणी मनुष्य इंद्रियांचा संयमनयोग करील त्यास भगवान् प्रसन्न होण्यास समर्थ होतो जसा स्वर्णकार, सुवर्ण अग्नींत तापवून निर्मल करितो तसा पुरुष अहिंसारूप यज्ञ आणि अभ्यंतरीं शांत, दांत, उपरत, समाहित, या गुणानीं निर्मल चित्त करितो तेव्हां तो पुरुष मोक्ष सुखाच्या अनुभवास शतावधि जन्म घेत असतां एकजन्मांतच शमादि साधनानीं शुद्ध होतो. आतां नारायणाचे पाद ही पृथ्वी तूं जाण. मस्तक स्वर्गलोक, बाहू दिशा, श्रोत्र आकाश, चक्षू सूर्य, मन चंद्रमा, बुद्धि महत्तत्व, रसनेंद्रिय उदक, भृकुटी ग्रह, नेत्र रश्मी नक्षत्रचक्र, रजोगुण- तमोगुण- सत्वगुण, हे नारायणात्मक जाण. नारायणाचे रोम हे वेद, सरस्वती, प्रणव, परम धर्म आत्मदर्शन इत्यादि प्रकारानीं युक्त हें सर्व जग एक नारायण देव याच्या वश आहे असें तूं जाण. हे वृत्रासुरा, भूतांचें नानात्व जें आहे हें न पाहातां एक नारायण आहे असें पाहाणाऱ्या पुरुषास ज्ञान होतें नंतर त्या ज्ञानापासून अत्यंत सूक्ष्म जें ब्रम्ह त्याचा साक्षात्कार होतो आतां जगाचा संहार व उदयरूप जो काल त्या कालास कल्प म्हणावें त्याच्या सहस्रकोटी कालपर्यंत कांहीं जीव पाषाण होऊन राहातात व कांहीं जीव तो कालपर्यंत मनुष्य व पशु इत्यादि योनी ज्या त्यांत जन्मादि प्रवाहानें संचार

करितात हे वृत्रासुरा, सत्वगुण व रजोगुण यांहून तमोगुण अधिक झाला म्हणजे कृष्णवर्ण जाणावा तसा रजोगुण अधिक झाल्यानें नीलवर्ण जाणावा व धूम्रवर्ण आणि रक्तवर्ण त्याप्रमाणें जाणावे. रजोगुण व तमोगुण यांचें न्यूनत्व होऊन सत्वगुण वाढला म्हणजे पीतवर्ण सुख करणारा झाला असें तूं जाणावें. शुक्ल वर्ण नित्य सात्विक असल्यामुळें मनुष्यास सुख करणारा होतो. सात्विक पुरुष बहुजन्मांच्या अंतिं सिद्धी पावून लक्षावधि वर्षें क्रमानें सर्वलोकीं अनुभव पावून शेवटीं मुक्त होतो. तमोगुणात्मक कृष्णवर्णी पुरुष लक्ष संख्या वर्षें नीच योनींत जन्म घेत असतां पुढें पापक्षय झाल्यावर सत्वगुण होतो आणि मनुष्यजन्मीं शमादि साधनानीं युक्त होऊन साहव्या जन्मीं देवरूप पावतो अशीं बहुत वर्षें देवत्व व मनुष्य या योनी भोगून मग श्रुतींत सांगितल्याप्रमाणें क्रममुक्तिद्वारा योगी महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक, हे चार लोक भोगून मोक्षास पावतो आणि आतां योगी निर्मल अंतःकरण केल्यानें त्या जन्मीं भगवत्प्रसादें करून ब्रम्हास पावतो हे वृत्रासुरा, हें मी तुला नारायणाचें माहात्म्य सांगितलें. असें ऐकून वृत्रासुर म्हणतो अहो सनत्कुमार, तुमच्या ब्रह्मसुखानुभवरूप भाषणानीं मी धन्य होऊन कृतार्थ झालों भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्या वृत्रासुरानें असें बोलून प्राण सोडिले आणि तो ब्रम्हरूपास पावला. असें ऐकून धर्मराज बोलतात हे भीष्मा, सर्वज्ञानस्वामीं प्रतिपादन केलेला हा श्रीकृष्ण थोर आहे तेव्हां यांच्या सत्तेनें वृत्रासुर मोक्षास पावला यास्तव सनत्कुमारानीं पूर्वीं वृत्रासुरास काय सांगितलें तें सांगा. भीष्म सांगतात हे धर्मराजा, निर्विकार रूप ब्रम्हस्वरूप जो परमात्मा तो हा श्रीकृष्ण यानीं शेषशायी नारायणाचें रूप धारण केलें व केशवादि सर्व अवतार यांचे आहेत इत्यादि प्रकारें करून सनत्कुमारानीं पूर्वीं बोध केले वृत्रासुराला व्यापक जो विष्णु त्याची भक्ति झाली या कारणानें तो मुक्तीस पावला असें ऐकून धर्मराज बोलतात हे भीष्मा, वृत्रासुराची गती ऐकून आम्हांस आश्चर्य झालें कारण आम्ही रजोगुणी तेव्हां आम्हांस मानुषी गती किंवा इतर नीच गती होईल हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे पांडु-

डव हो तुह्मी महाभक्त आहांत यास्तव देवलोकींचे भोग भोगून एकवेळां मनुष्य जन्म घेऊन नंतर तुह्मी सिद्ध गतीस पावाल. अ॰ वि॰ या अध्यायांत आहे.

१०८. अध्याय एकशें आठ.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, मला आश्चर्य वाटतें कीं, वृत्रासुरास विष्णुभक्ति होऊन तो तत्वज्ञानानें विष्णुपदास गेला तेव्हां त्या वृत्रासुराचें इंद्राशीं युद्ध कोणते प्रकारें झालें व इंद्रानें त्यास कसा मारिला हें सांगा असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, पूर्वी देवगणांसहित इंद्र रथावर बसून आला व त्यानें वृत्रासुरास पर्वतासारिखा पाहिला तो त्याचा देह पंचशत योजने उंच व तीनशें योजनें विस्तृत असलेला पाहून इंद्रासहित देव भयाभीत झाले तों त्या वृत्रासुरानें निर्भय होऊन नानाप्रकारच्या शस्त्रास्त्रांनी इंद्राशीं युद्ध केलें तें पाहावयाकरितां ब्रह्मदेवादि सर्व देव व वसिष्ठादि ऋषी तेथें आले नंतर वृत्रासुरानें पाषाणांची वृष्टी इंद्रादि सर्व देवांवर करून इंद्रास मोह उत्पन्न केला हें पाहून वसिष्ठानीं इंद्रास सामर्थ्य यावें असा बोध केला त्यानें इंद्रास कांहीं धैर्य आलें नंतर बृहस्पति प्रमुख महर्षींनीं विष्णु व शंकर यांस वृत्रासुराचा पराक्रम सांगितला तें ऐकून शंकरानीं आपला माहेश्वरज्वर त्या वृत्रासुराच्या देहांत सोडिला त्यानें तो दैत्य अत्यंत पीडित झाला नंतर शंकर इंद्रास म्हणतात कीं, हे इंद्रा तूं योग साधनानें त्या दैत्यास मार विष्णूनें आपलें तेज वज्रांत घातलें आहे नंतर वृत्रासुराला मारण्याचें सामर्थ्य इंद्रास प्राप्त झालें तेव्हां त्या युध्दकाळीं इंद्र रथावर असणारा व भूमीवर वृत्रासुर दैत्य त्या दोघांचें युद्ध बहुत दिवस झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०९. अध्याय एकशें नऊ.— भीष्म सांगतात हे धर्मराजा, तो वृत्रासुर दैत्य माहेश्वरज्वरानें पीडित झाला त्या योगानें त्याच्या शरीरावर अपशकून बहुत होऊन गृध्र, कंक इत्यादि पक्षी त्याच्या मस्तकावर चक्रासारिखे भ्रमण करूं लागले हें इंद्रानें पाहून त्या दैत्यास मारण्याकरितां वज्र घेतलें तों इतक्यांत वृत्रासुरानें मोठा महा शब्द करून जृंभमाण मुख केलें नंतर इंद्रानें वज्र त्याजवर टाकिलें त्या वज्राच्या प्रहारानें वृत्रासुराचा देह

फुटून प्राण निघून गेले त्या समयीं महानाद पुन्हा झाला या प्रकारानें इं-
द्रानीं विष्णुयुक्त वज्रानें वृत्रासुर दैत्यास मारून इंद्र स्वर्गी गेला नंतर वृ
त्रासुराच्या देहांतून महा घोर ब्रम्हहत्या निघाली ती इंद्राच्या मागें लागली
त्यावेळीं इंद्र भय पावून कमलाच्या नलिकेमध्यें बहुत वर्षे सूक्ष्मरूपानें जा
ऊन राहिला; परंतु इंद्राच्या हातून ब्रह्महत्येचा पराभव होईना तेव्हां तो इं
द्र ब्रम्हदेवास शरण गेला ब्रम्हदेव चिंतन करून ब्रम्हहत्येस म्हणतात
कीं. हे ब्रह्महत्ये तूं इंद्रास सोड असें ऐकून ब्रम्हहत्या बोलते हे ब्रम्हदेवा, म
ला राहावयास स्थल योजावें म्हणजे मी इंद्रास सोडितें असें ऐकून ब्रम्ह
देवानीं च्यार ठिकाणीं त्या ब्रम्ह हत्येस जागा नेमिली त्यांत प्रथम भाग अ
ग्नीचे ठायीं, दुसरा भाग वृक्ष, औषधी, तृण, यांचे ठायीं तिसरा भाग, अ
प्सरा व स्त्रिया यांचे ठायीं चवथा भाग उदकाचे ठायीं या प्रमाणें ब्रम्हह-
त्येस चार भागीं नेमल्यावर त्या अग्निसहित चौघानीं आमचा दोष को-
णत्या रितीनें जाईल म्हणून ब्रम्हदेवास प्रार्थना केली तेव्हां ब्रम्हदेवानीं
प्रथम अग्नीस सांगितलें कीं, जो पुरुष आहिताग्निचा अधिकारी होऊन
त्या अग्नीवर पुरोडाश, औषधिरस, पय, इत्यादिकांनीं होम न करील त्या-
चे ठायीं ब्रम्हहत्या वास करील त्या प्रमाणें वृक्षादिकांस सांगतात कीं जो
मनुष्य पर्वकालीं तुमचें छेदन व भेदन करील त्याजकडे ब्रम्हहत्या जा-
ईल नंतर ब्रह्मदेव अप्सरेस सांगतात कीं जो पुरुष रजस्वलास्त्रियांशीं
मैथुन करील त्यास ब्रम्हहत्या प्राप्त होईल चवथी उदकें जीं आहेत त्यांस
ब्रह्मदेव सांगतात जो मनुष्य अल्प उदक आहे असें म्हणून तुमच्या ठा
यीं श्लेष्मा, मूत्र, पुरीष, यांस टाकील त्या मनुष्यास ब्रम्हहत्या लागेल आ
णि त्याचे ठायीं वास करील या रीतीनें चौघांस मोक्ष ब्रम्हहत्येपासून हो
ईल म्हणून त्यांस ब्रम्हदेवानीं सांगितलें नंतर इंद्रानें ब्रम्हदेवाची आज्ञा
घेऊन अश्वमेधयज्ञ केला त्यानें तो ब्रम्हहत्येंतून मुक्त झाला या कारणा-
स्तव हे धर्मराजा, तुम्हीं सर्वोपायें करून ब्राम्हणाचें हित करावें आतां हें
आख्यान पर्वपर्वाचे ठायीं जे मनुष्य विप्रामध्यें पठण करतील ते पातकां-
पासून मुक्त होतील. असा विषय या अध्यायांत आहे.

प्रजापतीच्या यज्ञाचा सर्वस्वीनाश केला नंतर वीरभद्रानें त्या यज्ञाचें म- स्तक तोडलें आणि मोठा नाद केला तेव्हां सर्वांस पीडा झाली हें पाहून दक्षासहित ब्रह्मादिदेव त्या वीरभद्रास बोलतात कीं, तूं कोण आहेस तेव्हां वीरभद्र दक्षास म्हणतो हे दक्षा, तुझ्या यज्ञाचा घात करण्या स्तव मी रुद्राच्या कोपापासून झालेला,उमेच्या कोपापासून झालेली ही भद्रकाली या आम्हां उभयतांस शंकरानीं पाठविलें म्हणून आम्हीं तु- झ्या यज्ञाचा घात केला यास्तव तूं त्या महादेवास शरण जा. असें वीर भद्राचें भाषण ऐकून त्या दक्षप्रजापतीनें महादेवांस दंडवत नमस्कार करून स्तुती केली नंतर माहादेव अकस्मात त्या अग्निकुंडापासून उत्प न्न होऊन त्यास बोलतात हे दक्षप्रजापते, मी तुला प्रसन्न आहें वरमा ग, असें ऐकून दक्षप्रजापती हस्त जोडून त्याशीं वर मागतो. हे शंकरा, तुह्मीं जर प्रसन्न आहां तर मी बहुप्रयत्नानें त्या यज्ञ सामग्रीचा संच- य केलेला तो वीरभद्रानें नाश केला यास्तव हा यज्ञ सामग्रीसहित नि र्विघ्नानें पूर्ण व्हावा. असें ऐकून शंकर बोलतात हे दक्षा, तुझा हा यज्ञ मा- झ्या प्रसादानें निर्विघ्न होईल असा वर प्राप्त झालेल्या दक्षप्रजापतीनें अष्टोत्तर सहस्र नामानीं शंकराची स्तुती केली नंतर धर्मराज प्रश्न करिता त हे भीष्मा, जी दक्षानें शिवसहस्रनामानीं शंकराची स्तुती केली तें शि- व सहस्रनाम तुम्हीं मला सांगावें असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्या शंकरास माझा नमस्कार असो. तीं नामें तुम्हीं श्रवण करावीं. देवदेवेश, देवारिबलसूदन, देवेंद्रबलविष्टंभ, देवदानवपूजित, विरूपाक्ष, त्र्यक्ष, यक्षाधिपप्रिय, सर्वतःपाणिपादांत, सर्वतोक्षिशिरोमुख, सर्वतःश्रुतिमा न्य, इत्यादिकरून अष्टोत्तर सहस्र शंकराचीं नामें भीष्मानीं धर्मराजा- स सांगितलीं व ते बोलतात हे धर्मराजा, तुम्हांस सांगितली अशीस्तु ती दक्षप्रजापतीनें करून तो उगाच बसला नंतर महादेव दक्षप्रजाप- तीस बोलतात हे दक्षप्रजापते, त्या तुझ्या स्तुतीनें मी संतोष पावलों अ- शां सहस्र अश्वमेध यज्ञाचें व शतवाजपेय यज्ञ केल्याचें पुण्याचा फल- भागी तूं होशील आणि पाशुपत व्रताचें फल तुला असो अशा बहुप्रका-

ऱ्या भाषणानीं त्यास संतोष करून माहादेव गुप्त झाले आतां त्याशिवसह-स्त्रनामांचें जे कोणी श्रवण अथवा पठण करतील त्यांस आयुष्य, यश, राज्य, सुख, ऐश्वर्य, इत्यादिक शंकर प्रसादानें प्राप्त होतील म्हणून व्यासानीं सांगितलें तें हे धर्मराजा, तुम्हांस मी सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

११२. अध्याय एकशेंबारा.– धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, पुरुषास विचार प्राप्त होणारें जें अध्यात्मशास्त्र हें कोठून उत्पन्न होतें तें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, पृथिवी, वायु, आकाश, उदक, तेज, हीं सर्वभूतांच्या उत्पत्ति व नाश यांस कारण पंचमहाभूतें आहेत त्याभूतांचे गुण, पूर्वीं कथित केलेले आहेत. आतां पुरुष ज्यानें पाहातो ते चक्षु, श्रवण करितो ते श्रोत्र, वास ग्रहण ज्यानें होतो तें घ्राण, रसग्रहण करिते ती जिव्हा, स्पर्शग्रहण करिते ती त्वचा, पुरुषाचे ठायीं जी बुद्धि आहे तीबुद्धीकधींकधीं हर्ष व शोक देणारी होते यास्तव प्रहर्ष, प्रीति, आनंद, सुख, शांतचित्तता, हे गुण प्राप्त झाल्यानें तो सात्विक पुरुष जाणावा. परिदाह, शोक, संताप, अप्रीति, क्षमारहित असणें, हीं चिन्हें रजोगुणी पुरुषाचीं, अविद्या, राग, मोह, प्रमाद, स्तब्धता, भय, असमृद्धि, दैन्य, प्रमोह, स्वप्न, आलस्य, त्याचिन्हांनीं युक्त पुरुष तमोगुणी जाणावा. या प्रकारानें तीन गुणांचें जें जें कार्य तें पुरुषानें निश्चयानें जाणून आणि क्षेत्र व परमात्मा यांचा भेद किती आहे हा सूक्ष्म दृष्टीनें पाहावा या रितीनें अध्यात्मशास्त्र जाणणारे पुरुष ज्ञान योगानें तरतात आणि त्यांस भय कोठूनही होत नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

११३. अध्याय एकशें तेरा.– धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, दुःखाचें भय व मृत्युचें भय या दोहों पासून प्राणी त्रास पावतात या करितां हीं दोन ज्या योगानें नष्ट होतील आणि आम्हांस विद्वानांचीं लक्षणें समजतील तें ज्ञान सांगावें. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं नारदाचा आणि समंग मुनीचा संवाद तुला सांगतो. नारद प्रश्न करितात हे समंगमुने, तूं उरानें नमस्कार करितोस आणि आपल्या बाहूनीं संसार नदीस तरतोस तुझ्या मनादिकांस आनंद असून शोक रहित आहेस असा

आम्हांस तूं दिसतोस. भय, राग, द्वेष, हीं चिन्हें तुझे ठायीं नसून निरंतर आहेस आणि बालासारिखी क्रीडा करितोस यास्तव कोणते कारणानें तुम्हांस शोक नाहीं हें सांगा. असें ऐकून समंगमुनी बोलतो हे नारदा, वर्तमान, गेला जो, पुढें येणारा, त्या भूत व भव्य, भविष्य कालांचें तत्व मी जाणतों व कर्म केल्यानें पुढें त्याचा फलोदय काय आहे हा लोक मोह पावला कोणते योगानें हें सर्व जाणून अंधासारिखा मी जीवंत आहें व अन्य अंध व जड तेही कर्मशून्य असून जिवंत वांचलेले आहेत. हे नारदा, पाहापा हा! अज्ञानानें मोहित झालेले प्राणी शोक पावतात आतां मी द्रव्यवान आहें म्हणून जो गर्व, मोह, सुख, दुःख, लाभ हे गुण माझे ठायीं नाहींत दुसऱ्यास पुष्कळ द्रव्य मिळालें असतां मला खेद नाहीं व त्याचें द्रव्य गेलें असतां मी हर्ष पावत नाहीं कारण बांधव, द्रव्य, कुलीनता, अध्ययन, मंत्र, पराक्रम हे पुरुषास दुःखापासून तारण्याविषयीं समर्थ होत नाहींत म्हणून योग रहित जो पुरुष आहे त्याची बुद्धी आत्मज्ञानाचे ठायीं स्थिर होत नाहीं यास्तव त्याला ब्रह्मसुखाचा लाभ होत नाहीं म्हणून मी धैर्यानें दुःखाचा त्याग करून प्रियादिकांचा त्याग केला. हे नारदा, शोकादिक जे आहेत हे देहाचे ठायीं प्राप्त होणारे आहेत, देहांत जो साक्षी परमात्मा आहे त्यास ते नाहींत असा विचार मी पाहतों आणि अर्थ, काम, शोक, ज्वर, तृष्णा, मोह, मृत्युभय, अधर्म, इत्यादिकांस टाकून जसा अमृत पिणारा पुरुष अमर होतो तसा ब्रह्मसुख झाल्यानें मी शोकादिरहित आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

११४. अध्याय एकशें चवदा:— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, मुमुक्षु होणारा जो पुरुष त्यास शास्त्रांनीं एक मोक्षमार्ग सांगितला असतां तो पुरुष शास्त्राचें तत्व न जाणून निरंतर त्यास संशय होतो तो दूर कोणते कारणानें होतो व आश्रमादिकांचें अनुष्ठान करणारा जो त्याचें कल्याण कसें होतें हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, परमेश्वराचे ठायीं चित्त स्थापन करणें, आचार्यसेवन, गुरुच्या मुखानें वेदांत श्रवण हीं केल्यानें पुरुषाचा संशय दूर होऊन त्यास मोक्षाचा बोध होतें या वि-

अरिष्टनेमी मुनी म्हणतो हे सगर राजा, या लोकीं पुरुष पुत्रादिकांच्या प्रेमानें मोह पावून या देहाचे ठायींच मोक्ष रूपाचा लाभ असतां त्याची आसक्ति करून घेत नाहीं यास्तव तुला सांगतों. पुरुषानें स्त्रियादिकांचें रक्षण करून पोषण करण्याविषयीं योग्य पुत्र झाले म्हणजे पुत्रांचे स्वाधीन आपलें स्त्रियादिक करून त्यानें विरक्त व्हावें. याप्रमाणें केल्यानें बहुत पुरुष मोक्ष रूप लाभ पावले यास्तव हे राजा तूंही असें आचरण कर म्हणजे मुक्त होशील आणि पुन्हा मोक्षाची लक्षणें तुला सांगतो स्वजनीं चिंतात्याग, क्षुधा तृषादिकांना जय, क्रोध व लोभ मोह यांचा जय करणें, द्यूत व पान, स्त्री व मृगया करणें यांविषयीं मोहाविष्ट न होणें, कोणताही अधिकार न करणें, जन्म, मरण, जीवंत असतां क्लेश जाणणें, मृत्यु व व्याध्यादिकांनीं लोक ग्रस्त आहे असें पाहाणें, जें कांहीं चांगलें व वाईट कर्मानें मिळेल त्यांत संतोष करणें, त्यालोकीं भूतांची उत्पत्ति व नाश यांचें हि नश्वरपणानें पाहाणें, इत्यादि लक्षणांनीं युक्त असे सहस्रावधी राजे ऐश्वर्याचा त्याग करून गेले यास्तव गृहस्थाश्रमीं असणाऱ्या पुरुषानें शास्त्रनीति व लोकरीति यांत सार कोणतें आहे हें जाणून मोक्षाविषयीं निश्चल बुद्धि करावी म्हणजे तो मुक्त होतो. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, या प्रकारच्या सगर राजानें अरिष्टनेमि मुनीचें भाषण ऐकून मोक्ष प्राप्त होणाऱ्या गुणांनीं युक्त असून त्या राजानें पृथ्वीचें पालन केलें तसें तूंही कर. असा विषय या अध्यायांत आहे.

११६. अध्याय एकशें सोळा.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, दैत्यांचें तेज वाढविणारा व ज्याच्या सामर्थ्यानें दैत्य निर्भय होतात आणि देव भय पावतात असा शुक्राचार्य जो आहे त्यास मोठें तेज प्राप्त होण्याचें कारण काय व शुक्र हें नाव कोणत्या कारणानें पडलें हें सांगा. असें ऐकून भीष्म म्हणतात हे धर्मराजा, हा शुक्र भार्गव पुत्र असून त्याचें मन दृढ आहे आणि संजीवनी विद्येनें दैत्यांचें रक्षण करितो त्याची कथा सांगतों. कोणी एके समयीं दैत्यांनीं देवांस पीडा करून भृगुऋषीच्या स्त्रियेच्या आश्रमीं प्रवेश केला. हें पाहून देव त्या आश्रमीं जाण्या करितां यत्न करूं लागले, परंतु दैत्यांपुढें दे-

नाहींत आतां अज्ञानें करून पुरुषानें पाप कर्म केलें तर तो पुरुष प्रायश्चि त्त केल्यानें शुद्ध होतो, बुद्धिपूर्वक पाप केलें तर त्या पापाचा नाश होत नाही परंतु पूर्वी विश्वामित्रानीं वसिष्ठऋषीचे शत संख्य पुत्र मारिले त्या पाप कर्मानें विश्वामित्रास नरकादि दुःख प्राप्त झालें नाहीं कारण सामर्थ्यवंत पुरुष जे आहेत त्यानीं परस्त्री गमन इत्यादिक पाप कर्मे केलीं असतांही तीं पाप कर्मे त्यांस दोष करणारीं होत नाहींत यास्तव ज्या पुरुषास सामर्थ्य नाहीं त्यानें मनांत ही पाप कर्म आणूं नये; आतां राजानें शत्रूस जिंकून उत्तम रीतीनें प्रजाचें पालन करावें आणि यज्ञें करून विष्णूचा संतोष करावा, नंतर त्या राजानें वानप्रस्थाश्रम करावा. यास्तव जो पुरुष दयाचें सेवन करितो तो सर्वभूतीं परमात्मा व्यापक आहे असें पाहतो आणि ब्रम्हज्ञानानें युक्त जे पुरुष आहेत त्यांची वारंवार पूजा करितो तो त्या लोकीं सुख भोगून शेवटीं उत्तम गतीस पावतो. असा विषय या अध्या यांत आहे.

११९. अध्याय एकशेंएकूणीस:— पराशर सांगतात हे जनकराजा, कोणी पुरुष परोपकारार्थ कर्म करीत नाहीं परंतु परोपकार करणारा व भूतांवर दया धारण करणारा पुरुष आत्मज्ञानी होतो आतां परोपकारबु द्धीनें क्षुधेनें पीडित झालेल्या अतिथीस अन्नदान करून रंतिदेव राजा सिध्दीस पावला, तसा पृथिवीचा पति शैब्य राजा सूर्याची आराधना करू न त्यानें ब्राम्हणांस संतुष्ट केलें त्या योगानें तो उत्तम स्थानास पावला त स्मात् पुरुषानें वेदपठणानें महर्षीस, यज्ञ कर्मानें देवांस, श्राद्ध दानानें पितरांस, यथा शक्त्या अन्नदानानें अतिथीस संतुष्ट करून ते पुरुष ज्ञा नानें कृतार्थ झाले व अग्नीचे गर्भी हवन करून कोणी मुनी परम सिद्धीस पावले तसा आंगिरस, अजीगर्त याचा पुत्र शुनःशेपनामक असून तो विश्वामित्राचा पुत्र झाला आणि त्या शुनःशेपानें देवांची स्तुति केली आणि तो सिद्धीस पावला व शुक्राचार्यानीं पार्वतीची स्तुति केली त्यानें शंकरप्र साद त्यांस झाला त्या योगें तो आकाशीं सूर्यासारिखा शोभतो. याप्रमाणें अ सित, देवल, नारद, पर्वत, कक्षीवान, परशुराम, तांड्य, वसिष्ठ, जमद-

ग्नि, विश्वामित्र, अत्रि, भरद्वाज, हरिश्मश्रु, कुंडधार, श्रुतश्रवा, हे महर्षी विष्णूची स्तुती केल्यानें सिध्दीस पावले व निंद्य कर्म करणारे हि विष्णूच्या प्रसादानें उत्तम गतीस पावतात तस्मात् धर्मसेवन करणारा पुरुष जो आहे तो या लोकीं पूज्य होऊन परलोकीं पूज्य होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१२०. अध्याय एकशेंविस :- पराशर सांगतात हे जनक राजा, ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य त्या तीन वर्णांहून हीनवर्णाचा शूद्र त्याची वृत्ति, सेवा करणे ती सेवा शुद्रास धर्मिष्ठ करणारी होते यास्तव शूद्र वृत्ति अत्यंत शोभन कारक जाणावी कारण त्या धर्मिष्ठ वृत्तीनें तो शूद्र, दोन लोकांस जिंकतो असें धर्म जाणणाऱ्या साधूनीं सांगितलें आहे. जसे उदयाचल पर्वतीं सुवर्णादि मणी ठेवलेले सूर्याच्या सान्निध्यपणानें शोभायमान दिसतात तसा साधूची सेवा केल्यानें हीन वर्ण शूद्र जरी आहे तरी शोभतो. आतां जो राजा सहस्त्रावधि गायी बलात्कारानें हरण करून ब्राम्हणांस दान करितो त्या राजास चोर म्हणावें कारण, राजानें धर्मेकरून प्रजांचें रक्षण करावें व ब्राम्हणानें अध्ययन करावें, वैश्यानें कृषि गोरक्ष्यादि कर्मानें द्रव्य संपादन करावें, शुद्रानें सेवा करावी म्हणजे हे चारी वर्ण शोभतात. आतां राजानें न्यायानें संपादन केलेल्या गायी सहस्त्रावधी सत्कारपूर्वक विद्वान ब्राह्मणांस दिल्या असतां त्या राजास उत्तम फल प्राप्त होतें, ब्राम्हणानीं याचना केल्यावर जो देतो त्यास मध्यम फल होतें, जो ब्राम्हणांची अवज्ञा करून दान करितो त्यास अधम फल प्राप्त होतें. असे राजास दान करण्याचे प्रकार तीन सत्यवादी मुनीनीं सांगितले आहेत म्हणून राजानें विचारपूर्वक धर्म करावा. तो न केला असतां नरक प्राप्ती त्यास होते. दम धारण केल्यानें ब्राह्मण, विजय प्राप्त झाल्यानें क्षत्रिय, धन संपादन केल्यानें वैश्य, सेवाधर्म केल्यानें शूद्र शोभतो. असा विषय या अध्यायांत आहे

१२१. अध्याय एकशें एकवीस :- पराशर सांगतात हे जनक राजा, ब्राह्मणानीं प्रतिग्रहानें संपादन केलेले अर्थ, क्षत्रियानीं युध्दांत शत्रूस जिंकून संपादित अर्थ, वैश्यानीं न्यायानें संपादित अर्थ, शूद्रानीं सेवा करून संपादित अर्थ प्रशस्त होतात. त्या अर्थांचा धर्म केला असतां ते अर्थ महाफल देणारे होतात. या प्रमाणें कांहीं धर्मांचीं लक्षणें सांगून पराशर म्हण

तात हे जनकराजा, अष्टादश पुराणांत कथा सांगितली आहे कीं ऋषीनीं धर्म सेवन करावा. म्हणून सर्वांस सांगितलें असतां तो धर्म दैत्यानीं सेवन केला नाहीं त्या मुळें प्रजा अधर्म करूं लागल्या त्यामुळें त्यांस क्रोध उत्पन्न झाला, क्रोधापासून मोह झाला त्या मोहानें परस्पर मद्य व मांसादिकांचें भक्षण करूं लागल्या त्या योगानें कांहीं ब्राम्हणांसही मोह होऊन ते मद्यादिक भक्षण करूं लागले आणि म्हणताल कीं, स्नान व संध्या ब्रम्हयज्ञादिक धर्म केल्यानें कांहीं उपयोग होत नाहीं तर मद्यादिकांचे भक्षणानें जें सुख आम्हांस होतें असें सुख महर्षीनीं सांगितलेल्या धर्मानें होत नाहीं अशा प्रकारानीं यथा सुखानें ते मूर्ख वागणूक करीत असतां ते दैत्य व कांहीं ब्राम्हण सद्धर्माचरण करणारे त्यांचा अवमान करून दंतेणुक करूं लागले. हें पाहून देव, शंकरास शरण गेले आणि त्यानीं प्रजा दैत्यांचा आचार करूं लागल्या म्हणून त्यांस सांगितलें. तें ऐकून शंकरानीं एक बाण सोडिला त्यानें त्या दैत्यांचा मुख्य राजा जो भीम या नामाचा होता तो मरण पावला नंतर ब्राम्हण, वेदशास्त्राध्ययन करूं लागले आणि धर्माचरण पूर्वी सारिखें करूं लागले व इंद्र आपले इंद्रपदावर बसून आनंद पावला. आकाशीं सप्तर्षी, पृथिवीवर राजे, हे आपआपले स्वराज्यांत धर्मानें वागूं लागले याप्रमाणें सर्व प्रजांचा हृदयांतून आसुर भाव निघून गेला. यास्तव सद्धर्म आचरण केल्यानें जें सुख होईल तें पापाचरण केल्यानें होणार नाहीं म्हणून राजानें बांधव, प्रजा, सेवक, पुत्र, व ब्राम्हण यांचें पालन करावें यास्तव मनुष्यानें अहिंसारूप धर्माचें सेवन केलें असतां त्याचें कल्याण होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२२. अध्याय एकशें बावीस.–पराशर सांगतात हे जनका, गृहस्थाश्रमी कोणत्या रीतीनें वागतो तें तुला सांगतो. गृहस्थास प्रथम ममता उत्पन्न होते त्या योगानें गृह चांगलें बांधतो नंतर त्या गृहांत गायी, धन, स्त्रिया, पुत्र, सेवक, ही संपादन करितो, नंतर स्त्रीसंग व पुत्रावर स्नेह अत्यंत करितो त्यानें मोह होतो त्यापासून रति होते, त्या योगानें म्हणतो कीं, मी स्त्रियादिकांच्या सुखानें कृतार्थ झालों यास्तव भोगी माझ्यासारिखा दुसरा कोणी नाहीं.

तेव्हां मैथुन करवाच्या लाभासारिखें अन्य दुसरें करव नाहीं असें पाहतो आणि दासीवदास इत्यादिकांचें रक्षण करण्यास्तव राग व द्वेष यांचा स्वीकार करून व्यापार करितो त्यांत न्याय व अन्याय न पाहतां द्रव्य संपादन करितो, नंतर स्त्रियादिकांच्या भोगानें मी संपन्न आहें असें मनांत आणून बालकावर स्नेह करितो या प्रमाणें कांहीं दिवस रेशमी कांठी वस्त्रें; सुवर्णाचे अलंकार अश्वादिक वाहनें, आसनें, पान व भोज्य, नाना प्रकारचे सुंदर पदार्थ, मनास अनुकूल सुरूपवती अशा स्त्रिया त्याशीं आलिंगन करणें, राहावयास वाडा मोठा, निद्राकरण्याविषयीं शयनें, मृदु, सुंदर, इत्यादिक पदार्थांचा उपभोग करितो पुढें स्त्री व पुत्रादिकांचा नाश झाला म्हणजे तो विलापकरून म्हणतो कीं, सर्व मला सोडूनगेले व माझ्या द्रव्याचा नाश झाला आणि आधिव्याधीनीं मीं पीडित झालों इत्यादिक शोकानें व्याकूळ होऊन मग त्या पुरुषास वैराग्य होतें. नंतर गीताशास्त्र व मोक्षधर्म यांत अर्थ काय आहे हें तो पाहतो अथवा कांहीं पूर्वपुण्योदयानें सत्संग त्यास प्राप्त होतो नंतर तप करितां करितां जितेंद्रिय होतो, पुढें कांहीं कालानें समस्त विषयवासना टाकून निर्मल अंतःकरण झाल्यानें तो पुरुष कृतार्थ होतो. आतां ब्रह्मदेवानीं पूर्वीं तपानें प्रजा तसेच आदित्य, वसु, रुद्र, इत्यादिक देव, पितर, यक्ष राक्षसादिक उत्पन्न केले त्यांत गृहस्थाश्रम्यानीं तपानें आपल्यास ऐश्वर्य मिळावें म्हणून पुण्याचें आचरण केलें तेव्हां त्यांस नाना प्रकारचे विषय भोग पुण्य फलानें प्राप्त झाले त्यांचा ते, उपभोग करितात; परंतु पुण्य क्षय झाल्यानें त्यांस दुःख प्राप्त होतें यास्तव स्त्रियांशीं संग केलेल्या सुखाचें प्रमाण धनुष्यापासून बाण सुटला म्हणजे तो जितक्या वेळांत पृथ्वीवर पडतो तितकावेळ आहे याकरितां विचारवंत पुरुष त्या सुखावर प्रेम न ठेवितां मोक्ष धर्माचे ठायीं यत्न करितात. आतां नद्या व नद जसे समुद्रीं येऊन मिळतात तसे इतर आश्रमी निर्वाहाविषयीं गृहस्थाश्रमीं येतात म्हणून गृहस्थाश्रम धन्य आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१२३. अध्याय एकशेंतेवीस:– जनक प्रश्न करितात हे पराशर ऋषे,– वर्णांत सात्विक वर्णी ब्राम्हण कोणत्या योगानें होतो व त्यापासून राजस तामस गु-

णात्मक क्षत्रियादि जाती कशी झाली हें सांगा. असें ऐकून पराशर सांगतात. हे जनक राजा, स्वक्षेत्र व स्वबीज यांपासून जो पुण्यवान ब्राम्हण उत्पन्न होतो तो तपसामर्थ्यानें होतो यास्तव परमेश्वराच्या मुखापासून ब्राम्हण, बाहू-पासून क्षत्रिय, ऊरूपासून वैश्य, पायापासून शूद्र, असे चार वर्ण झालेत्या वर्णांपासून कर्मयोगानें वर्ण संकर झाला त्यापासून अंबष्ठ, उग्र, वैदेहक, श्वपाक, पुल्कस, स्तेन, निषाद, सूत, मागध, व्रात्य, चांडाल, हे नीच जातीचे उत्पन्न झाले असें ऐकून जनक प्रश्न करितो हे पराशर ऋषे, ब्राम्हण जाती एक असतां नाना प्रकारचीं गोत्रें कशीं झालीं हें सांगा, पराशर सांगतात हे राजा. पूर्वी तपें करून व शमदमादि साधनांनीं महर्षी सामर्थ्यवंत झाले आतां मूल गोत्रें चार आहेत तीं सांगतो. आंगिरस, काश्यप, वासिष्ठ, भृगु, यांहून कर्म योगानें अन्य गोत्रें बहुत कर्मांपासून झालीं आहेत. असें ऐकून जनक प्रश्न करितात हे पराशर ऋषे, त्या वर्णांचे विशेषधर्म कोणते व सामान्यधर्म कोणते ते सांगावे. असें ऐकून पराशर सांगतात हे जनक राजा, प्रतिग्रह, याजन, अध्यापन हे विशेष धर्म ब्राम्हणास सांगितले आहेत. प्रजांचें रक्षण हा धर्म क्षत्रियांस, कृषि व पशूंचें पालन, वाणिज्य, हे वैश्यांस, ब्राम्हणाची सेवा, हा शूद्रांस या प्रमाणें हे चार वर्णांचे विशेष धर्म होत. आतां अक्रूरत्व, अहिंसा, अप्रमाद, अक्रोध, स्वस्त्रीचे ठायीं संतोष, शौच, आत्मज्ञान, तितिक्षा, इत्यादिक हे साधारण धर्म सांगितले आणि त्या जगाचा देव विष्णू आहे. असें ऐकून जनक प्रश्न करितात हे पराशरा, दोषरूपी कर्म व जातीचें कारण कोणतें हें सांगा. असें ऐकून पराशर सांगतात हे राजा, निःसंशय कर्म व जाती हीं पाप कर्म केल्यानें दोषरूपी होतात. जनक प्रश्न करितात हे पराशर ऋषे, त्या लोकीं धर्मांपासून भ्रष्ट झालेलीं अशीं कर्मे कोणतीं तीं सांगावीं. पराशर सांगतात हे जनक राजा, हिंसा रहित जीं कर्मे तीं पुरुषास रक्षण करणारीं होतात यास्तव जे पुरुष अधर्म टाकून धर्माचें सेवन करितात ते स्वर्गलोकीं जातात. अ. वि. या अध्यायांत आहे.

१२४. अध्याय एकशेंचोवीस.- पराशर सांगतात हे जनक राजा, त्या

लोकीं भक्त्यादिकांनीं हीन पुरुष जे आहेत त्यानीं पिता, मैत्र, गुरु, स्त्रिया, यांची सेवा केली असतां ते पित्रादिक त्या पुरुषांस सेवाकेल्याचें फल देण्याविषयीं समर्थ होत नाहींत. आतां प्रिय बोलणारे आणि हित करणारे असून वश राहाणारे असे जे भक्त त्यांस ते पित्रादिक सेवा फल देतात. पिता हें मनुष्याचें परम दैवत मातेपेक्षांही अधिक म्हणून शिष्ट बोलतात. कारण त्यापासून ज्ञानाचा लाभ होतो, आतां श्रांत झालेला, भ्यालेला. भ्रष्टशस्त्र, रुदन करणारा, पराङ्मुख, रथ व अश्वादिकानीं हीन, आयुधांचें प्रेरण न करणारा, रोगी, याचना करणारा, बाल, वृद्ध, यांस शूरानींमारूनये. आपले बरोबरीचा जो असेल त्यास मारावें, हीनादिकांचा वध केला असतां त्यास नरक प्राप्त होतो, गृहस्थाश्रमी जे आहेत त्यांस उदकाच्या समीप मरण आलें असतां चांगलें व मुक्ति क्षेत्रावर तर फार उत्तम परंतु पद्म पुराणांत माघ मासाचें माहात्म्य आहे त्यांत सांगितलें आहे कीं, काशी क्षेत्रीं जो ब्राम्हण मरण पावला त्यास दाहा जन्म घ्यावे लागतात. कारण कर्म वासनाजी त्यास असते त्या योगानें यातना सुक्ष्म शरीर होऊन पुढें जन्मास तो मनुष्य येतो यास्तव भक्तिसहित ज्ञान झालेल्या पुरुषास मोक्ष निश्चयानें होतो. पुण्यवंताचे प्राण सूर्य मंडलास भेद करून सूर्य द्वारानें क्रमेकरून मोक्षास पावतात यास्तव मनुष्य योनी प्राप्त झाली असतां देहाचें रक्षण करून आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावें म्हणजे तो कृतकृत्य होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१२५. अध्याय एकशें पंचवीस:- जनक प्रश्न करितात हे पराशरऋषे, पुरुषास श्रेय साधन कोणतें, गती कोणती, कोणतें कर्म केलेलें नाश पावत नाहीं. कोणत्यास्थानीं गेलें असतां पुनरजन्मास येत नाहीं, या चार प्रश्नांचें उत्तर सांगा. असें ऐकून पराशर सांगतात हे जनकराजा, असंग हें श्रेय प्राप्त होण्याचें साधन, ज्ञान हीच परमगती, सत्पात्रीं दान केलें तर त्या दानाचा नाश होत नाहीं, सन्यास करून सर्वभूतीं अभय देणाऱ्यांस पुनर्जन्म नाहीं, आतां जसें कमलपत्रावर उदक राहात नाहींसें ज्ञानी पुरुषांस पाप लागत नाहीं, ज्या पुरुषानें राग व क्रोध जिंकले-

त्या पुरुषास पाप लागत नाहीं. जो पुरुष स्त्रिया, संपदा, वाहनें, व उत्तम कर्माचें फल यांचा त्याग न करितां विषयासक्त होऊन आत्मतत्व जाणण्याविषयीं सत्संग व वैराग्यादिकांचें सेवन करीत नाहीं त्या पुरुषाचा जन्म व्यर्थ होऊन तो बुडतो यास्तव जो ज्ञानमार्गी लागला तो त्या लोकीं व परलोकीं सुख पावतो. हा लोक जरेनें वेष्टिला असून मृत्यूनें ग्रासिला आहे आतां त्या लोकीं जे प्राणी जन्मास येतात ते आपआपले कर्माचे फलाचा उपभोग करितात यास्तव अंतीं सुख घेण्यास माता, पिता, पुत्र, भार्या, मित्र, जन, इत्यादिकांचा उपयोग घडत नाहीं या करितां मनुष्यानें कुटुंबादिकांवरील ममता दूर करावी. आणि प्रथम सत्संग करावा. म्हणजे सर्व कार्य त्याचें पूर्ण होतें. कारण, एकाग्रचित्त, शूरत्व, धैर्य, ज्ञान, लक्ष्मी हीं मनुष्यास सत्संगानें प्राप्त होतात आणि तो मनुष्य ज्ञान संपन्न होऊन कृतार्थ होतो. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या प्रमाणें पराशर ऋषीचीं भाषणें ऐकून जनक राजा परम आनंदास पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२६. अध्याय एकशेंसविस :- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, त्या लोकीं विचारवंत मनुष्य सत्य, दम, क्षमा, प्रज्ञा, यांची प्रशंसा करितात ते. व्हां हे गुण मोक्ष प्राप्तीविषयीं योग्य आहेत किंवा कसे हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं साध्यदेव व हंसपक्षी यांचा संवाद सांगतो. परमेश्वर हंस पक्ष्याच्या रूपानें आलेला पाहून त्यास साध्यदेव प्रश्न करितात हे हंसपक्षे, आम्ही साध्य देव आहोंत, आम्हांस मोक्षधर्माचीं लक्षणें सांगावीं. असें ऐकून हंसपक्षी बोलतो हे साध्यदेव हो, स्वधर्माचरणरूप तप करणें, बाह्येंद्रियांचें नियमन, चित्त स्वाधीन करणें, सत्यधारण करणें, रागादिकांचा त्याग हे गुण प्राप्त झाले असतां पुरुषास मोक्ष प्राप्त होतो. आतां पुरुषानें दुसऱ्याचे मर्माचा च्छेद करणारें भाषण व निष्ठुर भाषण, यांचा त्याग करावा आणि शम, असूया न करणें, आर्जव, क्रोधरहित असणें, परदुःख सहनशीलता, यांचें त्यानें सेवन करावें. आतां वाणी, मन, तृषा, उदर व उपस्थ यांचा वेग संहन करणाऱ्या पुरुषास मुनीम्ह-

णावें.तस्मात् अन्यापासून ताडन व निंदादिक प्राप्त झाली असतां जो पुरुष क्षमेनें सहन करितो तो पुरुष धन्य होतो. असें ऐकून साध्यदेव प्रश्न करितात हे हंसपक्षे, हा लोक कोणी वेष्टिला, कोणतें कारणानें प्रकाशित होत नाहीं, कोणत्या योगानें मित्रत्याग होतो, काय केल्यानें स्वर्गास जात नाहीं हे सांगा. व रममाण कोण होतो, ब्राम्हणांत श्रेष्ठ कोण, बलवान कोण, कलह न करणारा कोण, ब्राम्हणाचा देव कोण, साधुत्व कोणास म्हणावें; असाधुत्व काय, मनुष्यास प्राप्त होणारें मत कोणतें आहे हें सांगा. असें ऐकून हंसपक्षी क्रमें करून सांगतात हे साध्यदेव हो, हा लोक अज्ञानानें वेष्टिला आहे, मात्सर्यभावानें प्रकाशित होत नाहीं, लोभाविष्ट झाल्यानें मित्राचा त्याग होतो, संग केल्यानें स्वर्गास जात नाहीं. ज्ञानी पुरुष रममाण होतो, ब्राम्हणांत प्राज्ञश्रेष्ठ जाणावा, प्राज्ञ हा बलवान, व तोच कलह करीत नाहीं, ब्राम्हणास वेदपठण हें देवत्व त्या ब्राम्हणाचा साधुभाव हें व्रत, निंदा करणे हा असाधुपणा, मृत्यु पावणे हें मानुष मत, भीष्म म्हणतात हे धर्मराजा, या प्रमाणें साध्यदेवाचा व हंसाचा संवाद तुम्हांस सांगितला यास्तव सद्भाव श्रेष्ठ आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१२७. अध्याय एकशेंसत्तावीस.—धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, सांख्य व योग या दोहोंत श्रेष्ठ कोण हें सांग. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, सांख्य जाणणारे ब्राम्हण सांख्याची व योगी योगाची प्रशंसा करितात. त्यांत स्वसत्तामात्रें करून भगवान् भक्तांवर अनुग्रह करितो आणि मोक्ष देतो असें योगी पुरुष बोलतात. आतां सर्व गतींचा साक्षात्कार पावून समस्त विषयवासनेचा त्याग, स्थूल सूक्ष्म महाकारण, यांस जाणणारे आम्हीं साक्षात्कार पावून समस्तविषय वासनेचा त्याग स्थूलसूक्ष्म महाकारण यांस जाणणारे सांख्यज्ञानी, आम्हीं साक्षात् शुद्ध चिन्मात्र स्वरूप जें ब्रह्म तें आहों असें बोलतात तेव्हां आपआपले पक्षांचें साधनरूप हित विषयीं त्यां दोहों पक्षांचीं भाषणें शिष्टास मान्य होऊन ते शिष्ट, पक्षद्वयाचें ग्रहण करितात; परंतु शौच, तप, सर्वभूतीं दया, या व्रतांचें धारण केलें असतां पुरुषास त्या दोन मार्गाहून अधिक मोक्ष लाभ होतो. असें ऐकून धर्मराज प्रश्न करितात.

हे भीष्मा, शौचादिक व्रतांचें सामर्थ्य मोक्ष प्राप्ती विषयीं अधिक कसें आहे हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात; हे धर्मराजा, राग, मोह, स्नेह, काम, क्रोध, या पांच दोषांचा च्छेद योग साधनानें करून पुरुष ब्रम्हगतीस पावतात. जसे मोठे मत्स्य, जाळ्यांत सांपडलेले असून तें जाळें तोडून उदकांत मिळतात व बलवंत मृग, पाशापासून मुक्त होतात. तसे योगी लोभापासून झालेलीं जीं बंधनें त्यांचा च्छेद करून ब्रम्हगतीस जातात. आतां या विषयीं दुसरे सूक्ष्म दृष्टांत सांगतो जसा धनुष्य धारण करणारा बाणानें लक्ष्य भेद करितो तसा कोणी पुरुष मस्तकावर उदकानें पूर्ण केलेलें पात्र घेऊन निश्चल मनानें जिनाचढून जातो याप्रमाणें योगी निःसंशयपणानें मोक्षास पावतो असें बहुत प्रकारानीं सांगितलेलें ऐकून धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, तो योगी आहार कसा करितो व कोणास जिंकिल्यानें त्यास बल प्राप्त होतें हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, कण, पेंड, स्नेहवर्ज पदार्थ, सक्तूचें पीठादि, रूक्षपदार्थ, यवान्न, यवपिष्ठ, यांचें भक्षण तो योगी करितो आतां एकवेळीं आहार, पक्ष, मास, ऋतु, संवत्सर, या कालीं केवल उदकाचें पान करणारा योगी सामर्थ्यवान होऊन भय व शोक इत्यादिकांचा त्याग करून सर्वांहून अधिक सामर्थ्यवान नारायणरूप होतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१२८. अध्याय एकशें अठ्ठावीस :- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, सांख्य ज्ञानाचा विधि संपूर्ण मला सांगावा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, दोषरूप विषयांचें जाणणें, पैशाच, रजोगुण, यक्ष, सर्प, गंधर्व यांचे विषय, योगाचे ईश्वर, आयुष्याचा काल, सुखाचें परमतत्व प्राप्तकालीचें दुःख, नीच योनीचे ठायीं जन्म, नरक दुःख, स्वर्गांतील गुण व दोष, सांख्य ज्ञानाविषयींचे दोष व गुण, सत्वगुण दहा, रजोगुण नऊ, तमोगुण आठ, मनाचे साहा गुण, आकाशाचे पांच गुण, बुद्धीचे चार गुण, तमाचे तीन गुण, पंच ज्ञानेंद्रियांचे गुण, देहाचे सोळा गुण, मोक्षाचें दुर्लभत्व, पंच प्राण, इत्यादिक जाणणें, ऐश्वर्यांतून भ्रष्ट झालेल्यास पाहाणें, भूतसमुदायाचा नाश, पापकर्मी पुरुषाच्या अशुभ गतीचें जाणणें, यमलोकीं नरक दुःखपा-

हाणे, गर्भवासाचें दुःख, तमोगुणपुरुष, देहांतील दोष, घोर अनर्थ, नक्षत्र पतन हीं जाणणें, भूतें अन्योन्य भक्षण करितात तें पाहाणें, बाल्य अवस्थेंत मोह, देहाचा नाश, विषयापासून बंध, मद्य प्राशन व गुरुस्त्रीशीं सक्त होणाऱ्या ब्राम्हणांस पापगती, मास व ऋतू संवत्सरादिक यांचा नाश, आत्म दोष, जन्म व मृत्यू इत्यादिकांचें पाहाणें, हा सांख्य ज्ञानाचा विधि होय. असें ऐकून धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, स्वशरीरापासून दोष उत्पन्न होणारे कोणते ते सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, काम क्रोध, भय, निद्रा, श्वास, हे पांच दोष सर्व प्राण्यांचा शरीरीं दिसतात ते दूर होण्याचीं लक्षणें सांगतों. क्षमेनें क्रोध, संकल्प वर्ज केल्यानें काम, सत्वगुणाच्या सेवनानें निद्रा, अप्रमाद धारण केल्यानें भय यांचा नाश होतो, अल्प भक्षणानें श्वास जिंकावा, इत्यादिक ऐकून धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, मोक्ष प्राप्त झालेल्या पुरुषास जन्म व मरण यांचें स्मरण होतें किंवा नाहीं हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्या प्रश्नाचें उत्तर देण्यास ज्ञानी पुरुषही असमर्थ आहे परंतु याचें तत्व तुला सांगतों. देहधारी पुरुष जे आहेत त्यांचीं ज्ञानेंद्रियें स्वदेहाचे ठायीं जागृत अवस्थेंत आत्मस्वरूप ज्ञानाविषयीं कारण भूत आहेत यास्तव योगी पुरुषास जागृत स्वप्न सुषुप्ति ह्या तीन अवस्थांचें ज्ञान होऊन चवथी अवस्था जी परमात्मस्वरूप त्या अवस्थेस ते जातात त्यामुळें जीवन्मुक्त दशा त्यास प्राप्त होते आणि जिवन्मुक्त अवस्थेंत ते आहेत तों पर्यंत त्यांस भगवत्प्रसादें करून जन्म व मरण यांचें लक्षण स्पष्ट समजतें परंतु ज्या ब्रम्ह वस्तूचे ठायीं जन्म व मरण हीं मुळीच नाहींत असा ब्रम्ह साक्षात्कार ज्यांस झाला ते कृतार्थ होतात यास्तव सांख्यज्ञान हें केवल नारायणरूप आहे तो नारायण जगाचा अंतरात्मा असून उदकांत शेषावर निद्रा करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

१२९. अध्याय एकशें एकुणतीस:- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, ज्या अक्षरास पावलेला पुरुष पुनर्जन्मास येत नाहीं असें जें अक्षर त्याचा अर्थ काय व क्षर हा शब्द कशास म्हणावा हें सांगा. कारण त्या कुरुवंशी-

न तुम्हीं ज्ञानदीप आहांत आणि सर्व महर्षी तुम्हांस ज्ञानविधि असेंह्मण तात व दक्षिणायन अल्प राहिलें आहे उदगयन झालें म्हणजे तुम्हीं उत्तम गतीस पावणार मग आम्हीं कोणापासून ऐकावें यास्तव सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात, हे धर्मराजा, या विषयीं वसिष्ट ऋषी व कराल नामाजनक यांचा संवाद सांगतों. कोणी एके वेळीं जनक राजा प्रश्न करितो हे वसिष्ठ ऋषे, ज्ञानस्वरूप जें अक्षर व नाशपावणारें जें क्षर यांचा विचार सांगा. असें ऐकून वसिष्ठ सांगतात हे राजा, देवांचीं बारा हजार वर्षे झालीं म्हणजे चार युगें होतात या मानानें सहस्त्र युगें झालीं म्हणजे ब्रम्हदेवाचा एक दिवस होतो या प्रमाणें त्यांचे रात्रीचें ही मान आहे तेव्हां त्या ब्रह्मदेवास उत्पन्न करणारें असून जें सांख्य शास्त्रांत एकाक्षर ब्रह्मश्रुतीनीं सांगितलें तें अक्षर होय आतां ब्रह्मदेवापासून पिपीलिकापर्यंत जीं भूतें व अव्यक्त महद अहंकार, आकाशादि चोवीस तत्वरूप जें ब्रह्मांड यांस क्षर, असें म्हणावें तेव्हां जो परमात्मा तो मी आहें असा अनुभव ठसल्यानें तो सत्वादि गुणातीत होतो यास्तव गुणातीत न झाला तर त्यास उत्तम, मध्यम, व नीच अशा गती प्राप्त होतात म्हणून पुरुषानीं गुणातीत व्हावें असें विवेकी पुरुष बोलतात. अ. वि. या अ. आहे.

१३०. अध्याय एकशें तीस :- वसिष्ठ सांगतात हे जनका, पुरुषास अज्ञान असल्यामुळें तें सहस्त्रावधी देह ग्रहण करितात त्यांत नीच योनीही बहुत ग्रहण करून देवलोकीं जातात आतां कोणी पुरुष ज्ञान प्राप्त झाल्यामुळें शुल्क वस्त्र परिधान करून पृथ्वीवर कोणतेही ठिकाणीं तो निद्रा करितो व मंडूकासारिखा हस्त व पाद यांचें आकुंचन करून तो शयन करितो आणि वल्कलांचें धारण, व्याघ्र चर्माचें परिधान, साहावे रात्रीं भोजन, अष्टम दिवशीं भोजनादिक करणें, मासोपवास, गोमूत्र भोजन इत्यादि नानाप्रकारचे नेम करून स्वधाकार, वषट्कार, स्वाहाकार, नमस्कार, याजन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, यजन, अध्ययन, इत्यादिक करितो आणि तो मृत्युरहित असून मरणारा आहें तसाच इंद्रियरहित असून इंद्रिययुक्त शरीररहित असून मी देही आहें, जन्म घेणारा नसून जन्म घेणारा, सं

सारशून्य असून संसारी, अक्षर ब्रह्म स्वरूप असून मी अक्षरस्वरूप आहें असें ज्ञानानें बोलतो त्यामुळें त्या पुरुषास भगवत्स्वरूप ज्ञान प्राप्त होत नाहीं यास्तव मुक्त होणाऱ्या पुरुषानें मी अशरीरीक असंसारी सच्चिदानंद रूप आहें असें म्हणावें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३१. अध्याय एकशें एकतीस:- वसिष्ठ सांगतात हे जनकराजा, या प्रकारानें अज्ञानी पुरुष, मोह पावलेल्या पुरुषांचें सेवन करितो त्यामुळें तो कोटि सहस्र वेळां जन्म व मरण यांचें ग्रहण करितो यास्तव जन्म व मरणादि यातना नसाव्या म्हणून मुमुक्षु पुरुषानें सत्संग करावा आणि पूर्ण षोडश कलात्मक चंद्रा सारिखा मी पूर्ण, जन्म व मरणादि रहित आहें असें त्यानें वारंवार अनुभवानें पाहावें कारण ब्रह्म मी आहें अशी भावना उत्पन्न झाल्यानें त्यास मोक्ष होईल यास्तव आनंदापासून हीं भूतें उत्पन्न होतात आनंदापासून वृद्धीस पावतात पुन: त्याचे ठायीं प्रवेश करितात असें श्रुतीनीं सांगितलें असतां आनंद कोणता याचा विचार न जाणून तो पुरुष माझा हा देह म्हणून देहावर ममता करितो त्यामुळें जन्मास येतो आतां जो पुरुष त्रिगुणात्मक जी माया इचें सेवन करीत नाहीं तो गुणातीत होऊन मुक्त होतो आणि मायेचें जो सेवन करितो तो बंध पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१३२. अध्याय एकशें बत्तीस:- कराल नामा जनक प्रश्न करितो हे वसिष्ठ ऋषे, पुरुषावांचून स्त्री गर्भधारण करीत नाहीं व स्त्रीवांचून पुरुष पुत्रस्वरूपास उत्पन्न करीत नाहीं तेव्हां अन्योन्य स्त्रीपुरुष संबंधानें शरीरें उत्पन्न होतात तेव्हां अस्थि, शिरा, मज्जा, हे पित्याचे गुण, त्वचा, मांस, शोणित, हे मातेचे गुण, या उभय गुण संबंधाश्रयानें बंध पावलेले प्रकृति पुरुष आहेत. अशीं वेद व शास्त्रें ही बोलतात तेव्हां प्रकृति व पुरुष हे परस्पर नित्य बंध पावलेले असल्यानें पुरुषास मोक्ष कसा होईल आम्हीं तर मोक्षाच्या इच्छेनें तुम्हास प्रश्न करितों यास्तव सांगा. असें ऐकून वसिष्ठ सांगतात हे राजा, तूं वेद शास्त्र प्रमाणभूत हा अर्थ आहे म्हणून बोलतोस परंतु तुला ग्रंथाचें तत्त्व कळलें नाहीं यास्तव तुला सांगतों.

त्वचा, मांस, रुधिर, मेद, पित्त, मज्जा, अस्थि, स्नायु, हे अष्टगुण केवल, एकट्या शुक्रापासून होतात यास प्रमाण द्रोणाचार्यांचें शरीर, तें मातेवांचून केवल एक शुक्रानेंच होऊन वाढलें, धृष्टद्युम्नादिक माता व पिता यांवाचून उत्पन्न झाले आहेत तेव्हां मोक्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें जन्ममरण रहित, अनंत, सर्वदर्शी, निरामय, असा परमात्मा प्रकृति व पुरुष यांहून वेगळेपणानें जो आहे तो मी आहें असें प्रत्यक्ष साक्षात्कार रूप ज्ञान झाल्या शिवाय प्रकृति व पुरुष या उभय संबंधांतून मुक्त होण्याचें दुर्लभ आहे या प्रमाणेंच सांख्य योगाचे ठायीं निपुण बुद्धिमंत पुरुष बोलतात तात्पर्य जीव व ईश्वर यांचें अभेद दर्शन मुळचेंच असून पुरुषास महावाक्यांचा अर्थ न समजल्यामुळें भेद दर्शन पाहतो त्यानें तो मोक्षाविषयीं अधिकारी होत नाहीं यास्तव तूं जीव व ईश्वर यांचा अभेद सत्य आहे असा विश्वास पावून एकत्वरूप अक्षर आहे व नानात्वपणानें क्षर आहे आणि तत्वें पंचवीस आहेत असें जाण म्हणजे तुझी सनातन ब्रह्माचे ठायीं निष्ठा होऊन तूं मुक्त होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१३३. अध्याय एकशें तेहतीस – जनक प्रश्न करितो हे वसिष्ठ ऋषे, अक्षर व क्षर, बंध व मोक्ष, विद्या व अविद्या, सांख्य, योग, यांचा संपूर्ण अर्थ पुनः सांगा असें ऐकून वसिष्ठ सांगतात हे राजा, तुला योग कसा करावा या विषयींचीं लक्षणें सांगतो. प्रथम योगसाधन करणाऱ्या पुरुषानीं ध्यानानें मनाची एकाग्रता करावी नंतर प्राणायाम, मूत्र व मल यांचा उत्सर्ग व भोजन या वेळीं योगसाधन न करितां इतर सर्व काळीं योगानुष्ठान करावें आणि स्थानीं शब्दादि विषयांपासून इंद्रियांचा निरोध करावा या विषयीं प्राणायाम करीत असतां प्रथम ललाटस्थानीं वायुधारण करावा नंतर त्या पुरुषानीं भ्रूकुटीच्या मध्यस्थानीं वायू धरावा, नंतर नेत्रस्थान, जिह्वामूलस्थान, कंठस्थान, नाभिस्थान, इत्यादि अष्टादशस्थानीं वायूचा निरोध केल्यानें त्यांस चित्ताची एकाग्रता रूप जो समाधि तो प्राप्त होतो त्यामुळें देहांत परमात्मा निरंतर राहणारा जो त्याचा साक्षात्कार होऊन ते पुरुष

सर्व संगापासून मुक्त होतात नंतर त्यांचें मन निश्चल पाषाणासारिखेंही तें मग सर्वाभूतीं व्यापक आणि सूक्ष्माहूनही सूक्ष्म, मोठें, आकाशाहून-ही अत्यंत थोर, निरंतर अचल असणारें जें ब्रम्ह स्वरूप त्यास ते योगी पुरुष पाहातात असें योगलक्षण तुला सांगितलें आतां सांख्यज्ञानसांगतों. हे राजा, प्रथम अद्वितीय ब्रम्ह हें एक, अव्यक्त, महत्तत्व, अहंकार, हीं तीन, आकाश, वायु, अग्नि, उदक, पृथिवी, हीं पांच, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हींपांच, श्रोत्र, चक्षु, त्वक्, जिव्हा, घ्राण, हीं पांच वाक्, पाणी, पाद, गुद, उपस्थ, हीं पांच, मन, बुद्धि, हीं दोन. या प्रमाणें हीं पंचवीस तत्वें सांख्यशास्त्रांतील सांगितलीं यांचा मुमुक्षु पुरुषानीं उत्तम रीतीनें विचार करावा आतां क्षेत्र म्हणजे शरीर आणि क्षेत्रज्ञ परमात्मा यांचें जें ज्ञान त्यास सूक्ष्म ज्ञान ह्मणावें याहून शेष राहिलें जें तें अज्ञान जाणावें हे राजा, अद्वितीय ब्रह्मास अक्षर व सर्व भूतास क्षर ह्मणावें असें जाणलें असतां तूं निर्भय होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१३४. अध्याय एकशें चवतीस.– वसिष्ठ सांगतात हे राजा, आतां विद्या अविद्या यांचा अर्थ तुला सांगतों. उत्पत्ति व प्रलय यांस घेऊन असणारी जी विख्यात माया तिला अविद्या म्हणावी व उत्पत्ति प्रलय या रहित असून जी पंचवीस तत्वांचा विचार जाणणारी तिला विद्या म्हणावी या प्रमाणें ऋषीनीं विद्या व अविद्या यांचीं लक्षणें सांख्य शास्त्रावरून सांगितलीं तीं मी कथन केलीं हे राजा, बुद्धींद्रिय जें आहे त्यास विद्या म्हणावी, मन, अहंकार, महत्तत्व, इत्यादिक तत्वांचा जो विज्ञाता त्यास ज्ञानी म्हणावें, आतां जीव व ईश्वर हे भेदरूपानें आहेत म्हणून विवेकी पुरुष बोलतात परंतु चार महावाक्यांचा विचार पाहिल्यानें जीव अभेदरूपानेंच आहे असा विचार मुमुक्षु पुरुषांस होऊन ते जीवन्मुक्त ईश्वररूप होतात यास्तव पूर्वीं सांगितल्याप्रमाणें क्षर व अक्षर यांचा निर्णय जाणून तूं कृतार्थ व्हावेंस कारण सांख्य व योग हे तुलाहित करणारे होतील यास्तव त्यांचा स्पष्ट अर्थ कळावा यामुळें पृथक् सांगितलें परंतु त्या दोहोंत अर्थ एकच आहे यास्तव बुद्धिमंत शिष्यास हे सांख्य शास्त्र शीघ्र सिद्धि करणारें सर्वांहून-

थोर आहे हे राजा, प्रत्यक्ष, अनुमान, भक्ति, ध्यान, इत्यादिकानीं याशास्त्राचा आदर केला असतां पुरुष शोक व मोह यांचा त्याग करून उत्तम ज्ञानानें मोक्षास पावतात. असा विषय या अध्यायांत आहे.

१३५. अध्याय एकशें पसतीस.— वसिष्ठ सांगतात हे करालजनका; बोध आणि अबोध हे दोन आहेत त्यांत बोध परमात्मा व अबोध जीवात्मा या दोहोंचें एकरूप मुळचेंच असतां मायेनें पृथक्‌पणा दाखविला, कारण मी कर्त्ता मी भोक्ता इत्यादिकानीं अहंपणानें तो जीवात्मा स्वस्वरूपास विसरून भेदास पावला त्यानें त्यास ब्रह्मसाक्षात्कार न होतां तो संसारांत निमग्न झाला. या कारणानें जन्म व मरणहीं त्यास सुटत नाहींत या करितां पुरुषानें सांख्यशास्त्रांत जीं पंचवीस तत्वें सांगितलीं आहेत त्यांचा बोध करून घेतला असतां श्रुतीनीं कथन केलेलें जें निर्गुण ब्रम्ह त्याचें ज्ञान पुरुषास होतें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, याप्रमाणें वसिष्ठऋषीनीं करालजनकास सांगितलें तें ऐकून राजा संतोष पावला आतां पुरुष ज्यास पावला असतां पुनर्जन्मास येत नाहीं. असें जें परब्रह्म तें तुला सांगितलें आणि पंचवीस तत्वें सांगून क्षर व अक्षर यांचा निर्णय मी नारदापासून जसा ऐकिला तसा तुला सांगितला कारण हा ब्रह्मसाक्षात्कार पूर्वी ब्रह्मदेवापासून वसिष्ठऋषीस प्राप्त झाला त्यानीं नारदऋषीस सांगितला तो नारदानीं मला सांगितला तो मी तुम्हांस सांगितला. आतां तूं शोकादिकांचा त्याग कर आणि क्षर व अक्षर यांचें स्वरूप जाणल्यांमुळें तूं निर्भय झाला आहेस यास्तव आतां रजोगुण व तमोगुण यांस दूर करून सत्व गुणाचा आश्रय केल्यानें तूं कृतार्थ होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१३६. अध्याय एकशें छत्तीस.— भीष्म सांगतात हे धर्मराजा, कोणी एके समयीं जनकराजाचा पुत्र वसुमान या नामाचा होता तो अरण्यांत मृगया करीत असतां तेथें भृगुवंशांतील कोणी एक ऋषी तप करीत होता त्यास पाहून वसुमानानें जवळ जाऊन त्यास नमस्कार केला आणि प्रश्न केला हे ऋषे, कामाच्या स्वाधीन राहणाऱ्या पुरुषांचा देह नाशिवंत आहे.

तेव्हां त्यास या लोकीं व परलोकीं कोणतें कर्म केल्यानें श्रेयस्कर पुण्य होतें तें सांगा. असें ऐकून ऋषी बोलतो हे राजपुत्रा, इंद्रियांचें नियमन, भूतांवर दया, धर्माचें आचरण, विषय वासना त्याग, ज्ञान प्राप्ती विषयीं अभ्यास, सत्पुरुषास दान करणें, दुसऱ्याचे गुणांवर दोष न करणें, अक्रूरपणा, शुची असणें, दांतपणा, सत्य भाषण, भूतांशीं आर्जव, एक पत्नीशीं गमन, वेदाध्ययन, स्वधर्मीं प्रीति, इत्यादिक धर्मांचें आचरण केल्यानें सर्व पापांचा क्षय होऊन तेज व धैर्य प्राप्त होईल त्यानें तूं त्या लोकीं सुख भोगून परलोकीं श्रेयस्कर पुण्य तुला प्राप्त होईल कारण ययाति राजा पुण्य क्षीण झाला असतांही तपस्वी व धर्मवंत पुरुषांच्या सेवनेंकरून तो उत्तम लोकास गेला यास्तव तूंही उत्तम बुद्धीस पावून कृतार्थ होशील. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, त्या जनक पुत्रानें ऋषीचें भाषण ऐकून धर्माचरणीं बुद्धी त्यानें केली. असा विषय या अध्यायांत आहे.

१३७. अध्याय एकशें सदतीस.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, धर्माधर्मरूप जीं पुण्य पापें, सर्व संशय, जन्म व मृत्यु, इत्यादिकांपासून जें विमुक्त ब्रम्ह त्याचा साक्षात्कार मला सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं याज्ञवल्क्यांचा आणि जनक राजाचा संवाद झाला आहे तो तुला सांगतों कोणी एके वेळीं जनकराजा प्रश्न करितो हे याज्ञवल्क्य ऋषे, प्रकृति सहित इंद्रियादिक तत्वें किती आहेत. व निर्गुण ब्रम्ह कसें आहे हें सांगा असें ऐकून याज्ञवल्क्य सांगतात हे राजा, आठ प्रकृति व षोडश विकार त्यांत अव्यक्त, महत्तत्व, अहंकार, पृथिवी, वायु, आकाश, जल, ज्योति, त्या अष्ट प्रकृती, आतां श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा, घ्राण. हीं ज्ञानेंद्रियें, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे विषय, वाक्, हस्त, पाद, गुद, शिस्न हीं कर्मेंद्रियें, बुद्धि, मन, अशीं हीं चोवीस तत्वें तूं जाण, हे राजा, अव्यक्तापासून महत्तत्व झालें हा प्रथम सर्ग (उत्पत्ति) महत्तत्वापासून अहंकार, हा दुसरा सर्ग, अहंकारापासून मन, हा तृतीय सर्ग, मनापासू पंचमहाभूतें हा चतुर्थ सर्ग, शब्दादि विषय हा पांचवा सर्ग जाणावा, श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांचा सर्ग सहावा, अधोभागीं श्रोत्रेंद्रियांचा सर्ग

दाय हा सातवा सर्ग, ऊर्ध्व प्रवाहरूप प्राण समुदाय हा आठवा सर्ग, नाभिमध्यस्थ राहणारा समान हा नवम सर्ग, असे नऊ सर्ग तुला सांगितले. असा विषय या अध्यायांत आहे.

१३८. अध्याय एकशें अडतीस:- याज्ञवल्क्य सांगतात हे जनक राजा, उपासना करण्या करितां अव्यक्त भावास पावलेल्याची काल संख्या मीं तुला सांगतों. दशकल्पांच्या सहस्रावधि संख्येचा दिवस व त्या प्रकारें रात्रीची संख्या अशी एक अहोरात्रींत संख्या अव्यक्ताची सांगितली त्या अव्यक्तापासून वासनामय जें अंड झालें त्यापासून ब्रम्हदेव उत्पन्न होऊन त्यानें तीन लोक केले नंतर स्वर्ग व पृथिवी या दोहोंच्या मध्य भागीं त्या ब्रम्हदेवानें आकाश निर्माण केलें म्हणून श्रुतींत सांगितलें आहे त्याची संख्या दशकल्पांच्या सहस्रावधिज्या त्याचा एक दिवस तितकीच रात्रीची संख्या आहे असें वेदार्थ जाणणारे मुनी बोलतात आतां पूर्वी अव्यक्त जें सांगितलें त्यापासून महत्तत्व, त्यापासून मन बुद्धि, अहंकार, चित्त, हीं तत्वें झालीं. या चार तत्वांस चार पुत्र ब्रम्हदेवानीं उत्पन्न केले असें सांगितलें आहे. आतां अहंकारापासून पृथिवी, वायु, आकाश, उदक, ज्योति, हीं पंचमहाभूतें झालीं. व श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियें आणि वाक्पाणि इत्यादि पंच कर्मेंद्रियें, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे पंचविषय अशीं पंचवीस तत्वें सांगितलीं त्यांत मन श्रेष्ठ आहे हे जनक राजा, चतुर्दशलोक, जे आहेत त्यांस, त्या भूतानीं वेष्टिलें आहे आतां पुरुष मनानें पाहातो तें मन व्याकुल झालें असतां नेत्रांस दिसत असतांही दिसत नाहीं या प्रकारानें सर्व इंद्रियें मनाच्या आधीन आहेत तेव्हां मन शांत झालें म्हणजे इंद्रियें शांत होतात. यास्तव सर्व इंद्रियांचें मन ईश्वर आहे म्हणून सर्व भूतें मनाचे ठायीं प्रवेश करितात:- असा विषय या अध्यायांत आहे.

१३९. अध्याय एकशें एकुण चाळीस:- याज्ञवल्क्य सांगतात हे जनकराजा, तुला तत्वांची व कालाची संख्या सांगितली? त्याच अनुक्रमानें संहार सांगतों. नित्य जें ब्रम्ह त्यानें अहंकाराभिमानी महा रुद्रास संहार करण्याविषयीं प्रेरणा केली नंतर तो महा रुद्र शत सूर्याचें स्वरूप धारण करून तो बारा प्रकारचा आपण आदित्य झाला आणि त्यानें जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिज्ज, हें चार प्रकारचें स्थावर जंगमात्मक जग अग्नि सारखें दहन केलें; नंतर संपू-

णे पृथिवी कूर्माच्या पाठीसारखी झाली तेव्हां सूर्यानें आपल्यापासून उत्पन्न केलेल्या उदकानें पृथिवी भरली आणि त्यानें कालाग्नी रूपानें तें उदक नष्ट केलें नंतर तो माहान् अग्नि भयंकर दिसोंलागला हें पाहून अष्ट प्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या वायुनें तो अग्नी भक्षण केला आणि त्या वायुचें त्रैलोक्यांत भय उत्पन्न झालेलें पाहून आकाशानें तो वायु हरण केला. आकाश मनाचे ठायीं नाश पावलें, तें मन अहंकाराचे ठायीं, अहंकार महत्ताचे ठायीं तें महत्तत्व ज्ञेय स्वरूपाचे ठायीं, तें ज्ञेयस्वरूप सर्व भूतांच्या हृदयस्थ असून बुद्धीस प्रवर्त्तक करणारें जें तोच एक अवयवानें अंगुष्ठमात्र स्वरूपी अंतरात्मा श्रुतींत सांगितलेला ईश्वर आहे. त्याचें हरण करून राहाणारें केवलक्षय, परिणाम, इत्यादिकानीं रहित आणि वर्तमानकाल, पूर्वीं गेला जो काल तो भूतकाल, पुढें येणारा जो काल तो भविष्यकाल या तीन कालांस उत्पन्न करणारें असून माया स्पर्शरहित असें जें निर्गुण ब्रम्ह त्याचा मात्र नाश नाहीं. हे जनकराजा, हा संहार तुला सांगितला आतां पुढील अध्यायांत अध्यात्म, अधिभूत. अधिदैव, यांचीं लक्षणें तुला सांगतों. असा विषय या अध्यायांत आहे.

१५० अध्याय एकशें चाळीस:— याज्ञवल्क्य सांगतात हे जनकराजा, पुरुषाचे पाद हें अध्यात्म, गंतव्य हें अधिभूत, विष्णु ही अधिदेवता, गुद हें अध्यात्म, विसर्ग ( शौच ) होतो तें अधिभूत, मित्र हें अधिदैवत, उपस्थ हें अध्यात्म, आनंद हें अधिभूत, ब्रम्हदेव हें अधिदैवत, हस्त हें अध्यात्म, कर्तव्य हें अधिभूत, इंद्र हा अधिदैवत, वाक् हें अध्यात्म, वक्तव्य हें अधिभूत, अग्नि हें अधिदैवत, चक्षु हें अध्यात्म, रूप हें अधिभूत, सूर्य हें अधिदैवत, श्रोत्र हें अध्यात्म, शब्द हें अधिभूत, दिशा हें अधिदैवत, जिव्हा ही अध्यात्म, रस हा अधिभूत, वरुण हा अधिदैवत, घ्राण हें अध्यात्म, गंध हा अधिभूत, पृथ्वी ही अधिदेवता, त्वचा ही अध्यात्म, स्पर्श हें अधिभूत, वायु हा अधिदैवत, मन हें अध्यात्म, मंतव्य हें अधिभूत. चंद्रमा हें अधिदैवत. अहंकार हें अध्यात्म, अभिमान हा अधिभूत, रुद्र हा अधिदैवत, बुद्धि ही अध्यात्म, बोधव्य (जाणणें) हें अधिभूत, क्षेत्रज्ञ हा अधिदैवत, या प्रकारानें तत्वांची सृष्टि समाधि.

प्रलय, यांच्या विस्तारें करून एक अद्वितीय ब्रम्ह त्याचीच संपूर्ण हैतरूप विभू ती दाखविली. हे राजा, स्वच्छंदानें क्रीडार्थ स्वाप्नि (गाढनिद्रा) व प्रबोध (जागृत) आणि रात्रिव दिवस तसेंच चक्षूचें उघडणें व मिटणें या सारिखें महत्तत्वादिक पंचवीस तत्वांस उत्पन्न करणारी जी अविद्यारूपमाया जसे मनुष्य एक दीपा पासून सहस्त्रावधिदीप करितात तशी ती आपल्या पासून पुरुषांस सहस्त्रावधि गुण उत्पन्न करिते तेव्हां मुमुक्षु पुरुषांस क्रमानें मोक्ष फल यत्नावांचून आपणच होईल यास्तव त्यानीं आशा करूं नये कारण मायेचें कार्य हें जग आहे यास्तव मी मायातीत आहें असें जाणल्यानें मुमुक्षु पुरुष कृतार्थ होतो. आतां सत्व व रज तमोगुण यांचीं लक्षणें सांगतो. धैर्य, ऐश्वर्य, आनंद, प्रीति, प्रकाश, सुख, शुद्धपणा, आरोग्य, संतोष, श्रद्धा, अकृपणपणा, कोपशून्यपणा, क्षमा, धैर्य, अहिंसा, समता, सत्य, ऋणरहित, मृदुपणा, लज्जा, अचापल, शौच, आर्जव, सर्वभूतीदया, हे सत्वाचे गुण जाणावे. रूप, ऐश्वर्य, कलह, अत्याग, अकरुणा, सुख व दुःख यांचें सेवन, अहंकार, चिंता, काम, क्रोध, मद, इत्यादिक हे रजाचेगुण; मोह, अप्रकाश, मरण, क्रोध, नृत्य, वादित्र, (वाद्य) गीत यांची भक्ति. इत्यादिक हीं तमोगुणाचीं लक्षणें; हे जनक राजा त्या तीन गुणाचीं पृथक् पृथक् लक्षणें तुला सांगितलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१४१. अध्याय एकशें एकेचाळीस:– याज्ञवल्क्य सांगतात. हे जनक राजा, प्रकृतीचे हे तीन गुण संपूर्णजगांत व्यापकपणानें राहात आहेत आतां जो निर्विकार परमात्मा तो आपले सत्तेनें माये पासून असंख्यात जीवांस निर्माण करितो. हे राजा, सात्विक पुरुष देव लोकादि उत्तम स्थानांस पावतात, रजोगुणी पुरुष मनुष्यलोकीं, तामस पुरुष पशु पक्ष्यादिनीच योनीचे ठायीं पावतात. आतां पुण्यपाप रहित जे विचारवंत पुरुष, ते त्यातीन गुणा पासून मुक्त होऊन ते शाश्वत मोक्ष स्थान परब्रम्ह जें त्यास पावतात. तेव्हां प्रकृति लोहा सारिखी; जड तिला अयस्कांत (लोहचुंबक) तुल्य जी ब्रम्ह सत्ता तीनें प्रेरणा करिविली ती जगाची उत्पत्ति व संहार यांस करिते असें ऐकून जनक प्रश्न करितात हे याज्ञवल्क्यऋषे, प्रकृतिआ-

णि पुरुष हे अचल एकरूपी असतां यांचा पृथकपणा कसा होतो, मोक्षधर्माची उपासना करण्याविषयींचीं लक्षणें, मरणारा देही जो त्यास कोणतें स्थान प्राप्त होतें, सांख्यज्ञान व योग, यांचीं पृथक् लक्षणें सांगा? असा प्रश्न जनकानीं याज्ञवल्क्यास केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४२. अध्याय एकशें बेचाळीसः— याज्ञवल्क्य सांगतात हे जनकराजा, निर्गुण परमात्म्यास सगुण करावें म्हणून कोणी पुरुष समर्थ होणार नाहीं तर तोच परमात्मा सगुण व निर्गुण कसा जाणावा म्हणशील तर या विषयीं सांगतो. ज्या वेळीं गुणाशीं युक्त परमात्मा होतो त्यावेळीं निर्गुणपणानें तसाच असणाऱ्यास हा सगुणपणा धारण करणारा परमात्मा आहे असें मुनी बोलतात. तेव्हां गुण स्वभाव परमात्मा असून अव्यक्त व गुण रहित अशा स्वरूपानें तो राहातो. आतां अज्ञानी पुरुष स्वभावानेच आरोपित बुद्धिपणानें त्या गुणांचे सेवन करितो, त्या योगानें तो आपलें मुळचें स्वरूप गुण रहित जें आहे त्यास जाणत नाहीं ज्ञानी पुरुष म्हणतो कीं मी गुणाचें सेवन करीत नाहीं व तो आत्म्याहून अन्य भोग्य दुसरा अर्थ आहे असा अभिमान धारण करीत नाहीं या कारणानें माया, अचेतन रूप आहे आणि पुरुष चेतन स्वरूप आहे. यास्तव पुरुष अज्ञानानें जन्म व मरण ही वारंवार गृहण करितो. जो कालपर्यंत आत्म्यास जाणत नाहीं तो कालपर्यंत हा अज्ञानी पुरुष मुक्त होत नाहीं तेव्हां मायेचा एकपणा असून पुरुषांचा भिन्नपणा झाला आहे असें सर्वभूती दयावंत पुरुष बोलतात. यास्तव जसे मशक आणि उदुंबरहीं एकेजागीं असून उदुंबराच्या संयोगानें मशक लिप्त होत नाहींत तसें पृथक् मत्स्य आणि उदक हीं पृथक् आहेत परंतु दोघांचा एक्या उदकांत संयोग असतांही मत्स्य लिप्त होत नाहीं तसें, अथवा जसे अग्नि आणि मृत्तिकेचा घट हे एके जागीं संयोगास पावले असतांही अग्नी घटाच्या स्पर्शानें लिप्त होत नाहीं व जसें कमल आणि उदक यांचा संयोग असतांही उदकाच्या स्पर्शानें कमल लिप्त होत नाहीं या प्रकारें चार दृष्टांतानीं सांगितल्या प्रमाणें प्रकृति आणि पुरुष यांचा भेद पृथक्पणाचा आहे असें ज्ञानी पुरुष जाणून मुक्त होतात. तसें अज्ञानी पुरुष हा विचार पाहात नाहींत त्यानें ते घोर

नरकांत वारंवार पडतात हे जनकराजा, तुला हें सांख्य ज्ञान सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१४३. अध्याय एकवों त्रेचाळीस.— याज्ञवल्क्य सांगतात. हेजनक राजा, तुला सांख्यज्ञान सांगितलें आतां योगज्ञान सांगतों. सांख्य व योग यांस जे पृथकू पृथक् पाहातात ते पुरुष अज्ञानी होत. हे राजा, आम्हीं सांख्य व योग मिळून एकच आहे असें पाहातों कारण योगीजें ब्रम्ह पाहातात तेंच सांख्यज्ञानी पाहातात यास्तव एक पाहाणाऱ्या पुरुषास हा तत्ववेत्ता आहे असें योगी बोलतात आतां योगाचें लक्षण सांगतों हे राजा, अणिमादि अष्टैश्वर्य गुणानीं युक्त अष्टांग योग आहे त्यांत प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, तर्क, समाधि, हींसाहा अंगे मैत्रायणीय, उपनिषदांत सांगितलीं. व यम नियम हे श्रुतींत अन्यप्रकारें बोलिले असा अष्ट संख्यानीं गुणित योग मनीषी बोलतात, व कोणी सगुण आणि निर्गुण असा दोन प्रकारचा योग आहे असें बोलतात, हे राजा, प्राणनिग्रह पूर्वक मनाची एकाग्रता करणे यास प्राणायाम म्हणतात तो केल्यानें तें मन निर्गुण ब्रम्हाचे ठायीं स्थिर होतें नंतर योगीप्राण त्यागसमयीं कफ व वातादिकांचें भय न पावतां मुक्त होतात यास्तव वाताधिक्य न होईल म्हणून अशा प्रकारानें योगाभ्यास करावा. योग्यानें रात्रीच्या प्रथम प्रहरीं विष्णूचें ध्यान करावें नंतर द्वितीय प्रहरीं या देहाचे ठायीं बावीस स्थानें शिवयोग ग्रंथांत सांगितलीं आहेत त्यांचें ध्यान करून इंद्रिय समुदाय मनाचे ठायीं मन अहंकाराचे ठायीं अहंकार बुद्धिचे ठायीं. बुद्धि मूल प्रकृतीचे ठायीं, अशा प्रकारानें त्यानें इंद्रियादिकांचा प्रतिसंहार करून नित्य व अनंत इत्यादि लक्षणानीं युक्त जें ब्रम्ह त्याचे ठायीं चित्ताची एकाग्रता करावी. आणि ब्रम्ह सुखाचा अनुभव घेत समाधी लावावा. जसा वायुरहित देशीं दीप निश्चल राहातो तसा असावा नंतर त्या योग्यास समाधींतून उठविण्यास शंख व नगारे यांचा शब्द केला असतां समाधींतून हलत नाहीं. जसा पुरुष तेलाचें पात्र भरलेलें हस्तावर घेऊन पाहिऱ्या चढून घरपावतर गेला असतां त्या पात्रांतून एक बिंदुही सांडत नाहीं तसा योगी मनाच्या एकाग्रपणानें इंद्रियांचें निश्चलत्व करून समाधी लावणारा तो स्वच्छंदानें आ-

पला देह टाकून ब्रम्हरूप होतो या प्रकारानें श्रुतींत सांगितलेल्या योगाचा आश्रय करून बुद्धिमंत पुरुष कृतकृत्य झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४४. अध्याय एकशें चवेचाळीस:- याज्ञवल्क्य सांगतात हे जनकराजा, पुरुष राज योगाने मोक्षास पावतो असें तुला पूर्वी सांगितलें आतां हठयोगाचें लक्षण सांगतों या देहीं जीं जीं आधार स्थाने आहेत त्या त्या स्थानांतून मनासहित वायु धारण केल्याचें उत्क्रमण करून गमन करणारा योगी ज्या ज्या देवलोकीं जातो तीं स्थाने सांगतों प्रथम पाद स्थानांतून वायु निघाल्यानें विष्णु लोकीं, जंघा स्थानांतून काढल्यानें अष्ट वसूंच्यालोकीं, जानू पासून साध्य देवांच्यालोकीं, गुद स्थाना पासून मित्राचा लोकीं, जघना (पृष्टभाग) तून पृथिवी स्थानीं ऊरू पासून वायू काढल्यानें प्रजापतीचें स्थानीं पार्श्वभागाहून मरुत देवाच्या लोकीं, नाभीपासून इंद्रलोकीं, उरापासून वायू काढल्यानें रुद्र लोकीं, कंठापासून मुनिश्रेष्ठ नर जो त्या लोकीं, मुखांतून विश्वे देवांच्या लोकीं, श्रोत्रापासून दिशास, नेत्रांतून अग्निलोक, भ्रुकुटीपासून काढल्यानें अश्विन देवांचें स्थान, ललाटानें पितृ लोक, ब्रम्हरंध्रांतून वायू निघाल्यानें व्यापक ब्रम्ह जें त्याचे ठाईं जातों, हे राजा, हीं स्थानें वायूचें उत्क्रमण करणाऱ्या योग्यास प्राप्त होतात आतां मरण काल येण्याचे समयीं अरिष्टें जीं येतात तीं सांगतों ज्या पुरुषास अरुंधती नक्षत्र दिसत नाहीं ध्रुव, पूर्णचंद्र, दीप. यांस दक्षिणेकडे झालेला प्रकाश पाहणाऱ्या पुरुषांस एक संवत्सरपर्यंत आयुष्य आहे असें जाणावें. तसेंच परांच्या चक्षूचे ठायीं आपणास जे न पाहातात त्यांसही संवत्सर पर्यंत आयुष्य व देहास विकार झाल्यामुळें अत्यंत तेज, अत्यंत बुध्दि, किंवा निस्तेज, बुद्धिहीन, ब्राम्हणाशीं विरोध, देवांची अवज्ञा, हीं चिन्हें झालीं म्हणजे त्यास साहा मासानें मृत्यु येणार, असें लक्षण दुसऱ्यानीं जाणावें. आतां चंद्र व सूर्य यांचे मंडलास छिद्र पाहाणारे, सुगंधी पदार्थास दुर्गंधी शवासारिखे वास घेणे, देवालयीं बसणें, या लक्षणानीं युक्त जे होतील त्यांस सप्त रात्रींत मृत्यु नेईल असें विद्वान पुरुष जाणतात आणि कर्ण व नासिकही कांहीं वाकडीं, तसे दात व दृष्टी भिन्न होणें, ज्ञानाचा लोप, जठराग्नीस मांद्यपणा, अकस्मात वामनेत्रांस उदकाची धार लागलेली, मस्त-

झांकून धूर निघणें, हीं लक्षणें झाल्यानें तत्काल मृत्यु त्यास नेईल असें जाणावें, हे राजा. अशीं हीं अरिष्टें जाणून ज्यास मरूं नये असें वाटेल त्यानें सर्व गंध व सर्व रस यांचें धारण करावें ह्मणजे योगाभ्यासानें तो योगी मृत्यूस जिंकून मोक्षास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१४५. अध्याय एकशें पंचेचाळीस:— याज्ञवल्क्य सांगतात हे जनकराजा, मला सूर्यापासून यजुर्वेद व परब्रम्ह साक्षात्कार प्राप्त झाला यांविषयीं चा इतिहास तुला सांगतों. मी पूर्वी मोठें तप करून सूर्यनारायणाची आराधना केली त्या योगानें सूर्य, साक्षात् येऊन मला बोलिले कीं, हे याज्ञवल्क्या, मी प्रसन्न झालों वर माग असें ऐकून मी सूर्यास नमस्कार करून बोललों हे सूर्यनारायणा, जर तुम्ही प्रसन्न आहां तर यजुर्वेद मला शीघ्र प्राप्त व्हावा अशी इच्छा आहे यास्तव सांगा. असें ऐकून सूर्यनारायण बोलतात हे ब्राम्हणा, यजुर्वेद तुला देतों तो कसा वाणीरूप सरस्वती तुझ्या शरीरांत प्रवेश करील असें बोलून मला म्हणतात हे द्विजा, तूं आपलें मुख पसर नंतर मी मुख उघडलें तों माझ्या मुखांत सरस्वतीनें प्रवेश केला तों माझ्या शरीराचा दाह झाला तेव्हां मी उदकांत प्रवेश केला हें पाहून सूर्यनारायण बोलतात हे द्विजा, मुहूर्त्तपर्यंत तूं या दाहाचें सहन करावेंस नंतर तुझा देह शीतरूप होईल असें ऐकून पाहातों तों दोन घटका नंतर माझा देह शीतल झाला हें पाहून सूर्यनारायण बोलतात हे द्विजर्षभा, दुसऱ्या शाखेंतील आपल्या शाखेंत पठण करण्याचें त्यास खिल म्हणतात त्या सहित व उपनिषदांसहित यजुर्वेद तूं निर्माण करशील आणि मोक्षाविषयीं तुझी बुद्धि निर्मल होऊन तुला ब्रम्हसाक्षात्कार होईल असें बोलून भगवान् सूर्य अदृश्य झाले. नंतर मी आपले गृहीं आलों आणि सरस्वतीचें चिंतन केलें तों ती सरस्वती ओंकार, स्वर, व्यंजन, यांहीं अलंकृत अशी प्रगट झाली नंतर मी तिला आपला मनोरथ निवेदन केला. मग तिच्या आज्ञेनें शत पथ संख्यारूप सरहस्य असा यजुर्वेद करून त्याच्या पंधरा शाखा केल्या आणि त्या यजुर्वेदाचें अध्ययन शिष्यास सांगितलें हें पाहून आमचा मातुल वैशंपायन त्यास विप्रिय वाटलें नंतर माझे शिष्य सांग यजुर्वेदाचें अध्ययन करून परम हर्षित होऊन ते आपआपले स्थानीं गेले,

नंतर हे राजा, वेदांत ज्ञानानें निपुण असणारा जो विश्वावसु गंधर्व तो येऊन त्या नें चोवीस प्रश्न करून त्याचा अर्थ सांगा म्हणून तो मला बोलिला व देहादिकांचा अहंकार च्छेद करणारी आन्वीक्षिकी (देहादिकांचा अहंकार छेद करणारी) विद्या सांगा असा पंचविसावा प्रश्न त्या गंधर्वानें केल्या नंतर हे जनकराजा मी बोललों हे विश्वावसु गंधर्वा, तूं मुहूर्त पर्यंत या स्थानीं रहा असें त्या गर्धवा स सांगून मी पुनः सरस्वती देवीचें चिंतन केलें नंतर मला सरस्वतीचे प्रसा दानें त्या गंधर्वाच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याविषयीं सामर्थ्य प्राप्त झालें आतां त्या गंधर्वाचे प्रश्न व त्या प्रश्नांचीं अनुक्रमानें उत्तरें सांगतों हे राजा, विश्वाही माया, अविश्वा हा आत्मा, विश्वाश्व हा सर्वव्यापी निष्कल आत्मा, अश्व वअश्वा हे प्रकृति, पुरुष; मित्रपुरुष वरुण प्रकृति, ज्ञान प्रकृति, ज्ञेय निष्कल, अज्ञ जीव, ज्ञ ईश्वर, पुरुष निर्गुण ब्रह्म, तपा प्रकृति, अतपा निष्कल, अवेद्यमा या, वेद्य पुरुष, चला प्रकृति, अचल कारण, निश्चल पुरुष, सूर्याद सूर्य, विद्या ज्ञान, अविद्या, अज्ञान, वेद्य मूल प्रकृति, अविद्य पुरुष, अज नित्य, अक्षय परमात्मा, या प्रकारांनीं त्या गंधर्वास सांगितलें आणि बोलिलों कीं हे गंधर्वा, पुरुषानें त्या पंचवीस प्रश्नांचा पूर्ण विचार केला असतां त्यांस जीवन्मुक्तता प्राप्त होते. असें ऐकून विश्वावसु मला प्रश्न करितो हे याज्ञवल्क्यऋषे, कोणी ब्राम्हण वेदाचें अध्ययन करून त्याचा अर्थ जाणत नाहींत त्या ब्राह्मणांस वेद्य जें ब्रम्ह याचा अनुभव प्राप्त होत नाहीं तेव्हां ते केवल मूढबुद्धि भार वाहक आहेत असें तुम्हीं सांगितलें यास्तव पंचवीस तत्वांचा संशयरहित निश्चयार्थ सांगा पूर्वी याविषयीं जैगीषव्य व देवल, सनत्कुमार आणि शुक्र, इत्यादिकांचा संवाद मी ऐकिला आहे त्यांत ब्रम्हसाक्षात्कार आम्हांस प्राप्त झाला आहे असें ते नित्य बोलत आहेत या कारणास्तव तुम्हांस सूर्यापासून जें ज्ञान प्राप्त झालें तें संपूर्ण मला सांगा असें ऐकून याज्ञवल्क्य सांगतात हे गंधर्वा, पुरुष प्रकृतीस जड आहे असें जाणतो परंतु प्रकृति जड असल्यामुळें पंचविंशति तत्वात्मक ज्ञान स्वरूप, पुरुषास जाणत नाहीं यास्तव जसा मत्स्य उदकामध्यें सर्व क्रीडा करितो आणि त्याच्या आंत व बाहेर सर्वत्र उदक व्यापक आहे तसा हा पुरुष, देहादिकांवर भावना ठेवितां मी ब्रम्ह

आहें असा अनुभव झाल्यानें तो योगी मत्स्या सारिखा ब्रम्हानंदांत क्रीडा करि तो अशा प्रकारानीं श्रुतींत सांगितलेला अनुभव त्या विश्वावसू गंधर्वानें ऐकून घेतला आणि तो बोलतो हे ऋषे, ब्रम्हानुभव खरेपणानें तुम्हीं सांगितला तो ऐकून मी कृतार्थ झालों सर्वस्वी तुमचें कल्याण असो. याज्ञवल्क्य सांगतात हे जनकराजा, तो गंधर्व, मला प्रदक्षिणा घालून परम संतोषानें विमानारूढ होऊन गंधर्वलोकीं गेला या प्रकारें बहुत सांगून म्हणतात हे जनकराजा, तूं कृतार्थ आहेस आतां विशोक होऊन गमन करावें तुमचें कल्याण असो. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या प्रकारानें उपदेश करविलेला जनकराजा परम आनंदास पावून त्या राजानें याज्ञवल्क्यास प्रदक्षिणा घातली. याज्ञवल्क्य निघोन गेल्यावर जनक राजानें स्वर्ण व रत्नांजलि यां सहित कोटिसंख्या गायी ब्राह्मणांस दान केल्या आणि विदेह राज्यावर पुत्राची स्थापना करून आपण मोक्ष धर्म संपादन केला. हे धर्मराजा, सांख्य ज्ञान व संपूर्ण योगशास्त्र यांचें अध्ययन करणारा जनकराजा ब्रम्ह साक्षात्कार पावून ब्रम्हानंदांत निमग्न झाला या प्रकारें गृहस्थाश्रमीं असून जनकराजा ब्रम्ह स्वरवाच्या अनुभवानें कृतार्थ झाला, यास्तव त्या राजाची कीर्ती सर्वत्र विख्यात झाली. हे धर्मराजा, या प्रकारें याज्ञवल्क्याचा व जनक राजाचा संवादरूप जो उपनिषद्भाग याचें श्रवण करणारा पुरुष मोक्षास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१४६. अध्याय एकशें शेचाळीस:- धर्मराज प्रश्न करितात. हे भीष्मा,- महान् ऐश्वर्यादिक प्राप्त झालेला पुरुष रसायनादि उपायें करून किंवा अन्य कोणत्याही उपायानीं जरा व मृत्यु यांस पावत नाहीं याचें कारण सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं पंचशिख ऋषीचा आणि जनकाचा संवाद सांगतों कोणी एकेवेळीं जनकराजा प्रश्न करितो हे पंचशिखऋषे, गृहस्थाश्रमामध्यें असणारा पुरुष तप, बुद्धि, कर्म, बहुत श्रवण, यांतून कोणतें आचरण केल्यानें तो जरा व मृत्यु यांचें अतिक्रमण करील हें सांगा. असें ऐकून पंचशिख ऋषी बोलतो हे जनकराजा, जन्म व मृत्यु यांपासून निघणारा कोणी नाहीं कारण सर्वभूतांचा समुदाय जन्म व मृत्यु या प्रवाहांत निमग्न झाला आहे, जसे आकाशीं मेघ समुदाय वायूच्या योगानें

उत्पन्न होतात व लयपावतात. तसे बलवंत, दुर्बल, लहान, थोर, यांतून कोणी असोत. त्यांस जन्म व मृत्यु हे लांडग्या सारिखे भक्षण करणारे आहेत, आतां यांतून मुक्त होणाऱ्या पुरुषाचीं लक्षणें सांगतों. पुरुषानें स्त्रिया, बंधू, पशू, गृहादिक, हे माझ्याहून वेगळेपणानें असून यांचा व माझा अत्यंत सहवास नाहीं व मी कोठून आलों, कोण आहें, कोठें जातों इत्यादिक विचारानें त्या पुरुषानें जाणावें आणि देहातीत परमात्मा सर्वांभूतीं व्यापक जो आहे तो मीच, परमात्म्याहून वेगळा दुसरा कोणी नाहीं, याप्रकारेंच धर्माचें आचरण पूर्वक मोक्षमार्गीं निष्ठा ज्या पुरुषाची झाली तो पुरुष जन्म व मृत्यू यांचें अतिक्रमण करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

१४७. अध्याय एकशें सत्तेचाळीस.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, गृहस्थाश्रमाचे धर्म न टाकून कोणता पुरुष मोक्षास पावला हें व देहत्रयातीत मोक्षाचें जें परम तत्व आहे तें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं ब्रम्हनिष्ठ सुलभेचा व कराल जनकाचा संवाद तुला सांगतों. पूर्वीं धर्मध्वज म्हणून जनक या नांवें राजा मोक्षशास्त्र जाणणारा होता तो आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेवून पृथिवीचें राज्य करीत असतां सत्ययुगीं कोणी एक संन्यासाश्रम घेणारी सुलभा या नामानें विख्यात योगिणी होती म्हणजे स्त्रियांस विवाह झाल्याचे पूर्वीं किंवा वैधव्य प्राप्त झाल्यावर सन्यासाविषयीं अधिकार आहे. या वरून ती योग धर्मीं परमनिष्णात असून सर्व जगांत फिरत असतां कोणी एकेवेळीं मिथिला नगरीचा राजा जनक मोक्ष शास्त्रांत निपुण आहे असें तिनें कोणी सन्याशापासून ऐकिलें तेव्हां त्या राजाची भेट घ्यावी म्हणोन तिनें आपलें पूर्वीचें रूप टाकून योग सामर्थ्यानें सुंदर तरूण रूप धारण केलें आणि ती निघाली ती जनकराजाच्या गृहीं येऊन तीनें राजास पाहिलें तों त्या राजानें तिचा सत्कार करून आदर पूर्वक तिला भोजन दिलें नंतर तिनें योग बलाच्या आश्रयानें राजाचें चित्त बंधन केलें. हा तिचा अभिप्राय राजानें जाणून तिला वश न होतां राजा बोलतो हे त्रिदंड सन्यास घेणाऱ्या स्त्रिये, तूं हा आश्रम कोठें धारण केलास व कोठून येऊन कुठे जातेस हें मला सांग, मी तर पंचशिख या नामें विख्यात जो ऋषी त्याचा शिष्य आहें यास्तव सांख्य ज्ञान व योग यांचा सिद्धांत म-

ला सर्व खरा कळला आहे त्या योगें मीं राज्यादिकांचा उपभोग घेत असतां सुख दुःखादि द्वंद्वा पासून मुक्त आहें कारण जो बुद्धियोग म्हणतात तो मला प्राप्त झाला त्या कारणानें सुखी, सर्व मनोरथ पूर्ण, मातीचा गोळा व लोह, सोनें यांस सारिखें पहाणारा, राज्यावर असून संगरहित, यम व नियमादिक जीं यांचीं लक्षणें जाणणारा, सर्व आश्रमाचीं लक्षणें पहाणारा, सर्व शास्त्रांत निपुणता, मोक्षधर्मीं निष्णात, इत्यादि बहुप्रकारानीं त्या सुलभेस राजा आपले गुण सांगून म्हणतो कीं हे सुलभे, तूं माझा ब्रम्हभाव जाणून माझ्या दर्शनार्थ आलीस किंवा तुझें येण्याचें कारण काय आहे तें सांग. असें ऐकून ती सुलभा बोलते हे जनकराजा, अष्टादश गुणानीं युक्त वाक्य आहे तें समजलें म्हणजे पुरुषास तें वाक्य बुद्धिदोषादि व कामादि दोष जे आहेत त्या दोषांरहित समजलें असें जाणावें त्यांत पंच लक्षणानीं युक्त वाक्य जें, तें प्रमाणभूत आहे कारण, संशय होण्यास गोचरी भूत, पूर्व पक्ष आणि सिद्धांत यांचे ज्ञानासहित सांख्य शास्त्र, गुणदोष यांचे व्याख्यान करणें हा क्रम सांगितलेल्या गुणदोषांचा बलाबल विचारानें जो निर्णय करणें, प्रयोजन जाणणें, या विषयीं अनुष्ठान, त्या लक्षणानीं युक्त वाक्य जाणावें. हे राजा, जीं पांच लक्षणें सांगितलीं त्यांत एकेकाचें पद, वाक्य, पदार्थ, वाक्यार्थ, त्या चार प्रकारच्या भेदानें दरपदाचे ठायीं सांगितलेल्या उदाहरणा वरून जाणावें आतां ज्या विषयावर वाक्याची प्रवृत्ति झाली त्याचे अर्थ अनेक प्रकारचे असतां ज्या पुरुषाच्या बुद्धीस सिद्धांत कळत नाहीं त्या सूक्ष्म वाक्याचा कठीणपणा जाणावा, दोष आणि गुण या विषयीं पूर्वपक्ष करणें आणि प्रमाणानें सिद्धांत समजणें हें सांख्य लक्षण, पूर्वीं कोण तें बोलावें हें ज्ञान, पश्चात् उत्तर बोलावें असें जें समजणें यास क्रम योग म्हणावा. धर्म व काम, अर्थ, मोक्ष या विषयीं प्रतिज्ञेनें हाच सिद्धांत म्हणून खरें प्रतिपादन करितो त्यास निर्णय म्हणावें; आत्म ज्ञान सेवना विषयीं जो यत्न तो सुख करणारा आहे यास्तव अवश्य करावा व इच्छादिकां पासून दुःख होते तेव्हां त्यांचा त्याग अवश्य करावा यास प्रयोजन म्हणावें, या प्रकारें वाक्य जाणणारे पंडित कथन करितात तें मीं तुला सांगितलें. कारण सर्व श्रुतींत अर्थ जो सां-

गिनला आहे त्याची एकार्थता समजण्या विषयीं हीं सूक्ष्मादिक पांच लक्ष-णें जाणलीं असतां पुरुषास वाक्यार्थ खरा समजतो वास्तव वाक्याचे गुण-ही तुला सांगतें. श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, सुशब्द, समाधि, गांभीर्य, विस्तर, संक्षेप, गति, रिति, उक्ती, प्रौढी, इत्यादि गुणानीं युक्त वा-क्यार्थ समजला असतां न्याय शास्त्राच्या लक्षणांसही विरोध येत नाहीं. काम, क्रोध, लोभ, भय इत्यादिकांनीं व गर्वानें मी बोलतें असें नाहीं तर ज्या बोलण्यांत वक्ता, श्रोता, वाक्य, यांत विकलपणा न येतां जें बोलणें शोभतें त्यास पंडित योग्य म्हणतात. असे हे वक्त्याचे गुण तुला सांगितले आतां वादी व प्रतिवादी हे आपआपले पक्षाचा आग्रह धरून बोलूं लागलेतर निर्णय कधींच होणार नाहीं यास्तव वक्ता कोणास म्हणावें ज्या पुरुषानें वक्तृत्व केलें असतां श्रोते जे आहेत त्यांस विरुध्द अर्थाविषयींचीं भाषणें न घेतां बरोबर अर्थ असल्यानें समजतो त्यासच वक्ता असें बोलावें. हे राजा, मी सुलभा, तूं राजा, अन्य प्राणी यांचे ठायीं परमात्म्याचा अं-श आकाश सारिखा एकच आहे तो वाणी व मन यांरहित असतां तूं जो प्रश्न केलास हाच संभवत नाहीं कारण द्वितीयपणा झाला म्हणजे प्र श्नाचा संभव बरोबर आहे अद्वितीय ज्ञानानें प्रश्नादिकांचा संभव नाहीं. आतां पृथिवी, उदक इत्यादिक जे सांगितले ते संपूर्ण त्रिंशत् गुण आहे त त्यांचें हें शरीर आहे असें तूं जाण, यांत न्यून किंवा अधिक असे गुण कापिल, चार्वाक, काणाद, इत्यादिकानीं जीव व ईश्वर हे मायेनें युक्त आ-हेत या प्रकारेंही त्यांचें सांगणें आम्हांस विरुध्द नाहीं कारण त्यांचें सांग-णें व्यवहारिक अर्थाचें आहे यास्तव विरुध्द नाहीं आतां हे राजा, सर्वांस मूल प्रकृतीचा आश्रय आहे मी, तूं, अन्य जे शरीर धारण करणारे, हेस र्व रेत सिंचना पासून शुक्र व शोणित यांचा संयोग होतो त्यापासून उत्पन्न झा लों कारण प्रथम शुक्र व शोणित यांचा मिश्रितपणा होतो त्यास कलल म्ह-णावें त्या पासून बुडुदाकार, त्यापासून मांस पिंडाकार पेशी, त्यापासून हस्त व पादादिक अंगें, त्यापासून नख व रोमें, संपूर्ण नवममास झाले म्हणजे प्रा णी उत्पन्न होतो, तो स्त्री किंवा पुरुष नंतर त्याचें रूप पाहून नाम ठेवितात, प-

ष्यात् कौमार अवस्थेस पावतो नंतर तारूण्य व वृध्द अवस्था त्या क्रमणे गानें एकाचदेहीं होत आहेत असें असतां हे राजा, तूं मला पूर्वी कोण आहे स कोठून आलीस इत्यादिक जे प्रश्न केलेस हे या देहाचे अनित्यत्वामुळेंप्र श्नाचा संभवच होत नाहीं यास्तव हें माझें हें तुझें हें नव्हे. इत्यादिक द्वंद्वापासून जे मुक्त झाले त्यांस कोण, कोठून, कोणाचा, इत्यादि संबंधी पृथक् राहात नाहीं हे राजा, सर्व जन आपआपले गृहीं राजे आहेत व सर्व जन आपआपले गृहीं गृहस्थाश्रमी आहेत तेव्हां दुःख सर्वांस सारिखें आहे, पुत्र, स्त्रिया, देह, कोश, मित्र, इत्यादि संचय राज्या सुध्दां नाशिवंत आहेत जसें तृणावर अग्नि ठेविल्यानें तृण दग्ध होतें तसें राज्यादिकांचेंहि सुख अल्प असून दुःख मोठें आहे यास्तव कोण पुरुष राज्याची इच्छा करील. या प्रकारें बहुत सांगून सुलभा म्हणते हे राजा, सहस्त्रावधी राजे बोलण्या विषयीं समर्थ असले तरी मला आपले देहाचा संग नाहीं मग अन्याचा परिग्रह कोठून असेल तेव्हां या प्रकारें असणारी मी आहें आणि मला तूं कोण आहेस असें बोलतोस हें तुला योग्य नाहीं. कारण तूं पंचशिखऋषी पासून संपूर्ण मोक्ष, उपनिषदें, उपाय, ध्यानांगें, निश्चय, यां सहित श्रवण केलास आणि सर्व शिष्यांत श्रेष्ठ संग टाकणारा असा असून पुनः संगयुक्त भाषण कसें करितोस तेव्हां मला असें वाटतें कीं, तूं शास्त्र जाणिलें नाहींस केवळ अभिमानानें शास्त्र जाणिलें म्हणतोस तें खरें नाहीं असत्य बोलतोस, लोकांत प्रतिष्ठा व्हावी या करितां बोलतोस परंतु प्राकृत पुरुषा सारिखा बद्ध आहेस जर मुक्त आहेस असें म्हणावें तर तुझ्या बुद्धीस बोध झाला नाहीं, स्त्री व पुरुष यांचें भाषण सभेंत झालें असतां दोष नाहीं जसें कमलाच्या पर्णावर जल असूनही पर्णास स्पर्श करीत नाहीं तशी मी तुझ्या बरोबर भाषण करून पृथक् राहाणारी आहें या प्रकारें बहुत सांगून बोलते कीं हे राजा, प्रधान या नामाचा राजऋषी कोणी होता त्याच्या कुलीं सुलभा या नामानें विख्यात मी उत्पन्न झालेली आहें असें तूं जाण मोक्षधर्मी राहाणारी असून नैष्ठिक ब्रम्हचर्य धारण करणारी आहें हे राजा, मी कपट सन्यासिनी नव्हे व परद्रव्य हरण करणारी, तशीच धर्मलोप करणारी नसून स्वधर्मी व्रत धारण करणारी आहें. तुझी बुद्धी मोक्ष-

धर्मी स्थिर आहे असें ऐकिलें यास्तव जाणण्याविषयीं मी प्राप्त झालें आतां एकरात्र तुझ्या शरीरीं राहून प्रातः उदयीक गमन करीन. भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्या राजानें सुलभेचीं हेतुयुक्त असून अर्थवंत अशीं भाषणें ऐकिलीं आणि तिला प्रत्युत्तर देण्याविषयीं राजा समर्थ झाला नाहीं, कारण गृहस्थाश्रमीं मुक्ति दुर्लभ आहे यास्तव सन्यासच प्रशस्त आहे असें सुलभेचें मत ऐकून राजा उगाच राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४८ अध्याय एकशें अठ्ठेचाळीस:– धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, व्यासाचा पुत्र शुक योगींद्र यास पूर्वी वैराग्य कसें उत्पन्न झालें हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, स्वच्छंदानें वागणारा असून निर्भय अशा शुकास व्यासानीं पितृपरंपरागत गृहण केलेला वेद भाग अर्थ सहित सांगून अन्य शाखा सांगितल्या आणि व्यास सांगतात हे शुका, तूं धर्म सेवन कर शित व उष्ण, क्षुधा, तृषा, वायू यांस जिंक. सत्य, आर्जव, क्रोध रहितपणा, अन्याच्या गुणांवर दोषारोप न करणें, तप इत्यादिकांचें सेवन कर, सत्याचे ठायीं राहून तूं धर्माचें सेवन कर, हें शरीर फेसासारिखें आहे हे पुत्रा दिवसाची गणना करितां आयुष्य क्षीण होत आहे यास्तव जे धर्म पाहाणारे बुध आहेत त्यांचे मताचें सेवन कर; काम, क्रोध, मृत्यु, श्रोत्रादि पंच ज्ञानेंद्रियें, हीच जलरूप नदी होय यांतून तरून जाण्यास नौका धैर्याची कर, आणि जन्ममरणादि भयांतून तूं तरून जावें; हा लोक मृत्युनें ग्रासून जरेनें पीडित आहे तेव्हां जसा लांडगा शेळीस घेऊन जातो तसा मृत्यु कोणते वेळीं येऊन प्राण्यास घेऊन जाईल याचा भरवसा नाहीं. हे शुका हा ब्राम्हणाचा देह प्राप्त झाला असतां वेद पठण, इंद्रियजय, तप, इत्यादिकांचें सेवन न करील तरत्याचें व्यर्थ जन्म होईल यास्तव क्लेश जरी झाले तरी चिंता नाहीं परंतु त्यानें धर्म पर होऊन आत्मज्ञान जाणावें म्हणजे त्याचें जन्म साफल्य आहे यास्तव हे शुका, त्या शरीरास वृद्धपणा आला म्हणजे हें शरीर जर्जर होतें आणि बल, अंग, रूप, यांची हानी होऊन मृत्यु घेऊन जातो या मुळें तूं तपादिक करून कृतार्थ होण्याची इच्छा धरावीस

म्हणजे अक्षर ब्रह्म जें, हेंच मोठें द्रव्य आहे असें समजून आदरानें संपादन करून घे. तूं म्हणशील कीं हिरण्य, रत्न माणिक्य, इत्यादिकांचा संचय करावा. तरी संचय करणाऱ्याचा देह नष्ट झाला म्हणजे त्यास त्या द्रव्यादिकांचा कांहींएक उपयोग नाहीं यास्तव नित्य जें ब्रम्ह याचें सेवन करावें. आतां प्राणी आपले शरीरानें धर्म किंवा अधर्मरूप कर्में करितात त्यांचे साक्षी शरीरांत अग्नि, सूर्य, वायू, हे राहाणारे असून ते प्राण्याची साक्ष पुरवितात या मुळें हे शुका, तूं धर्माचें सेवन कर. आज करीन व उद्यां किंवा परवा करीन. तसेंच पूर्व प्रहरांतील कर्म तृतीय प्रहरीं करीन परंतु तूं कर्म केलेंस किंवा न केलेंस हें न पाहतां मृत्यु घेऊन जातो या प्रकारें बहुत सांगून व्यास म्हणतात. हे शुका, माता व पिते हे सहस्त्रावधि तसेंच स्त्रिया व पुत्र शतावधि झाले व पुढें होणार तेव्हां ते कोणाचे व आम्ही कोणाचे याचा ठिकाणा लागत नाहीं आणि ज्याचा मी, जो कोणी माझा हें ही पाहात नाहीं यास्तव मी एकटा आहें अशा प्रकारानें बहुत सांगून म्हणतात हे शुका, जितेंद्रिय होऊन निर्गुण ब्रम्हाचा लाभ करून घ्यावा. भीष्म म्हणतात हे धर्मराजा, व्यासानीं सांगितलेलें हितकारक भाषण ऐकून शुकाचार्य पित्यास टाकून मोक्षाचा उपदेश करणाऱ्या जवळ गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१४९. अध्याय एकशें एकुण पन्नास.– धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, पुरुषानें उत्तम दान व तप केलें किंवा गुरूंची सेवा केली तर त्यास काय फल होतें हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, जे पुरुष, अनर्थाचे ठायीं मनाची योजना करून पापकर्म करणारे होतात ते दरिद्री होऊन दुर्भिक्ष, क्लेश, भय यांस पावतात, आतां जे पुरुष, धर्माचे ठायीं मनाची योजना करून दान व तपादिक करणारे होतात, ते पुण्यवंत होऊन स्वर्गीं जातात. किंवा मोक्ष धर्मीं त्यांची बुद्धि होते, ज्या पुरुषानीं मान, अपमान, लाभ, अलाभ, नाश, मिळकत, यांचे ठायीं समान बुद्धी केली तर ते पुरुष परमार्थी अधिकारी होतात हे राजा, पुरुष, पूर्व देहीं जसें कर्म करितो तसें गर्भीं, व बाल्य अवस्था, तरुण, वृद्ध इत्यादि अवस्थेचे ठायीं त्या त्या

कर्माचें फल जन्मोजन्मीं उपभोगानें भोगतो.जसा वत्स, सहस्त्रावधि गायी मध्यें आपली माता जाणून ओळखतो तसें पूर्वी केलेलें कर्म करणाऱ्या पुरुषास प्राप्त होतें.जसें मलीन वस्त्र धुतलें म्हणजे स्वच्छ होतें तसें उपवासानीं देह तप्त केले म्हणजे त्यांस दीर्घ काल सुख होतें यास्तव हे धर्मराजा, पुरुषानीं आपलें हित पाहून योग्य जें दानादिक तें करावें म्हणजे त्या पुरुषास उत्तम फल प्राप्त होतें. असा विषय या अध्यायांत आहे.

१५०. अध्याय एकशें पन्नास.— धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा,शुकाचार्याची माता कोणती व त्याचें जन्म कोठें झालें आणि त्याची बालपणांत सूक्ष्म म्हणजे त्याचे ठायीं निष्ठा मोठी तसेच विज्ञान, महात्म्य, आत्मयोग,हे सर्वांहून ज्याचे अधिक असून त्याच्या सारिखा दुसरा त्या लोकीं कोणी नाहीं यास्तव हा महा तपस्वी व्यासापासून कसा उत्पन्न होऊन परम सिद्धीस पावला हें सर्व सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात. हे धर्मराजा, जें तूं मला विचारिलेंस हें सर्व तपोमूल आहे कारण इंद्रियांच्या प्रसंगानें पुरुषास दोष होतो यास्तव तीं इंद्रियें आपले स्वाधीन केल्यानें तप होतें नंतर त्या योगानें मानव सिद्धीस पावतो म्हणून पुरुषानें सहस्र अश्वमेध व शंभर वाजपेययज्ञ केले तरीं इंद्रियांचा निग्रह करून चित्तसमाधान पुरुषाचें जसें होतें असें कोणत्याही साधनानें होत नाहीं आतां शुकाची कथा सांगतों. कोणी एके वेळीं मेरु पर्वताचे शृंगावर उत्तम वन आहे त्या वनांत भूतगण व पार्वती सहित महादेव क्रीडा करण्याविषयीं राहिले होते तेथें आपणास पुत्र व्हावा म्हणून शतवर्षें व्यासानीं तप केलें हें पाहून शंकर प्रसन्न झाले आणि बोलतात हे व्यासा, वर माग नंतर व्यास म्हणतात हे शंकरा, जर प्रसन्न आहेस तर अग्नि, भूमी, जल, वायू, आकाश, हीं पंचमहाभूतें आहेत त्यांच्या धैर्या सारिखा पुत्र मला व्हावा हा संकल्प माझा आहे. असें ऐकून शंकर बोलतात हे व्यासा, त्या स्थानीं सर्व ब्रह्मर्षी, आदित्यादि सर्व देव, मार्कंडेयादि सर्व ऋषी आहेत, आणि तपानें तुझ्या जटा अग्नी सारिख्या प्रकाशित दिसत आहेत त्या सर्व कारणावरून व तुझें तप पाहून संतोषानें तुला वर देतों हे व्यासा, ज्या प्रकारानीं शुद्ध पुत्र असावा म्हणून तूं मागितलास त्या प्रमाणें पं-

व महाभूतांच्या धैर्यासारिखा पुत्र तुला होईल आणि तो पुत्र तीनलोकींय
श पावेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१५१. अध्याय एकशें एकावन:— भीष्म सांगतात हे धर्मराजा, याप्र-
माणें शंकरापासून वरप्रदान मिळाल्यावर व्यासांनीं दोन अरणी घेऊन
अग्नि प्रगट करावा म्हणून मंथन करूं लागले तो इतक्यांत घृताची याना
में अप्सरा जवळ आलेली व्यासांनीं तिला पाहिली तो व्यासाचें रेतस्खल-
न झालें तें रेत त्या अरणीचे गर्भी पडलें तो पुनः त्या शुक्राचें मंथन करतां
च त्यांतून पुत्र उत्पन्न झाला म्हणून व्यासांनीं त्याचें नाम शुक, ठेविलें अ
सा तो पुत्र अग्नी सारिखा शोभूं लागला नंतर साक्षात स्वरूप धारण क-
रण करणारी भागीरथीनें येऊन त्या शुकास स्नान घातलें, नंतर आका-
शांतून दंड व कृष्णाजिन खालीं पडलेलें पाहून शुकानीं धारण केलें,
गंधर्व गायन करितात, व अप्सरा नर्त्तन करितात तसेच देव नगारे वा-
जवितात. आकाशांतून पुष्पवृष्टी त्यावर झाली नंतर हाहा, हूहू, गंधर्व
स्तुती करितात इंद्रादिदेव, लोकपाल, देवऋषी, हे त्या स्थानीं आले इं-
द्रानें शुकास कमंडलू दिला, देवानीं वस्त्रें दिलीं, नंतर हंसपक्षी, त्या शु-
कयोगींद्रास प्रदक्षिणा करितात असा अरणी गर्भापासून झालेल्या शु-
कास वेद, वेदांगें, भाष्यादि, सरहस्य, इतिहास, राजशास्त्रें, बृहस्पती
पासून प्राप्त झालीं. असा सर्व जाणणारा तो झाला, परंतु त्या शुकाची
मोक्ष धर्मी बुद्धि स्थिर झाली. असा विषय या अध्यायांत आहे.

१५२. अध्याय एकशें बावन:— भीष्म सांगतात. हे धर्मराजा, तो शुक मो
क्ष शास्त्र जाणण्या विषयीं पित्याजवळ गेला, आणि नमस्कार करून बोल
ला हे व्यासा, तुम्ही मोक्षधर्मी परम निपुण आहां यास्तव मला मोक्षशास्त्र
सांगावें असें ऐकून व्यास बोलतात हे शुका, तूं मजपासून मोक्ष शास्त्राचें
अध्ययन कर, असें सांगून व्यास मोक्ष धर्म व संपूर्ण योगशास्त्र आणि सां
ख्य शास्त्र, हीं व्यासानीं शुकास अध्ययन करविलीं त्या योगानें तो शुक
ब्रह्म तेजस्वी होऊन महा पराक्रमी झाला असें पाहून व्यास. परम संतोषें
बोलतात. हे शुका, तूं मोक्ष धर्मी निपुण झालास त्या योगें मला फार संतोष

झाला आहे तर हे पुत्रा, आतां तूं मिथिलेचा राजा जनक याचें दर्शन घे म्ह॰ णजे तो तुला मोक्षार्थ सांगेल त्या योगानें तूं कृतार्थ होशील परंतु हे शुका, अ॰ हंकारादि टाकून सुखाची इच्छा न धरितां परम आर्जवानें जावें म्हणजे तो तुझा संशय दूर करील. असें ऐकून शुकयोगींद्र निघाला, तो पर्वत, न॰ द्या, तीर्थें, सरोवरें, मोठीं अरण्यें व इलावृत खंड, हरिवर्षाख्य खंड, किं॰ पुरुषाख्य खंड, यांचें अतिक्रमण करून भारतवर्षांत आला आणि तेथून चीन व हूण इत्यादि देश पाहात पाहात मिथिलानगरीस आला आणि द्वा॰ रांतून निःशंक आंत जातांनां द्वारपालानें शुकास कठोरभाषणानें मज्जाव केलें तें ऐकून क्रोध रहित शुक कांहीं नबोलतां उगाच उभा राहिला तों त्या द्वार पालामध्यें एक द्वारपाल सज्जन होता तो शुकाची कामक्रोधादि रहित असणा री स्थिती पाहून मनांत म्हणतो हा केवल सूर्यनारायणा सारिखा आहे असें त्यास पाहून परम संतोष पावलेल्या त्या द्वारपालानें नमस्कार करून शु॰ काची पूजा केली आणि त्या द्वारांतून आंत घालविलें तो शुक राजवाड्या च्या दुसऱ्या द्वाराशीं जाऊन दोन घटिकापर्यंत उभा राहिला नंतर जनकरा जाचा प्रधान येऊन त्यानें त्यास आंत नेलें पुढें तिसऱ्या द्वारांतून आंत ने तांच त्या प्रधानानें शुकास स्त्रियांच्या महालांत नेऊन आसनावर बसविलें आ॰ णि आपण निघोन गेला. नंतर ज्या स्त्रियांचा वेष सुंदर, तारुण्यपणा, आणि ज्या स्त्रियांकडे पुरुषानीं पाहिलें असतां अंतःकरणास प्रियवाटून मोह होतो, सूक्ष्मतां वडी वस्त्रें नेसलेल्या त्या वस्त्रांतून सर्व शरीराचे अवय व पाहाणाऱ्यास दिसत आहेत तशाच सुवर्णाचे अलंकार घालणाऱ्या, पु रुषांकडे हसून भाषण करणाऱ्या, विषय सुख देण्याविषयीं निपुण, अ॰ शा जनक राजाच्या स्त्रिया होत्या त्याहून अन्य वारांगना पन्नास होत्या त्या सु वर्ण व मोती यांचे अलंकार रत्नजडित अंगावर घालून शुकाजवळ आ॰ ल्या आणि त्यानीं शुकाची पाद्यादिकानीं युक्त पूजा केली नंतर उत्तम भो जन त्यास दिलें आणि निद्रा करण्या विषयीं उत्तम रत्नजडित शय्या तया र करून त्या शय्येवर निजावें म्हणून शुकास सांगितलें. नंतर डोळ्याची पापणी लवते इतक्या वेळ ही ब्रम्ह वृत्तीवांचून ज्याचें राहाणें नाहीं आणि

जास इंद्रियेंवश्य, ज्यानें क्रोध जिंकिला,असा जो शुक तो संध्योपासना करू न त्या शय्येवर बसला आणि पूर्वरात्रींत ध्यान करून त्यानें मध्य रात्रींत नि- द्रा केली नंतर दोन घटिकानीं उठून पुनः तो ध्यान करीत बसला इतक्यांत त्या स्त्रि- यानीं हावभाव, नृत्य,गीत, इत्यादिकें करून शुक कामाच्या वश होईल या इच्छेनें बहूत यत्न केला परंतु तो शुक ब्रम्हवृत्तिरूप ध्यान सोडून त्या स्त्रि यांस वश झाला नाहीं अशा प्रकारें त्या रात्रींत स्त्रियां सहित त्या महालांत शुकानीं वास केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५३. अध्याय एकशेंत्रेपन्न:—भीष्म सांगतात. हे धर्मराजा, तीरात्र अतिक्रांत झाल्यावर प्रातःकालीं पुरोहित व प्रधान यां सहित जनकराजा नाना प्रकारचीं आसनें घेऊन गुरुपुत्र जो शुकाचार्य याच्या सन्निध आला. आणि राजानें रत्नमय आसनावर शुकास बसविलें नंतर राजानें प्रथम पाद्यापासून शुकाची पूजा केली ती गृहण करून शुक बोलतात हे जनक राजा, तूं सर्व परिवारासह वर्तमान कुशल आहेसना?असा शुकाचा कुश ल प्रश्न ऐकून जनकराजा भूमीवर हात जोडून उभा राहिला आणि शु- कास कुशल प्रश्न विचारून बोलतो हे शुका, तुमचें आगमन कोणते कार- णानें झालें हें सांगावें. असें ऐकून शुक बोलतात हे जनक राजा, माझ्या बा पानें मला सांगितलें कीं,विदेह देशाचा राजा जनक या नामें विख्यात आ हे तेथें तूं जा, म्हणजे प्रपंचीं व परमार्थीं तुला जो संशय असेल त्याची नि- वृत्ती तो करील. असें ऐकतांच आपणास विचारावें या करितां आपले जव ळ मी आलों आहें यास्तव ब्राम्हणानें काय करावें तसेंच मोक्ष प्राप्ती ज्ञाना नें,तपानें किंवा अन्य उपायानीं करून व्हावी या विषयीं मला सांगा, कारण आ पण ब्रह्म विद्येंत निष्णात आहां यास्तव प्रश्न केला आहे असें ऐकून जनक बोलतात हे शुका, जन्मापासून ब्राम्हणानें जें करावें तें तुला सांगतों उपन- यन झाल्यावर त्यानें वेद पठन, तप, गुरुसेवा, ब्रह्मचर्य, देव व पितर यांच्या ऋणांतून मुक्तता, इत्यादि धर्म आचरून आपले गुरूजवळ शिष्या नें बोलावें कीं, माझी सोडमुंज करावी नंतर गुरूच्या आज्ञेनें सोडमुंज झा ल्यावर विवाह करून स्त्रिशीं रत असावें आहिताग्नि घेऊन त्याची सेवा क-

रावी आणि पुत्र व पौत्र उत्पन्न करून त्यानें वानप्रस्थाश्रम करावा. तेथें अग्निसेवा करून अतिथींचा संतोष करावा. या प्रकारें वानप्रस्थाश्रम करून त्यानें सुखदुःखरहित होऊन सन्यासाश्रम करावा. असें ऐकून शुकयोगींद्र बोलतात हे जनकराजा, पुरुषास ब्रम्हचर्याश्रमीं ज्ञान व अनुभवरूप विज्ञान हीं उत्पन्न झालीं असतां मोक्षधर्मीं त्यानें राहावें, किंवा त्यानें गृहस्थाश्रमादि आश्रम त्रय अवश्य घेतलेच पाहिजे या विषयीं निश्चय सांगा, असें ऐकून जनक सांगतात हे शुका, ज्ञान व विज्ञान यांहीं करून मुक्त जरी असला तरी गुरु संबंधावाचून पुरुषास ज्ञानाची प्राप्ती दुर्लभ आहे, कारण ज्ञान हें नौका, गुरु हा नावाडी तेव्हां नौकेंतून तरून नेण्यास नावाडी जसा कारण आहे तसा संसार समुद्रांतून तरून जाण्यास गुरु करावा हें योग्य कारण आहे. असें श्रुतींत सांगितलें आहे, यास्तव हे शुका, पुरुष गुरुपासून ज्ञान प्राप्त झाल्यानें कृतकृत्य होतो तेव्हां ब्रह्मचर्याश्रमापासून गृहस्थ, वानप्रस्थ, सन्यासाश्रम, हे क्रमानें घेऊन पुण्य व पापकर्मे यांतून मुक्त होऊन मोक्षधर्माचा आश्रय केल्यानें तो कृतार्थ होतो यास्तव हे शुका, आपले पूर्वजानीं जो धर्म आचरण केला तो परंपरागत आलेला धर्म आपणाही आचरण करावा. म्हणजे लोकसंग्रह साधून ब्रम्हभिधेंन निष्णात होणारा पुरुष त्या लोकीं धन्य होतो, यास्तव ग्रहस्थाश्रमाचा स्वीकार करावा. हे शुका, ब्रम्हचर्याश्रमीं पुरुषास तत्वज्ञान प्राप्त झालें तर तो मोक्षास पावतो कारण त्याला तीन आश्रम संपादन करून कोणतेंही कारण अवशिष्ट राहात नाहीं यास्तव त्यानें दोषरूपी जे राजस व तामस भाव यानें वर्ज करून सात्विक मार्गाचा आश्रय धरावा आणि सर्वांभूतीं आत्मा व्यापक आहे तसींच सर्व भूतें आत्म्याचे ठायीं आहेत अशा ज्ञानानें पाहिलें असतां तो जसा मत्स्य उदकीं असून लिप्त होत नाहीं तसा हा लिप्त होत नाहीं तर पक्ष्या सारिखा ऊर्ध्व देह टाकून मोक्षसुखास पावतो या विषयीं पूर्वीं ययाति राजानें कथन केलें आहे तें सांगतों. मोक्ष शास्त्रीं निपुण जे ब्राह्मण आहेत ते आपले ठायीं जें ब्रम्ह तेज प्रकाशित आहे तसेंच सर्व आणि प्राण्यांत ब्रम्ह स्वरूप तेंच एक स्वरूप तेज आहे असें आपण

च साक्षात्कारानें बुद्धीचे ठायीं निर्मल अंतःकरणानें पाहातों परंतु तेंरूप प्रत्यक्ष अंतःकरणानें पाहाण्या विषयींचीं लक्षणें सांगतों. ज्या पुरुषापासून दुसऱ्यास भय होत नाहीं व दुसऱ्यापासून हा भय पावत नाहीं आणि इच्छा द्वेष रहित जो त्यास ब्रह्म साक्षात्कार होतो, ज्या कालीं कर्म, मन, वाणी, त्यानीं सर्वोभूतीं पापरूप भाव करीत नाहीं, तसेच काम, मोह, सुख, दुःख, स्तुती, निंदा, सुवर्ण, लोह, शीत, उष्ण, अर्थ, अनर्थ, प्रिय, अप्रिय, जिवित, मरण, इत्यादिकांचा त्याग करितो, त्या कालीं योगी ब्रह्मसाक्षात्कार होण्याविषयीं समर्थ होतो यास्तव हे शुका, हे सर्व गुण तुझे ठायीं राहतात तेव्हां तुझी बुद्धी ब्रम्ह साक्षात्कार पाहाणारी आहे असें मी जाणतों. हे ब्रम्हर्षे, तुझा गुरु व्यास त्यांचा प्रसादानें मला ब्रम्हसाक्षात्कार झाला यास्तव तूं माझे नगरींत आल्याबरोबर तुला मी जाणलें आहे, आतां तुला ब्रम्हसाक्षात्कार व्यासाच्या आज्ञेवरून केला आहे तर मुळींच तुझें ज्ञान अधिक व बाल्यापासून तुझी निष्ठा शुद्धभावरूप पाहून तुझा संशय छिन्न केला आहे, तर आतां निरंतर तुझी स्थिति निर्गुण स्वरूपीं राहून निर्भय जन्म व मरण यांतून तूं सदां मुक्त आहेस. असा विषय या अध्यायांत आहे.

१५४. अध्याय एकशें चोपन्न:— भीष्म सांगतात हे धर्मराजा, शुकानें जनक राजाचें वाक्य श्रवण करून दृढ निश्चय केला आणि ब्रह्मस्वरूपाचें चिंतन करीत उत्तर दिशेस हिमालय पर्वतावर तो आला इतक्याच कालीं सिद्ध चारणादिकानीं सेवन केलेला व राज हंसादि पक्षी समुदायानीं सेवित अशा प्रकारानीं युक्त हिमवान् पर्वतास पाहावा म्हणून नारदऋषी त्या पर्वतावर आले कारण ज्या पर्वतावर पूर्वीं विष्णूनीं पुत्रासाठीं तप केलें व स्वामि कार्तिक याणें शक्ति स्थापित होती ती विष्णूनीं वाम हस्तानें उचलून घेतांच पृथ्वी कंपायमान झाली, नंतर त्यानीं प्रल्हादास बोलावून त्याचे जवळ ती शक्ति दिली, प्रल्हादानें उचलून घेण्याबरोबर त्या शक्तीचा भार सोसेना तेव्हां त्यानें मोठा शब्द केला आणि हिमवंत पर्वताच्या मूर्धभागीं विव्हल होऊन तो पडला नंतर विष्णूनीं त्यास कृपा दृष्टीनें उठविला, अशा पर्वतावर महादेव ही तप नित्य करितात त्या पर्वतावर एकांत स्थल पाहून त्याच्या अग्रभागीं

पराशराचे पुत्र व्यास, सुमंतु, जैमिनी, वैशंपायन, पैल, याच्यार शिष्यांस वेदाचें अध्ययन सांगत होते त्या स्थानीं शुक योगींद्र प्राप्त झाला आणि त्यानें पित्याचे पाद धरून त्यास नमस्कार केला व त्या चार शिष्यानींही शुकाचा सत्कार केला. शुकानीं जनक राजाची भेट होऊन जो संवाद झाला हा सर्व व्यासास निवेदन केला. नंतर शुक तेथेंच राहिले. व्यासांच्या शिष्यांस वेदाध्ययन प्राप्त होतांच ते शिष्य व्यासास बोलतात हे गुरो, जर तुह्मीं आम्हांवर प्रसन्न आहांत तर एक वर आम्हांस द्यावा तो असा कीं, आम्हीं चार शिष्य आणि पांचवा शुक हे व्यासाचे शिष्य सर्वत्र ठिकाणीं विख्यात व्हावेत त्या पांचां शिवाय साहावा शिष्य आपला विख्यात नसावा असें शिष्यांचें भाषण ऐकून व्यास म्हणतात हे शिष्यहो, वेदांची प्रतिष्ठा तुमचेच ठायीं राहील परंतु तुह्मीं सेवा करणाऱ्या भक्तिमान् ब्राम्हणास वेदाध्ययन सांगावें व ब्रह्म लोकाची इच्छा करणाऱ्यास सांगावें. जो व्रत रहित आणि शिष्य न होणारा त्यास सांगूनये हे शिष्यहो, पुढें ब्राम्हणास बसवून चारवर्णासिही सांगावें कारण जसें सुवर्ण तापवून परीक्षा करितात तशी परीक्षा करून चार वर्णांसही वेदाध्ययन सांगावें, कलियुगीं पुराणांतरीं धर्म सांगितल्या प्रमाणें तुम्हीं वागावें. जो पुरुष अधर्मानें प्रश्न करील व जो अधर्मानें सांगेल त्या दोघांत विद्वेष होईल हे शिष्यहो, हे सर्व वेदपाठ सांगण्याचें लक्षण तुम्हांस सांगितलें यावरून तुम्हींही आपले शिष्यांस उपकार बुद्धीनें सांगावें. असा वि. या अ. आहे.

१५५. अध्याय एकशें पंचावन्न.— भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्या व्यासाच्या शिष्यानीं तें गुरूचें भाषण ऐकून ते एकमेक आपले हृदयीं धरून परम संतोष पावले आणि बोलतात हे गुरो, त्या हिमवंत पर्वतावरून खालीं पृथ्वीवर जावें आणि वेदांचा विस्तार करावा असें आमचे मनांत आलें आहे, तरी आपण सांगाल तसें करूं असें ऐकून व्यास म्हणतात हे शिष्यहो, तुम्हीं यथेच्छ पृथ्वीवर किंवा देवलोकीं त्या दोहोंत जेथें रुचेल तेथें जावें परंतु प्रमाद रहित असावें या प्रकारें गुरूची आज्ञा घेऊन त्यानीं व्यास गुरुस प्रदक्षिणा करून अभिवादन केलें आणि ते निघाले ते पृथ्वीवर आले नंतर अग्निहोत्रादि सोमांत चातुर्होत्र कर्म प्रवृत्त करून त्यानीं ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य,

यांजकडून यज्ञादिकर्मे करविलीं असे ते व्यासाचे शिष्य जगांत पूज्यमान हो-ऊन त्यानीं गृहस्थाश्रम केला. या प्रकारें लोकांत विख्यात झालेल्या आपले शिष्यांची कीर्ती ऐकून व्यास संतोष पावले नंतर आपला पुत्र शुक त्यासहित एकांत स्थलीं किंचित् ध्यानस्थ बसले तो इतक्यांत त्यांच्या आश्रमीं नारद ऋषी येऊन बोलतात हे व्यासा, तुझ्या आश्रमीं पूर्ववत् वेदघोष कां होत नाहीं? असें नारदाचें वाक्य ऐकून व्यास बोलतात हे महर्षे, तीन लोकीं जे कांहीं वर्तमान होत आहे तें तुला सर्व विदीत आहे यास्तव माझ्या मनास योग्य जें अनुकूल असेल तें तुम्हीं सांगा. असें ऐकून नारद म्हणतात हे व्यासा, अध्ययन केलेल्या वेदांची आवृत्ति जर केली नाहीं तर ते मलरूप वेद जाणावे. तसेंच ब्राम्हण, व्रत रहित मलीन जाणावे. या कारणास्तव पुत्रासहित तूं वेद घोष करावा. म्हणजे राक्षसादिकांचें भय दूर होईल असें नारदाचें भाषण ऐकून बहुतबरें म्हणून व्यासानीं आपला पुत्र शुक जो त्या सहित वेदाभ्यासाची आवृत्ति उच्चः स्वरानें म्हणण्यास आरंभ केला तों अत्यंत प्रचंड वायू, भयंकर उत्पन्न झाला त्यास पाहून अध्ययन करूं नकोस म्हणून व्यासानीं पुत्राचें निवारण केलें हें पाहून शुक बोलतात हे व्यासा, हा प्रचंड वायू कोणते कारणानें झाला हें सांगा असें ऐकून व्यास सांगतात हे शुका, तूं ब्रम्ह वेत्ता झालास यामुळें तुझ्या वेदघोषानें हा वायू उत्पन्न झाला कारण पिंडीं व ब्रम्हांडीं वायू सप्त वाहात आहेत ते समान, उदान, व्यान, अपान, प्राण, आवह, आदान, हे एका पासून एक असे पुत्ररूपानें उत्पन्न झाले यास्तव ते सर्व लोकीं अन्य नामानीं विख्यात असून वाहात आहेत या प्रकारानें वायूचीं लक्षणें बहुत सांगून व्यास म्हणतात हे शुका, या कारणास्तव ब्रम्हवेत्ते अत्यंत वायू सुटला म्हणजे वेदाभ्यास पठण करीत नाहींत यास्तव तूंही मोठा वायू सुटला म्हणजे अध्ययन करूं नकोस असें सांगून व्यास आकाशगंगेच्या दर्शनार्थ निघोन गेले: असा वि· या अध्यायांत आहे.

१५६. अध्याय एकशें छप्पन्न:— भीष्म सांगतात· हे धर्मराजा, इतके अवकाशांत शुकाजवळ नारद ऋषी आले हें पाहून शुकाचार्यांनीं

अर्घ्य व पाद्य इत्यादि वेदोक्त विधीनें नारदाची पूजा केली नंतर नारद संतोषून बोलतात हे शुका, तुला कोणतें श्रेयस्कर उपदेशरूप शास्त्र ऐकावयाचें आहे तें सांग. असें ऐकून शुक बोलतात हे नारदा, ज्या ज्ञानानें माझें हित होईल तें तुम्ही मला सांगा. असें ऐकून नारद सांगतात हे शुका, पूर्वी तत्व जाणावयाची इच्छा करणाऱ्यां ऋषींस सनत्कुमारानीं जें ज्ञान सांगितलें तें तुला मी सांगतों. हे शुका, आत्मज्ञानाशीं तुल्य दुसरें ज्ञान कोणतेंही नाहीं व सत्य संपादन करणाराशीं तुल्य दुसरें तप नाहीं तसेंच विषयावर प्रीति करणाऱ्यास जें दुःख आहे याशीं तुल्य दुःख दुसरें नाहीं आणि त्याग करणाऱ्यास जें सुख आहे त्याशीं तुल्य दुसरें सुख कोणतेंही नाहीं. आतां पापकर्मापासून निवृत्ति, निरंतर पुण्य सेवन सत्कर्मयोगानें वय घालविणें, आचार संपन्न, मनुष्यजन्म पावून मोह न पावणें, मोहजाला पासून बुद्धी काढणें, कामक्रोध यांचा निग्रह करणें, क्रूरकर्म न करणें, क्षमाधारण, आत्मज्ञानाचें सेवन, सत्यवचन, भूतांचें हित करणें, सर्व कर्मांच्या फलाचा त्याग परिग्रह रहित इंद्रियांकडुन विषय ग्रहण होत असतां निर्विकार असणें, सर्व भूतमात्रांची हिंसा न करणें, वैर कोणासीं हीं न करणें, जितेंद्रियपणा, संगशून्यपणा, इत्यादिक जे धर्म सांगितले यांचें सेवन करणाऱ्या पुरुषास, बंध प्राप्त होत नाहीं हे शुका, हा सर्वजन अनर्थ करणारीं जीं कर्में यांजकडे न पाहून अहित होत असतां त्यां साहित मानितो त्या भोगानें जसे वनांतील वृद्ध झालेले गज सरोवरांतील-चिखलांत मग्न होतात तसा हा सर्व प्राणिमात्रजन पुत्र, स्त्रिया, कुटुंब, भृत्यादिक त्या मोहजालांत बुडतो यास्तव हे शुका, संसार नदींतून जाणें आहे तर धर्म व अधर्म, संकल्प विकल्प, सत्य अनृत इत्यादिकांचा त्याग तूं कर आणि अस्थि, स्नायु, मांस, शोणित, चर्मयुक्त, दुर्गंधी, जरा, शोक, रोग, इत्यादिकांनीं युक्त जें शरीर याचा त्याग कर. हे शुका, तत्वांचा विचार पाहून हा प्राणी आपआपलीं जीं कर्में केलेलीं त्या कर्मांनीं नित्य दुःखित आहे असें तूं पाहा, कारण त्या कर्मांचा वियो-

गानें हा प्राणी चक्रासारिखा संसारांत परिभ्रमण पावतो या कारणास्तव जे योगी आहेत ते धारणा व ध्यान समाधी यांच्या योगानें व तपोबलानें त्या संसार बंधांतून मुक्त होऊन परम सिध्दीस पावतात. असा विषय या अध्यायांत आहे.

१५७. अध्याय एकशेंसत्तावन:– नारद सांगतात हे शुका, शोकाचा नाश व्हावा त्या अर्थास्तव शांति करणारें व कल्याण कारक हें शास्त्र ऐकिल्यानें पुरुष सुख पावतो कारण शोकाचीं स्थानें सहस्त्रावधी तशींच भयाचीं स्थानें शतावधी आहेत परंतु दिवसा दिवसाचे ठायीं तीं स्थानें मूढ पुरुषास भास होतात पंडितास भास होत नाहींत, म्हणोन अल्पबुद्धी जे मनुष्य आहेत ते मानसदुःखानीं पिडीत होतात, आणि ज्या ज्या विषयावर प्रीति करितो तो तो विषय मनुष्यास अनिष्ठ देणारा होतो यास्तव त्यापासून मनुष्यानीं विरक्त असावें. मृत किंवा नष्ट झालेल्या वस्तूंचा शोक करितो त्या मनुष्यास प्रथम दुःख पश्चात् अनर्थ भास होतो यास्तव मनुष्यानीं प्रज्ञेनें मानस दुःख व औषधानीं शारीर दुःखांचा नाश करावा. हे शुका, यौवन, रूप, जीवित, द्रव्य संचय, आरोग्यपणा, प्रियांशीं सहवास, हीं अनित्य आहेत तेव्हां यांचाशीं संग ठेवण्याची इच्छा करूं नये. पहा मनुष्य अत्यंत दुःखानें द्रव्य मिळवितात व त्या द्रव्याचें रक्षण महा यत्नानें करितात परंतु यांचा नाश आहे असें चिंतन करीत नाहींत तेव्हां संचय केलेल्या द्रव्याचा नाश जाहाला म्हणजे ते अत्यंत दुःख पावतात यास्तव विशेष द्रव्य मिळावें म्हणोन इच्छा करणाऱ्या पुरुषांस तृप्ति कधींही होणार नाहीं आणि शेवटीं पाहिलें असतां त्यांचा नाश आहे यामुळें पंडित त्या विषयीं फार लोभ करीत नाहींत आणि पुरुषानीं संतोषासच हें धन आहे म्हणोन मानावें असें पंडित बोलतात. आतां पुरुषांनी आपले धैर्यानें शिश्न व उदर यांचें रक्षण, चक्षूनें हस्त व पाद यांचें रक्षण, मनानें चक्षू व श्रोत्र यांचें रक्षण, ज्ञानानें मन व वाणी यांचें रक्षण करावें आणि मत्तपणानें न असणें अशा रितीनें वागणारे मनुष्य तेच सुखी व पंडितही त्यांसच म्हणावें हे शुका, अध्यात्म शास्त्राचे ठायीं प्रीति, निरपेक्ष, आत्म ज्ञानानें संपन्न, इत्यादिक

गुणानीं युक्त जो तोच मनुष्य सुखी होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१५८. अध्याय एकशें अठ्ठावन्न.- नारद सांगतात हे शुका, कोणी पुरुष सुखाचे ठायीं दुःख बुद्धी व दुःखाचे ठायीं सुख आहे म्हणून जी बुद्धि अशा विपरीतपणास ज्या काळीं पावतो त्या काळीं ती बुद्धि त्याचें रक्षण करण्यास योग्य होत नाहीं. आतां जो पुरुष आपल्या स्वभावानें यत्न करितो तो यत्नवान होऊन जरा, मरण, रोग, यां पासून आत्म्याचा उद्धार करील. कारण जसें दृढ धनुष्य धारण करणाऱ्या पुरुषांनीं ज्यांचीं अग्रें तीक्ष्ण असे बाण मारिले म्हणजे ते शरीरास पीडा करितात तसेंच शरीरांतील व मनांतील रोग त्या प्राण्यास पीडा करितात त्या योगानें तो पुरुष पीडित झाला म्हणजे त्या पुरुषाच्या नाशाकारणें तें शरीर अपकार करणारें होतें यास्तव रात्र व दिवस हे पुरुषाचें आयुष्य घेऊन जातात परंतु कोणाच्याही बुद्धीस विचार होत नाहीं तेव्हां पुरुषामध्यें अधम आहेत असें जाणावें. आतां जे पुरुष जन्म घेणारे होतात ते तरी गर्भांत शिरतात परंतु आंध्याच्या मोहोरा सारिखा क्वचित् गर्भस्राव न होतां गर्भ राहातो पुढें दाहावे मासांत पुत्र झाला म्हणजे माता व पिता यांस चिंता प्राप्त होते कीं हा पुत्र आयुष्यवान होईल किंवा आयुष्यांतून नष्ट होईल तशांतून तो पुत्र आयुष्मान् झाला परंतु सर्पासारिखा क्रूर होऊन कुळास दोष करणारा झाला त्या मुळें त्या माता पित्यास पुत्र झाल्यानें दुःख झालें, सुखाची वार्ताही नाहीं. हे शुका, उदरापासून उत्पन्न होणारे गर्भ बहुत पतन पावतात त्यांत कांहीं जिवंत राहिले ते व्याध्यादिकानीं पीडित होतात तेव्हां ते बरे व्हावेत म्हणून निपूण वैद्य जे आहेत त्यांस द्रव्य देऊन त्यांजकडून बहूत कषायादिक औषधें त्या रोगी जनास देववितात परंतु बलवत्तर रोग वाढल्यानें तीं औषधें लागू होत नाहींत, कदाचित् अल्परोग आहे तरी औषधें लागू होऊन त्या रोगांतून ते बरे होतात पुढें कांहीं दैवयोगानें त्या पुरुषांस ऐश्वर्य मिळालें तर त्या ऐश्वर्याच्या मदानें मत्त होऊन ते विषयांध होतात त्यामुळें सत्समागम, भगवत्कथाश्रवण, भगवद्भजन हीं मनुष्यांच्या अंतःकरणास शांति करणारीं आहेत यास्तव त्यांचें सेवन केल्यानें मनुष्यांस सात्विक गुण उत्पन्न होतो त्या योगानें ते कृतकार्य होतात हे शुका, त्या मनुष्यांस कर्माचें फल चांगलें

बाईट दिसतें, कसें तर कोणी पुरुष शिबिका(पालखी) आपले स्कंधावर घे
ऊन चाहाल आहेत व कोणी त्या शिबिकेंत बसतात, तसेच कोणी रथावर,
कोणी पादचारी, कोणी स्त्रियांशीं युक्त आहेत, कोणास स्त्रिया नाहींत या
प्रकारची लोकांची स्थिती पाहून देव मृत्युलोक टाकून स्वर्गीं गेले या प्रमाणें
बहुत सांगितलेलीं नारदाचीं भाषणें ऐकून शुकाचार्य परम बुद्धिमान् आ-
पले मनाचा निश्चय करून मनांत म्हणतो कीं, त्या लोकाहून उत्तम गतीस जावें,
कारण ज्या गतीस गेलें असतां पुनरावृत्ती होत नाहीं त्या स्थानीं जावें; परंतु
तें स्थान योगा वांचून प्राप्त होणार नाहीं त्या कारणास्तव योग साधन करू-
न हा देह टाकून सूर्यलोकीं जावें म्हणजे क्षय व वृद्धी त्या आपणास प्राप्त
होणार नाहींत किंवा हा माझा देह सूर्य सदनीं ठेवावा आणि आपण ऋषीं-
सह वर्तमान सूर्याचें अत्यंत दुःसह जें तेज आहे त्यास पावावें. असा वि-
चार करून त्यानीं नारदाची आज्ञा घेतली आणि ते शुक योगींद्र पित्या कडे आले.
पिता व्यास जो त्यास नमस्कार करून त्यानीं प्रदक्षिणा केली आणि ते बोलतात कीं, हे
व्यासा, माझे मनांत सूर्यलोकीं जाण्याचें आलें आहे यास्तव आज्ञा झाली
म्हणजे जाईन. असें ऐकून व्यास बोलतात हे शुका, तुला दिव्य चक्षु प्राप्त हो
ईतों पावतों त्या स्थानींच राहावें असें वचन बापाचें न ऐकतां तो शुक पि
त्यास टाकून कैलास पर्वताच्या पृष्ठ भागीं गेला. अ. वि. या. अ. आहे.

१५९. अध्याय एकशें एकुण साठ .— भीष्म सांगतात हे धर्मराजा,
तो शुक योगींद्र पर्वताच्या शृंगावर चढून तृण रहित स्थान सारखें
पाहून त्यावर बसला आणि त्यानें योगाभ्यास करण्यास आरंभ केला तों
पादापासून सर्व गात्रांचे ठायीं क्रमयोगानें योग मार्गाचा क्रम जाणून
त्यानीं आपले हस्त व पाद गृहण करून प्राचीदिशेकडे मुख केलें आ
णि देवर्षि नारदास प्रदक्षिणा करून ते बोलतात हे नारदऋषे, मी सूर्यलो
काचा मार्ग पाहिला यास्तव तुमच्या प्रसादानें त्या इष्ट गतीस जातों तुम
चें कल्याण असो असें बोलून तो शुकयोगींद्र नारदाची आज्ञा घेऊन त्या कै
लास पर्वताच्या पृष्ठ भागा वरून आकाश मार्गानें उडाला तो जाता जातांना
मार्गीं देवानीं त्या शुकावर पुष्प वृष्टी केली. सर्वांस आश्चर्य वाटलें आणि

ऋषी, सिद्ध, गंधर्व अप्सरा इत्यादिक म्हणतात कायहो त्या शुकाची योग-
गती सांगावी: आकाशमार्गानें उडून चालला आहे या प्रकारची त्यांचीं भा
षणें ऐकित ऐकित शुक चालले आहेत तों वाटेंत मलयाचल पर्वतावरउ
र्वशी व पूर्वचित्ती ह्या अप्सरा होत्या त्यानीं शुकास पाहून परम आश्चर्य
करितात आणि म्हणतात कीं, हा पितृभक्त खरा आहे आमचीं रूपें पाहून
ज्यास मोह उत्पन्न होत नाहीं असें शुकानीं त्या अप्सरांचें भाषण श्रवण
करून सर्व दिशाकडे पाहिलें आणि शुक सर्वांस सांगतात कीं आमचा
पिता व्यास हे शुका हे शुका म्हणोन हाक मारीत येईल त्यास तुम्हीं सर्वांनीं
प्रतिवचन द्यावें, असें ऐकून वनासहित सर्व दिशा, समुद्र, नद्या, पर्वत, वृ-
क्षादिक बोलतात हे शुकयोगींद्रा, तुम्हीं सांगितल्या प्रमाणें आम्हीं व्यासा-
स प्रतिवचन देऊं असा विषय या अध्यायांत आहे.

१६०. अध्याय एकशेंसाठ:– भीष्म सांगतात. हे धर्मराजा, असा ब्रह्म
वेत्ता शुक धर्म, ज्ञान वैराग्य, ऐश्वर्य, हे चतुर्विध दोष व सात्विक, राजस,
तामस, हे भाव त्यास टाकून नित्यनिर्गुण ब्रम्ह जें त्याचें ध्यान करीत चा-
लला असतां त्यावेळीं उल्कापात, भूमीकंप, वज्रपात, इत्यादि अरिष्टें
झालीं, नंतर सुगंध वाहणारा वायू सुटला हें पाहून पुढें हिमवान् व मेरुप-
र्वत यांचीं शृंगें सोन्यारूप्या सारिखीं असून शतयोजनें विस्तीर्ण खालींव
ऊर्ध्व अशीं सुंदर होतीं तीं उत्तर दिशेस गेलेल्या शुकानें, पाहून त्या शृंगा
वर तो पडला तेव्हां त्याच्या भारानें तीं शृंगें द्विधाविभागास पावलीं त्यावेळीं
महान् शब्द जाला नंतर शुक तेथून निःशंक निघाला. तों त्या शुकावर आ
काशांतून पुष्प वृष्टी झाली नंतर मंदाकिनी (आकाशगंगा) तिच्या वरून
चालला असतां त्या शुकानें त्या गंगेंत अप्सरा नग्न होऊन क्रीडा करीत हो
त्या त्यांस पाहिलें व त्यानीं शुकास नग्न पणानें पाहिलें तों मागून व्यास नि
मिषांतर मात्रांत शुकाच्या मागोमाग आले आणि त्या व्यासानीं हे शुका म्ह
णून दीर्घ स्वरानें त्यास हाक मारिली. तों सर्वात्मा सर्वगत शुक होऊन दि-
शा व वृक्षादिरूपानें पिता जो व्यास त्यास हे व्यासा, म्हणून प्रतिवचनत्या
[illegible] दिलें पाहून तो पुत्राचा अद्भुत महिमा आहे असें व्यास

अवलोकन करून आश्चर्यानें पुत्राचें चिंतन करीत चालले तो मंदाकिनीच्या ती-रीं अप्सरांचा समुदाय नग्न होऊन क्रीडा करीत असतां त्यानीं व्यास आलेले पाहून गडबडीनें वस्त्रें परिधान केलीं कांहीं स्त्रिया उदकांत लपून राहिल्या व कांहीं स्त्रिया वृक्षांच्या आड दडून राहिल्या असा चमत्कार पाहून व्यास मनांत म्हणतात कीं, माझ्या पुत्रासही स्त्री, हा पुरुष, असा भेद नाहीं परंतु माझे ठायीं हा भेद आहे असें समजून त्या देवांगनानीं वस्त्रें परिधान केलीं असा विचार व्यास करीत आहेत तों त्या स्थानीं शंकर प्राप्त झाले आणि बोलतात हे व्यासा, माझ्या वरप्रदानानें तुला पुत्र ब्रम्हनिष्ठ झाला तरी जो कालपर्यंत पर्वत व समुद्र आहेत तो कालपर्यंत तुझी पुत्रासहित अक्षय कीर्ति लोकीं विख्यात होईल. आतां त्या लोकांत शुकासारिखी छाया माझ्या प्रसादानें तूं अवलोकन करशील हा प्रसाद आम्हीं तुजवर केला आहे. असें शंकराचें भाषण ऐकून व्यासास शुकाची छाया दिसों लागली भीष्म सांगतात हे धर्मराजा हा इतिहास नारदानीं व व्यासानीं मला सांगितला हा महा पुण्यकारक संवाद मी तुला सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

१६१. अध्याय एकशें एकसष्ट :- धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, गृहस्थ, ब्रम्हचारी, वानप्रस्थ, सन्यासी, त्याच्यार आश्रमांत जो कोणी ब्रम्हलोक किंवा स्वर्ग व मोक्ष यांची सिद्धी व्हावी म्हणोन इच्छा करील तर त्या पुरुषानें कोणत्या विधीनें कोणत्या देवाची आराधना करावी किंवा पितरांचा पिता त्याची आराधना केल्यानें कोणाच्या प्रसादानें मनुष्यांस सिद्धी होते हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, हा प्रश्न गूढ आहे परंतु याविषयींचा नारदाचा व नारायणाचा संवाद तुला सांगतों पूर्वीं कृतयुगांत स्वायंभुव मन्वंतरीं नर, नारायण, हरि, कृष्ण असा चार मूर्त्यात्मक नारायणाचा अवतार झाला तोच सर्वांचा पिता त्या चार मूर्त्तींत नर व नारायण या उभयतानीं बदरिकाश्रमीं मोठें तप केलें तेव्हां त्या स्थानीं नारद ऋषी अकस्मात प्राप्त झाले हें पाहून त्यानीं नारदाची पूजा केली आणि त्यास आसनावर बसविलें नंतर नारद संतोषरूप अंतःकरणानें

नारायणास नमस्कार करून प्रश्न करितो हे नारायणा, सांगोपांग पुराणासहित वेदानीं तुमची स्तुती केली यामुळें अज, शाश्वत, जगाचा माता व पिता, सर्व तूंच आहेस यास्तव तुम्हांस विचारतों कीं, हे गृहस्थादि चार आश्रम जे आहेत त्यानीं कोणत्या देवांची व पितरांची पूजा करावी हें सांगा. असें ऐकून नारायण बोलतात हे नारदा, जें गुह्य आहे तें तुला सांगतों जें सूक्ष्म, ध्रुव, अचल, अव्यक्त, इतक्या विशेषणानीं युक्त असून इंद्रियादिकांसही गोचरीभूत होत नाहीं तो सर्व भूतांचा अंतरात्मा त्यास क्षेत्रज्ञ असें म्हणतात तो तीन गुणांहून पृथक् असणारा पुरुष कल्पित आहे त्यापासून त्रिगुणात्मक माया झाली तेव्हां तो जो क्षेत्रज्ञ देव त्याची पूजा आम्हीं करितों यास्तव दैव व पित्र्य कर्मे त्यासच देतात, तो आमचा सर्वांचा आत्मा जाणावा. त्या देवानें दैव व पित्र्य कर्मे नेमिलीं म्हणून लोकांत ती मर्यादा विख्यात झाली. हे नारदा, ब्रम्हदेव, महादेव, मनू, दक्ष, भृगु, धर्म, यम, मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ इत्यादिक एकविंशति ब्राम्हण क्षेत्रज्ञास पूजितात तेव्हां तोच मुख्य देव. या कारणास्तव त्याच्याच प्रसादानें मनुष्य उत्तम गतीस पावतात. असा विषय या अध्यायांत आहे.

१६२. अध्याय एकशें बासष्ठ:— भीष्म सांगतात. हे धर्मराजा, या प्रकारानें नारायणाचें भाषण श्रवण करून नारद बोलतात. हे नारायणा, ज्या कारणास्तव तुम्हीं अवतार धारण केला ती श्वेत द्विपावर राहणारी तुमची आद्यमूर्त्ती पाहावी या कारणानें आज मी गमन करितों कारण त्या तुमच्या मूर्तीचे दर्शनाविषयीं माझा अधिकार आहे; निरंतर गुरुपूजा, परावर अनुग्रह करणें, वेदाध्ययन, तप, असत्य भाषण वर्ज, हस्त व पाद, उदर, उपस्थ, यांचें यथाशास्त्रानें रक्षण, शत्रु व मित्र यांचे ठायीं समान राहाणें, भगवंताचे ठायीं एकांत भक्ती, हे धर्म माझे ठायीं असल्यास आपली आज्ञा व्हावी. असें ऐकून नारायण बोलतात. हे नारदा, तूं माझी मूर्त्ती पाहाण्यास जावें. असें ऐकून नारद तेथून उडाले ते आकाशमार्गानें क्षीर समुद्राच्या उत्तरभागीं श्वेत द्वीपावर आले आणि पाहातात तों

तेथें पुरुष, स्थूल देहांचे संग शून्य असणारे, भोजनरहित, विषयभोगरहित, चेष्टारहित, ध्यान करणारे, शुद्धसत्वात्मक, पापरहित, इत्यादि बहुलक्षणानीं युक्त असणारे त्यांस नारदानीं पाहिलें धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, इंद्रिय रहित व निराहारी, निश्चेष्ट इत्यादि लक्षणांचे ते पुरुष कसे उत्पन्न झाले व त्यांस उत्तमगती कोणती किंवा तेच जीवन्मुक्त व ब्रम्हाचे ध्यानयुक्त योगी आहेत या विषयांची शंका दूर करावी. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, या विषयीं इतिहास सांगतों; पूर्वी इंद्राचामित्र उपरिचर या नामें राजा होता त्यास नारायणाच्या वरप्रदानानें सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त झालें. तेव्हां तो राजा पूर्वी सूर्यमुखापासून निघालेला जो पांचरात्र विधि त्यानें नारायणाची पुजा परम भक्तीनें करून त्या राजानें सर्व अन्न विष्णूस अर्पण करून शेषान्न भक्षण करावें इत्यादि बहुत नियम करणारा राजा हें सर्व राज्य नारायणा तुझें आहे असे शुद्ध भावानें बोलून धर्मानें तो राज्य करीत असतां तेथें मरीचि इत्यादि सप्त ऋषी व अन्य सत्यधर्मपरायण ऋषी होते यास्तव आपले राज्यांत त्या राजानें मर्यादा स्थापन केल्या कारण नारायणाची भक्ति सर्वांस प्राप्त व्हावी म्हणून त्या ऋषीनीं देवांचीं सहस्त्र वर्षे पर्यंत नारायणाची आराधना केली हें पाहून नारायणानीं अनुशासन केलेली सरस्वतीदेवी त्या ऋषीच्या मुखीं प्रवेशली त्याकालीं ऋषींनीं ओंकार व स्वर यांही युक्त असें शास्त्र निर्माण करून नारायणास श्रवण करविलें त्यावेळीं नारायण प्रसन्न होऊन अदृश्य रूपानें त्या ऋषींस बोलतात हे ऋषी हो, तुम्हीं शतसहस्त्र संख्या श्लोक बद्ध केलेलें धर्मशास्त्र हें परम उत्तम आहे. सकल लोकतंत्राचा धर्म ज्या शास्त्रापासून प्रवृत्त होईल आणि हें शास्त्र प्रवृत्ति व निवृत्तिपर यजुर्वेद, ऋग्वेद, सामवेद आणि अथर्वणवेद यांहीं सेवित, ज्याप्रमाणानें ब्रम्हदेवास मी आपले प्रसादानें उत्पन्न केलें, त्याच्या क्रोधापासून रुद्र झाले, ऋषी व सूर्य, चंद्र इत्यादि सर्व उत्पन्न झालेले त्या शास्त्रांत सांगितले आहेत आणि त्या शास्त्रापासून स्वायंभूवमनु धर्म सांगेल. शुक्र व बृहस्पती हे ज्या कालीं उत्पन्न होतील त्या कालीं हें

तुम्हीं निर्माण केलेलें शास्त्र,अध्ययन करतील, प्रजापालक वसुराजा, बृहस्पती पासून हें शास्त्र अध्ययन करील हे ऋषीहो तुम्हीं हें शास्त्र प्रसिद्ध केलें त्या योगानें प्रजावंत व्हाल, तो वसुराजा, राज्यलक्ष्मीनें युक्त होईल, पुढें तो राजा मोक्षास गेला म्हणजे हे शास्त्र गुप्त होईल, इत्यादि प्रकारानीं त्यां द्विजसत्तम ऋषींस सांगून नारायण अदृश्य झाले नंतर त्या ऋषीनीं तें धर्मशास्त्र लोकांत प्रसिध्द केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१६३. अध्याय एकशें त्रेसष्ट.– भीष्म सांगतात हे धर्मराजा, नंतर तो महा प्रलय गेल्यावर प्रथम युगांत अंगिराऋषी पासून बृहस्पती उत्पन्न झाला त्यानीं तें शास्त्र अवलोकन करतांच ते त्यांत निपूण झाले हें पाहून तो उपरिचर वसुराजा बृहस्पतीचा शिष्य होऊन त्या राजानें तें शास्त्र उत्तम प्रकारानें अध्ययन केलें असा तो राजा जसा इंद्र स्वर्गाचें पालन करितो तसा तो पृथ्वीचें पालन करीत असतां कांहीं दिवसानीं त्या वसुराजानें अश्वमेध यज्ञास आरंभ केला त्यावेळीं त्या यज्ञांत बृहस्पती होता, ब्रम्हपुत्र एकत, द्वित, त्रित हे तीन ऋषी सदस्य, धनुषाख्य. रैभ्य, अर्वावसु, परावसु, मेधातिथी, तांड्य, शांति, वेदशिरा, कपिल, शालिहोत्र, कठ, तैत्तिरि, वैशंपायन. कण्व, देवहोत्र, हे षोडश ऋत्विज यांशीं सहित सर्व सामग्री मिळवून त्या राजानें यज्ञ केला, परंतु त्या यज्ञांत पशुघात न करतां त्यानें अहिंसारूप यज्ञ केल्यानें त्या राजास नारायण प्रसन्न होऊन त्यानीं अदृश्य रूपानें यज्ञाचा भाग पुरोडाश गृहण केला हें पाहून बृहस्पती परम क्रोधानें बोलतो हे राजा, हा हविर्भाग गुप्त रूपानें नारायणानीं गृहण केला हे चांगले केलें नाहीं यास्तव त्यानीं आपलें स्वरूप प्रगट करून प्रत्यक्ष पुरोडाश गृहण करावा असें ऐकून धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, त्या राजाच्या यज्ञाचे हविर्भाग देवानीं प्रत्यक्ष गृहण केले असतां गुप्तरूपानें येऊन हविर्भाग नारायणानीं कोणत्या अर्थानें गृहण केला आणि आपलें दर्शन त्यास दिलें नाहीं याचें कारण सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्याकाळीं बृहस्पतीस क्रोध आला हें पाहून वसुराजानें त्याचें सांत्वन केलें. राजा म्हणतो हे बृहस्पते, कृतयुगीं हा

धर्म नाहीं यास्तव तुम्हीं क्रोध टाकावा, कारण तो नारायण तुमच्या व आम-च्या दृष्टी पडण्या विषयीं समर्थ होणार नाहीं असें राजा बोलिल्यावर तेएकत, द्वित, त्रित हे ऋषी बोलतात हे बृहस्पते, पूर्वी आम्हीं सहस्त्रावधी वर्षे तप केलें परंतु नारायणाचें दर्शन आम्हांस होईना तेव्हां आकाशवाणी झाली कीं क्षीरसमुद्राच्या उत्तर भागीं श्वेतद्वीपावर सहस्त्र सूर्यांसारिखा तेजस्वी नारायण राहात आहेत त्या नारायणाचें दर्शन त्यास्थानीं राहाणारे जे इंद्रियरहित, निराहारी, निश्चेष्ट, सुगंधी, अशा प्रकारचे आहेत त्यांस दर्शन होतें त्या वांचून इतरास दर्शन होणे दुर्लभ आहे यास्तव तुम्हीं तेथें जावें अशी आकाशवाणी ऐकून आम्हीं त्या देशांत गेलों आणि पुन: शंभरवर्षे तप केलें नंतर त्या श्वेतद्वीपीं राहाणारे नारायणाचे भक्त एकवार आमच्या दृष्टीपडले ते कसे, जशी सहस्त्र सूर्यांची प्रभा एकदांच दृष्टी पडावी तशी त्या पुरुषांची प्रभा अकस्मात आम्हीं पाहिली. पुन: अदृश्य झाली तेव्हां आम्हीं त्या नारायणाच्या दर्शनाविषयीं यत्न पुष्कळ केला परंतु दर्शन झालें नाहीं तों इतक्यांत आकाशीं कोणीएक देव येऊन आम्हांस बोलतो कीं, तुम्हीं श्वेतद्वीपीं जाऊन तेथें राहाणारे नारायणाचे भक्त इंद्रियरहित, निराहारी, निश्चेष्ट, इत्यादि गुणानी युक्त जे आहेत त्यांस तुम्हीं पाहिलें. आतां यथेच्छ आप आपले स्वस्थानीं जावें, कांहींकालांतरानें तुम्हांस तो नारायण दर्शन देईल आतां त्या वेळीं दर्शन होणार नाहीं. असें ऐकून आम्हीं निघोन आलों तेव्हां हे बृहस्पते, आम्हीं फार यत्न केला परंतु तो देव पाहिला नाहीं यास्तव तो देव तुमच्या दृष्टीस कसा पडेल या साठीं तुम्हीं आपला क्रोध शांत करावा. असें त्या एकत, द्वित, त्रित, त्या ऋषींचें भाषण ऐकून बृहस्पतीनीं यज्ञ समाप्त केला. असा त्या राजाचा यज्ञ समाप्त झाल्यावर त्या वसुराजानें प्रजेचें यथाशास्त्र पालन केलें नंतर ब्राम्हणांच्या शापानें तो राजा स्वर्गांतून भ्रष्ट होऊन पाताळीं गेला. पुन: नारायणाच्या प्रसादानेंच तो राजा ब्रम्हलोकास गेला. अ. वि. या अ. आहे.

१६४: अध्याय एकशें चवसष्ठ.— धर्मराज प्रश्न करितात हे भी-

त्या, असा तो राजा महाभागवत असतां कोणत्या कारणानें राज्यावरून भ्रष्ट झाला आणि तो पातालीं गेला हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, याविषयीं झालेला ऋषींचा आणि देवांचा संवाद तुला सांगतों. कोणीएकेवेळीं देव, ऋषींस बोलतात कीं हे ब्राम्हण हो, तुम्हीं अजानें यजन करावें कारण तो अजपशु जाणावा. असें ऐकून ते ऋषी बोलतात हे देव हो, बीजानीं यज्ञ करावा असें श्रुतींत सांगितलें आहे यास्तव अजास मारूं नये. हा धर्म योग्य आहे, कारण हें कृतयुग श्रेष्ठ असतां कसा पशूस मारावा तेव्हां पशूस न मारावा हा धर्म श्रेष्ठ आहे. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या प्रकारानें देव व ऋषी बोलत असतां त्या स्थानीं वसुराजा प्राप्त झाला नंतर ब्राम्हण बोलतात हे देवहो, आपला उभयतांचा संशय हा वसुराजा दूर करील असी परस्पर निश्चय करून ते देव व ऋषी त्या राजास बोलतात हे वसुराजा, अजमारून यज्ञ करावा किंवा धान्यानीं करावा त्यांत आमचा पक्ष धान्यानीं यज्ञ करावा आणि देवांचापक्ष पशूमारून यज्ञ करावा या विषयीं निश्चय तूं सांग. असें ऐकून राजा बोलतो हे ऋषी व देवहो, पशूनें यज्ञ करावा. असें ऐकतांच ते ब्राम्हण क्रोधास पावून त्या राजास शाप देतात कीं हे राजा, ज्या कारणास्तव तूं देवांचा पक्ष धरून बोललास यास्तव आजपासून तुझी गती आकाशीं न होतां तूं स्वर्गांतून पतन पाव आणि पृथ्वीचा भेद करून पातालीं राहा. असें ऐकतांच तो उपरिचर राजा मुहूर्त मात्रांत विमानांतून भ्रष्ट होऊन पडला. आणि पातालीं गेला. परंतु त्या राजाची स्मृती नारायणाच्या आज्ञेनें भ्रष्ट झाली नाहीं तेव्हां देवानीं विचार केला कीं, आमच्यापक्षानें हा राजा बोलला तरयास शापांतून मुक्त करणें आम्हांस आहे असा निश्चय करून देव त्या राजाजवळ घेऊन बोलतात हे राजा, या पातालीं तूं राहात असतां तुला ग्लानी व क्षुधा, तृषा यांची बाधा होणार नाहीं तर ब्राम्हणांनीं हिंसारूप यज्ञांत वसोर्धारा दिली म्हणजे नारायण संतोषून तुला ब्रम्हलोकास नेईल तो कालपर्यंत पातालीं स्वस्थ राहा. असें ऐकून तो राजा पातालीं राहात असतां त्यानें यज्ञ केला त्या योगानें नारायण संतुष्ट होऊन बोलतात हे गरुडा, भूमीच्या विवरांत वसुराजा आहे त्यास घेऊन तूं ब्रम्ह

लोकीं नेऊन सोडावेंस. असें ऐकतांच गरुडानें त्या राजास आपले पंखावर बसऊन तेथून ब्रम्हलोकीं नेऊन ठेविला. असा राजा शरीरासहित ब्रम्हलोकीं जाऊन आनंद पावला. या प्रकारें तूं प्रश्न केलास त्या राजाची कथा तुला सांगितली. असें ऐकून धर्मराज संतोष पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९५. अध्याय एकशेंपांसष्ट.- भीष्म सांगतात हे धर्मराजा, भगवान्नारद ऋषी त्या श्वेतमहाद्वीपास जाऊन तेथें राहणारे श्वेतवर्ण व चंद्रासारिख्या प्रभेनें शोभणारे असे पुरुष नारायणाचे भक्त त्यांस पाहून नारदानीं त्या पुरुषांची आपलें शिर व मन यांहीं करून पूजा केली, त्यानींही नारदाचा सत्कार करून पूजा केली त्यावेळीं नारायणानें दर्शन द्यावें या कारणानें एकाग्र मन करून नारदानीं गुणात्मा असून निर्गुणस्वरूपी जो श्रीनारायण याच्या स्तुतीस आरंभ केला. नारद म्हणतात हे देव देवेंद्रा, तुम्हांस नमस्कार असो. हे निष्क्रिय, निर्गुण, लोकसाक्षी, क्षेत्रज्ञ, पुरुषोत्तम, अनंत पुरुष, महापुरुष, पुरुषोत्तम, त्रिगुण, प्रधान, अमृत, अमृताख्य, अनंताख्य, व्योम, (आकाश) सनातन, सदसद्व्यक्ताव्यक्त, (कार्याकारणात्मक) ऋतधाम (सत्यस्वरूप) आदिदेव, वसुप्रद, प्रजापते, सुप्रजापते, वनस्पते, महाप्रजापते, ऊर्जस्पते, वाचस्पते, जगत्पते, इत्यादि एकशें सत्याण्णव नामें व भक्तवत्सल, ब्रम्हण्यदेव, हीं दोन अशा एकशें नव्याण्णव नामांचें स्तोत्र पठण करून नारद म्हणतात आहो नारायणा, ज्यांचें दर्शन एकांतीं होणार असे तुम्ही आहांत यास्तव मी भक्त तुमचे दर्शनाकरितां या स्थानीं आलों आहें तरी निर्विकल्प स्वरूपी असणाऱ्या तुम्हांस माझा नमस्कार असो मला आपण दर्शन द्यावें. असा विषय या अध्यायांत आहे.

१९६. अध्याय एकशें साह्मसष्ट.- भीष्म सांगतात हे धर्मराजा, या प्रकारें नारदानीं गुह्यनामें करून स्तुती केली ती ऐकून विश्वरूपधारण करणाऱ्या भगवाननें त्या नारदास आपलें स्वरूप दाखविलें तें असें, कांहीं चंद्रासारिखें, कांहीं चंद्राहूनही अधिक प्रकाश, स्फटिकमण्या सारिखें, प्रवालमणी, श्वेतवर्ण, सुवर्ण

वर्णासारिखें, वैडूर्यमणी, नील वैडूर्यमणी, इंद्रनीलमणी, मयूरकंठासारिखाव र्ण. कुठें मोत्यांच्या हारासारिखा वर्ण, अशा बहुत प्रकारच्या वर्णांनीं युक्त रूपें धारण करणारा, सहस्रनयन, ज्यास मस्तकेंशत, ज्यास पादसहस्र, ज्यास उदरें व बाहू सहस्र, ज्याचा मुखापासून ओंकार पूर्वक गायत्रीचाउ च्चार होत आहे, सर्व जीं शेष मुखें राहिलीं त्यांपासून चार वेद व अरण्या- चें पठन, कमंडलु, शुभ्रमण्यांच्या माळा, पादुका, कुश अजिन, दंड, ज्व- लित अग्नी, इत्यादि सर्व धारण करणारा साक्षात्प्रसन्न झालेल्या नारायणा स नारदानीं दंडासारिखा नमस्कार केला हें पाहून श्रीभगवान् बोलतात. हे नारदा, एकत, द्वित, त्रित, त्या महर्षींनीं माझ्या दर्शना विषयीं बहुत व र्षें तप केलें आणि ते त्या स्थानीं दर्शन घेण्यास आले परंतु त्यांस माझें दर्शन झालें नाहीं तूं परम भक्त यास्तव तुला दर्शन दिलें आतां माझे म- त्स्य व कूर्म इत्यादि अवतार जे झाले त्याचें भजन कर. हे नारदा, मी प्रस न्न झालों वर माग असें ऐकून नारद बोलतात हे भगवन्, आज माझ्या तपा ची सिद्धी व यम नियमाचें फल सद्यः कालीं आज मला प्राप्त झालें का रण साक्षात् विश्वमूर्ती नारायण तुम्हांस मी पाहिलें त्या योगानें कृतार्थ झालों ह्याचवर असो. असें ऐकून नारायण बोलतात हे नारदा, आतां तूं जा वेंस चिरकाल येथें राहूं नकोस कारण माझे भक्त त्या स्थानीं जे आहेत ते एकाग्रचित्तानें माझें ध्यान करितात त्यास तूं फारवेळ यास्थानीं राहि- ल्यानें विघ्न होईल. यास्तव तुला जावें म्हणून सांगितलें हे नारदा, मी स र्वगत साक्षी लोकांचा आत्मा आहें सर्व भूतांचा नाश झाला तरी माझा नाश नाहीं आणि माझ्या स्वरूपीं प्रवेश करून ब्राम्हण मुक्त होतात तो परमात्मा वासुदेव पुरुषानीं मला जाणावा. पाहा पाहा नारदा, ज्या चा आश्रय केल्यानें सर्वलोक शुभाशुभ कर्मांपासून मुक्त होतात हे नारदा आतां तुला माझ्या निर्गुण रूपाचें नाशरहित तत्व सांगतो पृथिवी उदकीं लय पावते, उदक ज्योतिचे ठायीं, ज्योति वायूचे ठायीं, वायू आकाशीं, आकाश मनाच्या ठायीं, मन महतत्वाचे ठायीं, महत्तत्व अ- व्यक्तरूप मायेचे ठायीं, माया निष्क्रिय ब्रम्हाचे ठायीं लय पावते आ

तां त्या ब्रह्मापासून अन्य दुसरें कोणीएक नाहीं म्हणून निर्गुण ब्रह्म सच वासुदेव असें म्हणतात या कारणास्तव तो वासुदेव सर्व भूतांचा अंतरात्मा मी व्यापक होऊन चैतन्यरूपानें त्या जगाचे सर्व व्यापार माझ्या सत्तेनें होतात आतां पुरुषांच्या शरीरीं जीव म्हणून माझाच अंश म्हणजे मीच आहें तो जीव त्या शरीरांत जर नाहीं तर वायू चलनादिक करण्यास समर्थ नाहींत याल्तव त्या जीवास सनत्कुमारत्वपणा प्राप्त झाला,त्या जीवापासून प्रद्युम्नाख्य मन झालें त्या मनाचे ठायीं भूतांचा नाश व उत्पत्ती होतात हे नारदा, त्या प्रद्युम्न संज्ञक मनापासून अनिरुद्धाख्य अहंकार झाला त्या कारणास्तव त्या जीवास तूं वासुदेवच जाणावेंस.कारण माझ्या पासून हें स्थावर जंगमात्मक विश्व उत्पन्न होतें आणि लयही पावतें म्हणून पंचविंशति तत्वात्मक निष्क्रिय या प्रकारचें माझें स्वरूप तूं जाणावेंस हे नारदा,जें सगुणरूप तूं पाहिलेंस हें मायेंकरून मी तुला दाखविलें आहे परंतु मुख्य रूप निर्गुण जें त्यापासून माझ्या मूर्तीचे चतुर्व्यूहप्रद्युम्नादिक जे झाले हे तुला सांगितले.माझा सर्वत्र व्यापक भाव जो आहे तो भूतसमुदायाचीं शरीरें नाश पावलीं असतां नाश पावत नाहीं आतां मजपासून चतुर्मुखाचा ब्रह्मदेव झाला, माझ्या क्रोधापासून रुद्र झाला, दक्षिणभागीं एकादशरुद्र,वामभागीं द्वादशादित्य, पुढें अग्रभागीं अष्ट वसु,नासत्य व दस्र हे वैद्य पृष्ठभागीं, सर्व प्रजापति, सप्तऋषी,वेद,यज्ञ,अमृत, औषधी, तपें, नियम, यम, अष्ट गुणात्मक ऐश्वर्य,श्री,लक्ष्मी,कीर्ति,पृथिवी, सावित्री,सरस्वती, ध्रुव, समुद्र, सरोवरें, नद्या, मूर्तिमंत पितृगण, सत्वादि तीन गुण, हें सर्व विश्व माझ्या रूपाचे ठायीं पाहा, हे नारदा,या सर्व जगाचा पिता मी आहें, हयग्रीव अवतार धारण करून ब्रह्मदेवाचे मनोरथ पूर्ण केले,तसाच मी वराह अवतार धरून हिरण्याक्षास मारीन, नारसिंह अवतार धरून हिरण्यकश्यपूस मारीन, विरोचनाचा पुत्र बलीसर्व लोकांस अवध्य होऊन इंद्राचें राज्य हरण करील तेव्हां मी वामन अवतार घेऊन बलीस पातालीं घालून इंद्रास राज्य देईन, त्रेतायुगीं मी परशुराम अवतार धारण करून सर्व क्षत्रियांचा नाश करीन,त्रेतायु

ग व द्वापार यांच्या संध्याशीं मी दाशरथी राम होऊन सर्व राक्षसांसहित राव णास मारीन, द्वापार व कलयुग यांच्या संधींत कृष्ण अवतार धारण करून कं स व नरकासूर, मुरुपीठ इत्यादि सर्व दैत्य मारून पांडव युधिष्ठिर जो त्याची बंधूशीं सहित स्वराज्यावर स्थापना करीन नंतर लोक बोलतील कीं नरव नारायण यानीं कृष्ण व अर्जुन यांचा अवतार घेऊन पृथ्वीचा भार दूर केला, या प्रकारानें कल्कि इत्यादि बहुत अवतार कलयुगीं घेऊन देवांचें का र्य व लोक कार्येहीं करीन हे नारदा, असे माझे अवतार मागें झाले व पुढें होणार हे सर्व पुराणांतरीं प्रसिध्द आहेत, या प्रकारें तुझी भक्ती उत्तम पाहून हें गोप्य भविष्य तुला सांगितलें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, या प्रकारें करून तो नारायणदेव नारदास बोलून तेथेंच गुप्त झाला. नंतर नारायणापासून अनुग्रह प्राप्त झालेला नारद तेथून निघाला तो बदर्याश्रमीं नरनारायणासन्निध प्राप्त झाला तस्मात् हें चार वेदाशीं तुल्य महा उपनिषद्भाग रूप नारायणाच्या मुखांतून निघालेलें कथानक नारदानीं ब्रम्हलोकीं येऊन ब्रम्हदेवास सांगितलें. असें ऐकून धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, हें नारायणाचें आश्चर्यभूत महात्म्य ब्रम्हदेवानीं नारदापासून श्रवण केलें तेव्हां ब्रम्हदेवास मुखीं लें ठाऊक होतें किंवा नारदापासून ऐकिल्यावर ठाऊक झालें हें सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात. हे धर्मराजा, पूर्वीं सहस्त्रावधि व शतावधी महा प्रलय आणि उत्पत्तिरूप सर्ग हे गेले तेव्हां ब्रम्हदेव नारायणाचें महात्म्य जाणतो परंतु ब्रम्हलोकीं अन्यजे कोणी सिध्द होते त्यांस नारदानीं हें वेदतुल्य पुराण रूप माहात्म्य सांगितलें त्या सिध्दानीं सूर्यास, सूर्यानीं साहासष्ट सहस्त्र वालखिल्य ऋषींस, त्या ऋषीनीं देवांस, देवानीं असितऋषीस, त्यानें पितरांस, त्यानींमाझ्या पित्यास, माझा पिता शांतनु त्यानीं मला सांगितलें, तें महात्म्य मी तुम्हांस सांगितलें. तस्मात् हे राजा, हें परंपरागत प्राप्त झालेलें आख्यान तुम्हीं वासुदेवाची भक्तिशून्य पुरुषास सांगूं नये. भक्तिमंत पुरुषांस सांगावें. आतां हें आख्यान श्रवण व पठण करणाऱ्या पुरुषांस कृतार्थता होईल. यास्तव हें आदरानें पुरुषानीं श्रवण करावें हे धर्मराजा, सर्व जगाचा गु

जो नारायण तो हा श्रीकृष्ण सर्वांचा पिता व माता भगवान् हा तुम्हांवरकृ
पा करो. वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, धर्मराजानें आपल्या भ्रा
त्यांसहित हें आख्यान भीष्मापासून श्रवण केल्यावर नारायणाच्या मं
त्राचा जप करण्याविषयीं ते पांडव तत्पर झाले, सूत सांगतात हे शौ
नकादिकऋषीहो. वैशंपायनानें हें सर्व नारायणाचें आख्यान जनमेज
य राजास सांगितलें नंतर त्याप्रमाणें जनमेजय राजानें श्रवण केल्याव
र यथाविधीनें जपादिक केलें त्याप्रमाणें तुम्हीं ही करावें. अ. विप्रा अध्य

१६७. अध्याय एकशें सदुसष्ट.— शौनक प्रश्न करितात हे सूता,
यज्ञधारी भगवान् मोक्षधर्माचें सेवन करितो आणि प्रवृत्ति धर्मांचेठा
यीं देवानीं यज्ञ भाग घेऊन राहावें असें सांगतो त्यास त्यानें निवृत्तिधर्म
कसे केले व प्रवृत्तिधर्मी देवांस कसें योजिलें हें सांगा. सूत सांगतात हे
शौनका, जनमेजय राजानें व्यासाचा शिष्य वैशंपायन यास प्रश्न केला
त्या प्रमाणें सर्व पुराणांतील कथानक सांगतों जनमेजय प्रश्न करितो
हे वैशंपायन ऋषे, ब्रम्हदेवाशीं सहित हे सर्व लोक, कर्मांचे ठायीं अत्यं
त तत्पर दिसतात आणि तुम्हीं सांगितल्याप्रमाणें मोक्ष सुख उत्कृष्ट
आहे परंतु तें सुख मोक्ष धर्माचें अनुष्ठान केल्यावांचून प्राप्त होत ना
हीं तेव्हां मोक्षधर्माचें अनुष्ठान कठीण आहे म्हणून देव, हव्य कव्य भक्ष
ण करणारे झाले तेव्हां मोक्ष धर्म टाकून ब्रम्हदेव, रुद्र, इंद्र, सूर्य, वायु,
अग्नि, वरुण, इत्यादिक देव हे आपला प्रलय होणार असें जाणत नव्ह
ते म्हणून निश्चल ब्रम्हजें त्याचे ठायीं भक्ति त्यानीं केली नाहीं आणि ते
प्रवृत्ति मार्गीं राहिले तेव्हां प्रवृत्तिमार्गीं कर्म करणाऱ्या पुरुषांस महान्
दोष सांगतात या साठीं निवृत्ति मार्गीं न लागतां देव, हव्य कव्य भक्षण
करणारे कसे राहिले हा संशय दूर करावा. असें ऐकून वैशंपायन सांगता
त हे जनमेजय राजा, हा प्रश्न तूं अत्यंत गूढ केला आहेस तर याचें उत्त
र आमचे गुरु वेदव्यास यांस आम्हीं प्रश्न केल्यावर त्यानीं सांगितलें त्या
हे तें तुला सांगतों. कोणी एके वेळीं सुमंतु, जैमिनी, पैल, चवथा शिष्य मी
वैशंपायन आणि शुक हे पांचवा हे आम्हीं पांच शिष्य शौच व आचार इत्यादि

नियमानींसंपन्न असणाऱ्या आम्हांस व्यासानीं पांचवें महाभारत या सुद्धां वेदांचें अध्ययन सांगितलें तेव्हां आम्हीं हाच प्रश्न केला तो ऐकून व्यास सांगतात हे शिष्यहो, हें जाणावें म्हणून पूर्वी मी बहुत तप केलें त्यायोगें नारायण प्रसन्न होऊन मला बोलले हे व्यासा, तुम्हांस माझ्याप्रसादानें त्रिकाल ज्ञान होईल असें नारायणानीं सांगितलें त्यावरून ज्ञान मला प्राप्त झालें आहे यास्तव तुमचा संशय दूर करितों. हे शिष्यहो, परमात्मा जो त्याचे प्रतिबिंब भूत हे देव आहेत तेव्हां त्या देवांस आम्हीं दिलेले यज्ञ भाग ते देव गृहण करितात, जर आम्हीं देवांस यज्ञभाग न दिले तर आम्हांस महान् दोष आहे यास्तव यज्ञ भागानीं संतोष केलेले देव आम्हांस इच्छित भोग देत आहेत, तेव्हां देवानीं पर्जन्य वृष्टीनें दिलेले भोग आम्हीं त्यांस कसे न द्यावे म्हणोन प्रवृत्तिमार्ग अवश्य करावा अशी आज्ञा भगवंताची आहे यास्तव देव, मोक्ष धर्मी आसक्त न होतां प्रवृत्ति मार्गी राहिले आहेत. आतां परमात्म्यापासून माया व चित्त इत्यादि पंचमहाभूतांसहित पंचवीस तत्वें झालीं नंतर महर्षी व देव झाले आणि त्यांनीं ब्रम्हदेवास प्रार्थना केली कीं हे ब्रम्हदेवा, लोक सिद्धीच्या अर्थास्तव तुम्हीं आम्हांस उत्पन्न केलें परंतु ज्यानें ज्या अधिकारावर राहावें असा अधिकार व सामर्थ्य हें तुम्हीं आम्हांस द्यावें म्हणजे त्या प्रमाणें आम्हीं वागणुक करूं असें ऐकून ब्रम्हदेव बोलतात हे देवहो. जें तुम्हीं आम्हांस निवेदन केलें हें उत्तम आहे तुमचें कल्याण असो मलाही तुमची चिंता आगोदरच प्राप्त झाली आहे यास्तव तुम्हीं व आम्हीं सर्व मेळून क्षीर समुद्राच्या उत्तर तीरीं जाऊन नारायणाची प्रार्थना करूं म्हणजे तो देव आपलें रक्षण करील. असें ऐकून ते सर्व देव ब्रम्हदेवासहित क्षीर समुद्राच्या तीरीं येऊन ज्याची दृष्टी व बाहू ऊर्ध्व व एकाग्रमन आणि जे एकपदावर उभे राहिले आणि त्यानीं देवांचीं सहस्त्र वर्षे पर्यंत तप केलें हें पाहून नारायण आकाशवाणीनें त्या सर्वांस सांगतात कीं, हे ब्रम्हदेवासहित देव व महर्षीहो, तुमचें आगमन कोणत्या कारणानें झालें हें सर्व मी जाणिलें ज्या अर्थास्तव तुम्हीं तप केलें त्या

र्थी तुम्हांस तपाचें फल देतों हे देव व महर्षीहो, हा ब्रम्हदेव सर्व लोकांचा गुरू आहे तेव्हां तुम्हीं सर्वांनी यज्ञ करून त्या यज्ञाचे ठायीं मला पृथक्पृणानें भागाची योजना करावी म्हणजे ज्यास जो अधिकार द्यावयाचा त्याप्रमाणें देऊन मी तुमचें कल्याण करीन. या प्रकारें तें नारायणाचें वाक्य श्रवण करून हर्षपावलेले ते देव, ब्रम्हदेव, महर्षी, याणीं वेदोक्त विधीनें वैष्णव यज्ञास आरंभ केला आणि त्या यज्ञाचे ठायीं प्रथम ब्रम्हदेवानीं आपला भाग योजिला नंतर ते देव व देवर्षी याणीं आप आपले भाग पृथक् योजून आदित्यवर्ण जो नारायण त्यास अर्पण केले. नंतर नारायण आकाशांतून देवांस बोलतात. हे देवहो, तुम्हांत ज्यानें जसा भाग कल्पिला तसा ब्रम्हदेवासहित सर्वांचाभाग मला पोंचला. त्या योगानें मी संतुष्ट झालों. आतां याचें फल तुम्हांस प्राप्त होईल. तुम्हीं प्रवृत्तिलक्षण धर्मी राहाल, जे कोणी पुरुष युगायुगीं यज्ञ करतील ते यज्ञांतील हविर्भाग तुम्हांस कल्पितील यास्तव देव, यज्ञ, औषधी, मी निर्माण केल्या कीं जे नर त्या द्रव्यानीं पृथ्वीचे ठायीं मला व तुम्हांस संतुष्ट करतील त्यांचे मनोरथ पूर्ण होतील तुम्हीं अधिकाराविषयीं माझें चिंतन कराल तेवेळीं साम्यर्थ्यानुरूप अधिकार तुम्हांस प्राप्त होईल. मरिचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, हे सात मानस पुत्र ब्रम्हदेवापासून झालेले वेदार्थ जाणणाऱ्यांमध्यें मुख्यत्वेंकरूनश्रेष्ठहोतील आणि पृथ्वी प्रवृत्तिलक्षण धर्माचा स्वीकार करतील आतां सन, सनत्सुजात, सनक, सनंदन, सनत्कुमार, कपिल, सनातन, हे ब्रम्हदेवाचे मानसपुत्र स्वतः आत्मज्ञान संपन्न व योग्यांमध्यें मुख्य असून सांख्य ज्ञानानें निपुण आणि मोक्षधर्माचे प्रवर्तक होतील. आतां तुम्हीं आपआपले अधिकारावर जावें. कृतयुगीं संपूर्ण चारपादानीं युक्त धर्म राहील व पशूंची अहिंसा, त्रेतायुगीं पशूवर प्रोक्षण करितांच पशूवध पावतील आणि तीन पादानीं युक्त धर्म तसाच द्वापार युगीं दोन पाद युक्त धर्म राहील. कलियुगीं एकपादधर्म राहील. असें ऐकून देव व देवऋषी प्रश्न करितात हे नारायणगुरो, कलयुगीं एकपादधर्म राहिल्यावर आम्हीं कर्में करावें तें सांगा. असें ऐकून नारायण बोलतात. हे देवऋषीहो,

जो देश वेद, यज्ञ, तप, सत्य, दम, अहिंसाधर्म इत्यादिकांनीं युक्त असेल त्या देशीं तुम्हीं राहावें म्हणजे अधर्म तुम्हांस स्पर्श करणार नाहीं. व्यास सांगतात हे शिष्यहो, भगवंतानीं उपदेश केलेले देव व ऋषीगण त्यांस नमस्कार करून आप आपले देशीं निघून गेले ब्रम्हदेव एकटाच तेथें राहिला हें पाहून नारायणानीं हयग्रीव अवतार घेऊन सांगवेदांची आवृत्ती ब्रम्हदेवास सांगितली नंतर ब्रम्हदेवानीं त्या हयग्रीव देवास नमस्कार करून लोकहिता विषयीं त्या देवाची स्तुती केली नंतर भगवान् बोलतात हे ब्रम्हदेवा, जे वेळीं तुला संकट पडेल त्या वेळीं अवतार घेईन असें सांगून भगवान् गुप्त झाले. ब्रम्हदेव आपले स्थानीं गेले. नंतर व्यास भगवंताची स्तुती करून शिष्यांस म्हणतात कीं, हे पैलादिशिष्य हो, तुम्हीं माझें वाक्य ऐकून हरीची सेवा, वेदपठण, यथाविधीनें पूजा, हीं तुम्हीं करावीं. वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, या प्रकारें वेदव्यासानीं सांगितल्या प्रमाणें शुकासहित आम्हीं पांच शिष्यानीं वेदोक्त मंत्रानीं नारायणाची स्तुती केली. ज्या प्रकारें करून तूं प्रश्न केलास त्या विषयीं हें आख्यान तुला सांगितलें. हें जे कोणी पुरुष श्रवण पठण करतील त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतील, या प्रमाणें व्यास गुरूचें वाक्य सर्व पुरुषानीं निश्चित जाणावें. अ. वि. या प्र. आहे.

१६८. अध्याय एकशें अडुसष्ट. — जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायनऋषे, शिष्यांसहित व्यासांनीं नाना प्रकारच्या नामांनीं भगवंताची जी स्तुती केली ती मला सांगावी. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, या विषयीं अर्जुनाचा आणि श्रीकृष्णाचा संवाद सांगतों. कोणी एके वेळीं अर्जुन प्रश्न करितो हे वासुदेवा, तुमच्या नामांचें स्तोत्र जें आहे तें मला सांगावें. असें ऐकून भगवान बोलतात हे अर्जुना, तुला सांगतों. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद, पुराणें, उपनिषदें, ज्योतीष, सांख्यशास्त्र, योगशास्त्र, आयुर्वेद, इत्यादिक महर्षीनीं माझीं नामें बहुत वर्णिलीं परंतु त्यांतील कांहीं नामें तुला सांगतों. प्रथम मला अतियशा म्हणतात, देहधारी जे पुरुष त्यांत परमात्मा

मी आहें हे अर्जुना, ब्रम्हदेवाची रात्र गेल्यावर निर्गुण ब्रम्हापासून शेषशाईनारायण माझा अवतार, त्याच्या नाभीपासून कमल, त्यापासून ब्रम्हदेव, तो क्रोधयुक्त असतां त्याच्या ललाटापासून रुद्र झाला. तो सर्वांस संहार करणारा नारायणच अवतरला त्या शंकराची आराधना मी करितों. आतां ब्रम्हदेव, रुद्र, इंद्र, महर्षी, यांसहित सर्वदेव, नारायण ह्याची आराधना करितात. हे अर्जुना, सर्वांमध्यें श्रेष्ठ विष्णु आहे त्यास तूं नमस्कार कर तो विष्णु मी. संपूर्ण विषयवासना टाकणाऱ्या पुरुषांस गती आहें. इंद्रियांचें दमन करून जे पुरुष सिद्धिविषयीं माझी इच्छा करितात त्यांस मी दामोदर म्हणून विख्यात आहें. अन्न, वेद, उदक, अमृत, हीं माझ्यागर्भी राहातात या कारणानें आणि कूपांत पडलेल्या त्रित या नामें ऋषीस मी काढलें यास्तव ऋषी मला पृश्निगर्भ म्हणतात. सूर्य, अग्नि, सोम, यांचे जे किरण ते माझे केश होत यास्तव सर्वज्ञ पुरुष मला केशव म्हणतात आणि दुसरें कारण पूर्वी उतथ्य ऋषीनें आपल्या स्त्रीचे ठायीं गर्भस्थापना केली आणि तो ऋषी निघून गेला. तेव्हां बृहस्पती उतथ्य ऋषीची स्त्री जाणून मैथुना विषयीं त्या स्त्रीजवळ येऊन निजला त्यावेळीं त्या स्त्रीचे उदरांतील गर्भ बोलतो हे बृहस्पते, मी पंचभूतांनीं युक्त गर्भ पूर्वी राहिलों आहें तेव्हां तूं त्या स्त्रीला बाध करण्यास योग्य नाहींस. असें ऐकून बृहस्पती बोलतो हे गर्भा, मैथुनाविषयीं मी आरंभ केला असतां तूं माझें निवारण केलेंस त्यापेक्षां तूं अंध होशील. असा शाप बृहस्पतीनें दिलेला ऐकून पुढें तो उत्पन्न होतांच दीर्घतमा या नामाचा ऋषी अंधळा झाला तेव्हां त्या ऋषीनें माझ्या केशवनामाचा जप केला त्यायोगानें तो चक्षुष्मान् झाला आणि यानें अंगें व उपांगें यांसहित चारीवेदांचें अध्ययन करून तो ऋषी विख्यात झाला. या कारणानें ऋषी मला केशव म्हणतात, अग्नी, सोमाशीं युक्त होऊन एकत्वपणास पावला म्हणून त्यांचें अग्नीषोम असें नाम विख्यात झालें. आणि ते लोकांचें रक्षण करण्या विषयींच्या योग्यतेस पावले. असा विषय या अध्यायांत आहे.

१६९. अध्याय एशें एकूणसत्तर:- अर्जुन प्रश्न करितो हे भगवान, अग्नीषो मी हे एकत्वपणास कसे पावले हा संशय माझा तुम्हीं दूर करावा. असें ऐकून श्रीकृष्ण सांगतात हे अर्जुना, या विषयीं पुराण झालेलें आहे तें तुला सांगतों सहस्त्र युगें गेल्यावर प्रलयकालीं सर्व जलाचा एक समुद्र झाला असतां अद्वितीय ब्रम्हापासून हरी उत्पन्न झाला, त्या पुरुषानें प्रजा उत्पन्न कराव्या अशा इच्छेनें प्रथम अग्नीषोम हे उत्पन्न केले. नंतर भूतांची उत्पत्ती झाल्यावर सोम, हा ब्राम्हण आणि अग्नी हा क्षत्रीय तेव्हां क्षत्रियांहून ब्राम्हण थोर आहे कारण ब्राम्हणांहून सर्वभूतीं दुसरें अधिक कोणी नाहीं या प्रमाणें श्रुतींत सांगितलें आहे आणि सनत्कुमारानीं श्लोक पठण केले आहेत त्यांत मुख्य ब्राम्हण सांगितले आहेत या स्तव ब्राम्हण वेद घोषांनीं अमर होऊन स्वर्गास पावले. हे अर्जुना, सत्याहून अन्यधर्म थोर नाहीं व मातेशीं तुल्य दुसरा गुरु नाहीं तसें ब्राम्हणाहून थोर अन्यपर दुसरें कोणी नाहीं म्हणून ज्याच्या राज्यांत ब्राम्हण वृत्तिहीन राहात आहेत त्यांचें राज्य सुखावह होत नाहीं व वेद, पुराणें, इतिहास, त्यां मध्यें आणि नारायणाच्या मुखांतूनही सर्वात्मे; सर्वकर्ते, सर्वभावानें ब्राम्हण श्रेष्ठ आहेत. त्या ब्राम्हणांपासून सर्व वर्ण शेष उत्पन्न झाले. आतां गौतमाची स्त्री अहल्या ईचें धर्षण इंद्रानें बलात्कारानें केलें तेव्हां गौतमाच्या शापें करून हरितवर्णत्वमश्रुपणा इंद्रास प्राप्त झाला अशीं ब्राम्हणांचीं सामर्थ्यें पुराणांतरीं बहुत सांगितलीं आहेत. पूर्वीं स्वायंभूवमन्वंतरीं नारायणानीं आपले हस्तानें शंकराचा कंठ ग्रहण केला. त्या योगानें तो नीलकंठ झाला, तसाच त्वष्टाचा पुत्र विश्वरूप देवांचा पुरोहित होऊन त्यानें देवांस भाग प्रत्यक्ष द्यावा आणि असुरांस भाग परोक्ष द्यावा या प्रकारें त्याची वागणूक पाहून त्याची माता त्यास बोलली कीं, हे पुत्रा, तूं मातुल पक्षाचा नाश करण्याची इच्छा करितोस हें नीट नाहीं असें ऐकून तो विश्वरूप हिरण्यकश्यपूजवळ आला त्या काळीं हिरण्यकशिपूनें विश्वरूपास यज्ञामध्यें होता केला हें पाहून वसिष्ठानीं शाप दिला हे हिरण्यकशिपो, तूं दुसरा होता वरलास यास्तव तूं मरण पावशील.

असें ऐकून त्या शापानें तो हिरण्यकशिपू वध पावला. नंतर विश्वरूप, या नृपसीय दैत्यांची वृद्धि व्हावी या कारणानें तो तप करूं लागला हें पाहून इं- द्रानें त्या विश्वरूपाच्या व्रताचा भंग व्हावा या अर्थास्तव बहुत रूपवंती अशा अप्सरा पाठविल्या. त्या येऊन विश्वरूपापुढें हावभाव इत्यादि विलास क- रूं लागल्या तेव्हां त्या अप्सरांस पाहून त्याचें मन विषयासक्त झालें आ- णि त्या अप्सरांशीं तो रममाण झाला. तेव्हां कांहीं दिवस विषय भोग- ल्यावर त्या बोलतात; हे विश्वरूपा, आम्हीं इंद्र सभेस जातों. असें ऐकून विश्व रूप बोलतो अहो अप्सरा, तुम्हीं पाहा पाहा मी इंद्रासहित देवांचा नाश क- रितों. असें बोलून मंत्रांचा जप करितांत त्या मंत्रसामर्थ्यानें तो वाढला आ- णि त्यानें एक मुखानें यज्ञांतील सोमप्राशन करून दुसऱ्या मुखानें अन्न भक्षण केलें व तिसऱ्या मुखानें इंद्रासहित देवांस भक्षण करावें अशा हेतु- नें तो विश्वरूप वाढला तेव्हां त्याचें त्रिशिरानाम विख्यात झालें असें पा- हून सर्व देवांस मोठी चिंता प्राप्त झाली नंतर ते इंद्रासहित देव ब्रम्हदेवास शरण जाऊन त्यानीं त्यास विश्वरूपाचा वृत्तांत सांगितला. तो ऐकून ब्रम्ह देव बोलतात हे देवहो, तुम्हीं सर्वांनीं दधीच ऋषीकडे जाऊन त्याचें शरी र मागावें नंतर त्या शरीराच्या अस्थींचें वज्र करा म्हणजे तुमचें कार्य होई- ल. असें ऐकून त्या देवानीं दधीची ऋषीजवळ जाऊन शरीर मागितलें तेव्हां त्यानें महायोग सामर्थ्यानें ब्रम्हसाक्षात्कारीं चित्त ठेवून शरीर परित्याग केला नंतर ब्रम्हदेवानीं त्या ऋषीच्या अस्थींचें वज्र केलें त्या वज्रांत विष्णू नीं प्रवेश केला हें पाहून इंद्रानें तें वज्र घेतलें आणि त्या विश्वरूपाचीं तीन मस्तकें त्या वज्रानें तोडिलीं. नंतर त्वष्ट्यानें इंद्रनाशार्थ उत्पन्न केलेल्या वृत्रासुरास इंद्रानें त्या वज्रानेंच मारिलें. नंतर दोन ब्रम्हहत्यानीं इंद्र व्याकूल होऊन मानस सरोवरीं सूक्ष्म रूप धारण करून कमलनालांत जाऊन बसला. हें पाहून देव व ऋषी याणीं आयुचा पुत्र नहुष या नामा चा मानवी राजा होता त्यास देवराज्याचा अभिषेक केला नंतर त्यानें आ- पल्या तेजसामर्थ्यानें स्वर्गाचें पालन केलें. त्या समयीं सर्व लोक सुखी झा- ले असतां कोणीएके वेळीं त्या नहुषास इंद्रपद प्राप्त झाल्यावर अभिमान

झाला आणि इंद्राणीच्या जवळ जाऊन बोलतो हे इंद्राणी, मला इंद्रपदाचा अधिकार आला आहे यास्तव तूं माझें सेवन कर. असें ऐकून ती बोलते हे नहुषा, मी परस्त्री असतां माझें हरण करण्याविषयीं तूं योग्य नाहींस; परंतु माझें व्रत समाप्त झालें म्हणजे कांहीं दिवसांनीं मी तुला वश्य होईन. असें ऐकून नहुष गेल्यावर इंद्राणी दुःख व शोक यांनीं पीडित होऊन तिनें बृहस्पतीस वृत्तांत सांगितला. बृहस्पती इंद्राणीचें भाषण ऐकून बोलतात हे इंद्राणी, तूं उपश्रुती देवीस मंत्रांनीं बोलाव म्हणजे ती येऊन तुझें कार्य करील. त्यावेळीं इंद्राणीनें तिला मंत्रेंकरून बोलावणें करितांच जवळ येऊन ती उपश्रुती देवी बोलते हे इंद्राणी, मला बोलाविण्याचें कारण काय असें ऐकून इंद्राणीनें सर्व वृत्तांत नहुषाचा तिला सांगितला. आणि मला इंद्राजवळ घेऊन तूं जावेंस. असें त्या उपश्रुतीनें ऐकून ज्या स्थानीं इंद्र होता त्या स्थानीं इंद्राणीला नेऊन इंद्राचें दर्शन करविलें त्यावेळीं इंद्र आपली पत्नी कृश झालेली पाहून परम दुःखित झाला. आणि त्या इंद्राणीचें सर्व वर्तमान श्रवण करून बोलतो हे इंद्राणी, तूं त्या नहुषास बोलावें कीं, ऋषींनीं युक्त शिबिकेंत तूं बसून मजकडेस यावें आणि मजशीं विवाह करावा. म्हणजे मी तुझी स्त्री होईन. असें इंद्राचें भाषण ऐकून ती इंद्राणी हर्षानें तेथून स्वस्थानीं आली, इंद्रही पूर्वीप्रमाणें कमलनालीं जाऊन बसला नंतर इंद्राणी आली आहे असें पाहून तो नहुष बोलतो हे इंद्राणी, तूं बोलिल्याप्रमाणें दिवस झाले आतां आम्हांस तूं वश्य व्हावेंस. असें ऐकून इंद्राणीनें जसें इंद्रानें सांगितलें होतें तसेंच त्या नहुषास सांगितलें तें ऐकून नहुषास परम आनंद झाला आणि त्यानें अगस्त्यादि ऋषींस पालखीला लावून आपण त्यांत बसून निघाला तों मार्गीं शीघ्र चालावें म्हणून नहुषानें आपले पादानें अगस्त्य ऋषीस स्पर्श केला. हें पाहून अगस्त्य ऋषींनीं त्यास शाप दिला अरे मूर्खा, तूं अकार्य केलेंस त्यामुळें तूं सर्प होऊन पृथिवीवर पडशील. असें ऋषींचें भाषण ऐकतांच तो नहुष त्यावेळीं तत्काळ सर्प होऊन पृथिवीवर पडला. नंतर देव, ऋषी यांनीं बृहस्पतीसहित इंद्राकडून अश्वमेध

यज्ञ करविला त्याकालीं विष्णु संतुष्ट झाल्यावर इंद्र पापरहित झाला आणि त्यानें स्त्रिया, अग्नि, वृक्ष, जल, त्या चार स्थानीं ब्रम्हहत्येचा विभाग करून इंद्र आपलें स्थान पावला हे अर्जुना, पूर्वीं महर्षी भरद्वाज हे आकाश गंगेंत स्नान करीत असतां वामन अवतार घेणाऱ्या विष्णूनीं त्या ऋषीस आकाश गंगेंतून बाहेर काढतांच भगवंताच्या उरावर त्या ऋषीनें हस्तानें ताडन केलें तें चिन्ह उरावर राहिलें आहे, तसेंच भृगुऋषीनीं शाप दिलेला अग्नी सर्व भक्षणास पावला, पूर्वीं बुधानें शाप दिले त्या अदितीच्या उदरीं सूर्याचें द्वितीय जन्म श्राद्ध देव म्हणून झालें आहे, दक्ष प्रजापतीस कन्या साठ होत्या त्यांत त्यानें कश्यपास तेरा दिल्या, दहा धर्मास, दहा मनुस, सत्तावीस चंद्रास दिल्या. त्या नक्षत्र रूपानीं चंद्रासह वर्तमान समान वागत असतां रोहिणीवर चंद्र अधिक प्रीति करितां म्हणून त्या अन्यस्त्रियांनीं आपला पिता दक्ष त्यास निवेदन केलें तेव्हां पित्यानें चंद्रास शाप दिला कीं अरे चंद्रा, तुला यक्ष्मा रोग प्राप्त होऊन क्षय पावशील. असा शाप होतांच तो चंद्र त्यारोगानें क्षीण झाला. असें पाहून ऋषीनीं चंद्रास सांगितलें कीं हे चंद्रा, पश्चिमदिशेस समुद्रतीरीं हिरण्य सरोवर म्हणून तीर्थ आहे त्यांत तूं स्नान केलें असतां मुक्त होशील. असें ऐकून चंद्रानें त्या हिरण्यसरोवर तीर्थीं जाऊन स्नान केलें त्या पुण्य योगानें तो चंद्र त्या पापापासून मुक्त झाला. त्या दिवसापासून त्या तीर्थानें प्रभास तीर्थ असें नाम विख्यात झालें, त्या दक्ष प्रजापतीच्या शापानें तो चंद्र अद्यापि अमावास्यांत स्वल्प क्षय पावून तो आपल्या कलांचा क्षय व उदय यांस पावत आहे, पूर्वीं स्थूलशिरा या नामाचा महर्षी होता त्यानें आपल्या तपसामर्थ्यानें पुष्पित वृक्षांच्या सुगंधाचें अवघ्राण केलें आणि त्या वृक्षाकडे पाहून त्यास शाप दिला कीं, तुम्हीं सर्व कालीं पुष्पवंत असे राहणारे न व्हाल, पूर्वीं नारायण, लोकहितार्थ वडवामुख या नामें महर्षी होऊन मेरु पर्वतावर तप करीत असतां त्या ऋषीनें समुद्रास बोलाविलें परंतु समुद्र त्या ऋषीजवळ आला नाहीं तेव्हां तो अग्निरूपी ऋषी समुद्रांत शिरून

समुद्राचें उदक प्राशन करूं लागला तेव्हां पासून समुद्रास मर्यादा सोडून जाऊंत्ती वाढण्याची शक्ति राहिली नाहीं कारण यद्यपि समुद्र वाढलाते शी तो वडवानल अग्नी बहूत कोस पाणीआळतो व तो समुद्र लवणोदका स पावला, समुद्रांतील उदक कोणी प्राशन करीत नाहींत परंतु वडवामु ख संज्ञिक स्थानीं जाऊन उदक प्रशन केलें असतां तेथील उदक मधुर आहे या कारणानें कोणी प्राशन करितात, हिमवान् पर्वताची कन्या उमा, तिजला शंकरानीं वरली असतां भृगुऋषी हिमवंत पर्वताजवळ जाऊन बोलतो कीं तुझी कन्या मला दे, तेव्हां हिमवंत पर्वतानें भृगुऋषीस सांगि तलें कीं माझी कन्या रुद्रानें वरीली.नंतर भृगुऋषीस क्रोध आला आणि त्या नें पर्वतास शाप दिला कीं, तुजवर रत्नें उत्पन्न होणार नाहींत.तें ऋषीचें भा षण आजपावतों सत्यपणास पावलें आहे. या प्रकारानें ब्राम्हणाचें माहा त्म्य सांगून कृष्ण बोलतात हे अर्जुना, ब्राम्हणाच्या प्रसादानें क्षत्रिय पृथि वीचे राज्याचा उपभोग करितात यास्तव अग्नीषोमीय ब्रम्हानें हें जग धा रण केलें आहे यास्तव सूर्य व चंद्र हे अग्नी व सोम यांस त्वषी असें म्हणता त त्यांचे किरण जे ते अग्निषोम यांचे केश होत म्हणून मी त्वषीकेश या नामें विख्यात झालों आहें अशा प्रकारानें व्याख्यान केलेलीं माझीं नावें बहुत आहेत त्यांत हरि, ऋतधामा, गोविंद, शिपिविष्ट, अज, सत्य, सा त्वत, कृष्ण, वैकुंठ, अच्युत, घृतार्चि, त्रिधातु, वृषाकपि, शुचिश्रवा, व राह, विरिंच, कपिल, इत्यादि नामें सांगून बोलतात हे अर्जुना, गंधमा दन पर्वतीं नर व नारायण हे तप करीत होते त्यावेळीं दक्ष प्रजापतीनें मोठा यज्ञ केला त्या यज्ञांतील भाग रुद्रास कल्पिला नाहीं तेव्हां दधी चिऋषीच्या वाक्यानें दक्षाचा यज्ञ विध्वंस करावा म्हणून त्याकाली शंक रानें शूल सोडला तो येऊन त्या शूलानें दक्षाचा यज्ञ भस्म केला आणि तो शूल बदरीयाश्रमीं नारायणाच्या उरावर येऊन पडला.तेव्हां त्या शूलाच्या ते जानें नारायणाचे केश पिंगट वर्ण झाले त्या कारणानें मी मुंजकेशवान् त्या नामें प्रसिध्द झालों नंतर तो शूल नारायणानीं हुंकारानें उडविला तो शंकराच्या हस्तावर येऊन पडला त्याकालीं शंकर उड्डाण करून नारायणा

जवळ आले असें पाहून नारायणानीं एक्या हस्तानें त्याच्या कंठासपिडी घातली त्या योगानें शंकरास नीलकंठ हें नाम प्राप्त झालें. नंतर रुद्राचा घात करावा या अर्थानें नरानी एक दर्भ मंत्रून सोडिला त्या दर्भाचा परशु होऊन शंकरावर आला असें शंकरानीं पाहून आपल्या शूलानें त्या परशूचा खंड केला त्या योगानें मला खंडपरशू असें ऋषी म्हणतात. असें ऐकून अर्जुन प्रश्न करितो हे जनार्दना, रुद्र व नारायण या दोघांचें युध्द होऊं लागलें तेव्हां त्यांत जय कोणास प्राप्त झाला हें सांगा. असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, रुद्र व नारायण यांचें युद्ध होऊं लागलें त्यावेळीं भूकंपादि उत्पात् झालेले पाहून देव व ऋषी यांसहित ब्रम्हदेव येऊन बोलतात हे शंकरा, तूं आपलीं आयुधें ठेव कारण सर्व देवांमध्यें श्रेष्ठ हे नर व नारायण आहेत नारायणाच्या प्रसादापासून मी झालों तूं क्रोधापासून झालास तेव्हां देवांसहित सर्वांनीं नारायणास शरण जावें म्हणजे लोकांची शांती होईल. असें ब्रम्हदेवाचें भाषण ऐकून शंकरानें क्रोध टाकून तो नारायणास शरण गेला, नंतर नारायण प्रसन्न होऊन म्हणतात हे शंकरा, तूं व मी त्या दोघांत भेद नाहीं आजपासून माझे उरावरील श्रीवत्स तुझ्या शूलानें चिन्हित होईल व माझ्या हस्तानें चिन्हित श्रीकंठ तूं होशील; श्रीकृष्ण सांगतात हे अर्जुना, मी तुझें रक्षण युध्दांत केलें या कारणानें मोठा जय तुला प्राप्त झाला, आतां त्या शंकरास तूं नमस्कार कर. पूर्वी क्रोधापासून झालेल्या शंकराची कथा तुला सांगितली. असा विषय या अध्यायांत आहे.

१७०. अध्याय एकशें सत्तर:- शौनक प्रश्न करितात हे सूता, तूं नारायणाच्या कृपेचें आख्यान मोठें सांगितलेंस हें ऋषींसहित मी श्रवण केल्यानें आम्हांस आनंद झाला. आतां श्वेतद्वीपीं नारायणाचें दर्शन नारदास झाल्यावर नारद तेथून निघून बदर्याश्रमीं नर व नारायण यांच्या कडे आला, या विषयीं कारण काय हे सांगा. असें ऐकून सूत सांगतात हे शौनकादिकऋषीहो, जनमेजयराजानें आपल्या यज्ञामध्यें सर्व ऋषींत वेदव्यासास प्रश्न केला, कीं हे वेदव्यासा, श्वेतद्वीपाहून निघालेल्या नारदा-

नें नर व नारायण यांच्या आश्रमीं येऊन किती दिवस वास केला व त्या नारायणानीं कथा कोणती सांगितली हें सांगा. कारण हें शतसहस्त्र संख्याभारताचें आख्यान तुम्हीं केलें त्यानें जगाचा उद्धार होईल असें पुण्य या भारताचें श्रवण व पठण करणाऱ्या पुरुषास आहे, यास्तव नर व नारायण हे ऋषी नारदास काय बोलले हें सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, ज्याचें सामर्थ्य मोठें व ज्यानें प्रसाद मजवर केला असा जो व्यास त्यास नमस्कार करून मी तुला नारायणाची कथा सांगतों. श्वेतद्वीपीं हरीस पाहून नारद निघाला तो वेगानें मेरु पर्वताचें उल्लंघन करून गंधमादन पर्वतावर आला, तेथून बदर्याश्रमीं नर व नारायण यांस पाहून परम हर्ष पावला नंतर त्यानी नारदाची पूजा केली आणि नारदास कुशल वर्तमान विचारिलें त्या वेळीं नारदानें त्या नर व नारायण यांस नमस्कार करून प्रदक्षिणा केली आणि त्याणीं दिलेल्या कुशासनावर नारद बसला. हें पाहून नर व नारायण हे आपण कुशासनावर बसून बोलतात हे नारद ऋषे, श्वेतद्वीपीं तुम्हीं आमचें परमात्म्य स्वरूप पाहिलें तें कसें आहे हें सांगा. असें ऐकून नारद सांगतात अहो नर व नारायणहो, श्वेतद्वीपीं मी साक्षात् विश्वरूप धारण करणारा नारायण सहस्त्र सूर्यांच्या तेजासारिखा पाहिला त्याच लक्षणानीं युक्त आज तुम्हां उभयतांस पाहतों यास्तव त्या नारायणाशीं समान त्रैलोक्यांत दुसरा कोणी नाहीं व त्या स्थानीं राहणारे श्वेतवर्ण, पांच इंद्रियांनीं रहित, निराहारा करणारे. इत्यादि गुणानीं युक्त असे पुरुष पाहिले ते निरंतर नारायणाची पूजा करणारे असून महा भागवत आहेत. या प्रकारें नारद त्या नारायणाचे बहुत गुण सांगून म्हणतात हे नरनारायणहो, तुमच्या सन्निध राहावें असा मी निश्चय करून आलों आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

१७१. अध्याय एकशें एकाहत्तर.— नरनारायण बोलतात. हे नारदा, तूं श्वेतद्वीपीं जाऊन स्वयंभू नारायणास पाहिलेंस व त्यानीं तुला अनुग्रहीत केलें त्याणें तूं धन्य आहेस कारण तुजवांचून त्या देवांस को

णीही पाहिलें नाहीं. पूर्वी ब्रम्हदेवानीं यत्न केला परंतु त्यासही दर्शन झा लें नाहीं असा तो देव आहे, ज्याची कांती सहस्र सूर्यासारिखी आणि स्व-यंप्रभेनें विराजमान त्या देवापासून हीं पंचमहाभूतें, सूर्य, मन, चंद्र, इत्यादि सर्व तत्वें उत्पन्न झालीं. आतां माझा भक्त आदित्यलोकीं पुरुषाकृती टाकून सूक्ष्मरूप जें मन त्यांत तो प्रवेश करितो तें मन अनिरुद्धाख्य अहंकारीं प्रवेश करितें नंतर तो अहंकार प्रद्युम्नाख्य मनाचे ठायीं, तें मन संकर्षणाख्य जीवाचेठायीं, तो जीव गुरुलंपदाचे ठायीं, त्याचा परित्याग करून शुध्द ब्रम्ह वासुदेवाख्य जसें घटाकाश, महा आकाशाचेठायीं प्रवेश करितें तसा तो माझा स्वरूपीं प्रवेश करितो. या प्रकारें नरनारायणानीं त्या नारदास बहुत सांगितलें तें ऐकून नारदानें नारायणात्मक स्तोत्राचा जप देवांचीं सहस्र वर्षे पर्यंत केला. आणि तो नरनारायणांची पूजा करीत बदर्याश्रमीं राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७२. अध्याय एकशें बाहात्तर.– वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, कांहींएक काल गेल्यावर नारदानें देवाचें कर्म करून पित्र्य कर्म केलें. हें पाहून नारायण बोलतात हे नारदा, तूं हें काय कर्म केलेंस व त्या कर्माचें फल काय प्राप्त होतें हें सांग. असें ऐकून नारद बोलतात हे नारायणा, तुम्हीं पूर्वी दैवीक कर्म करावें नंतर पित्र्य कर्म करावें असें कथन केलें आहे त्याप्रमाणें मी प्रथम दैवीक कर्म केलें कारण दैवीक कर्म केल्यानें यज्ञरूपी परमात्मा विष्णु संतुष्ट होतो या भावानें मी नित्य विष्णूचें यजन करितों, कीं ज्यापासून ब्रम्हदेव झाला तो माझा पिता आहे त्या कारणानें पिता, पितामह, प्रपितामह, यांची पूजा तांत्रिकविधींत सांगितली आहे त्या प्रकारानें मी करतों. व त्या प्रमाणें श्रुतीनंही सांगितलें आहे कीं पितृयज्ञ करणारे पुत्र पितृपणास पावतात या कारणावरून देवही करीत आहेत यास्तव पृथिवीवर प्रथम कुश घालावे नंतर त्या कुशावर तीन पिंड ठेवून त्यांची पूजा करावी. तेव्हां ते पितर पिंड संज्ञेस पावतात असें ऐकितों परंतु पितरांस पिंड संज्ञा कशी झाली हें सांगा. असें ऐकून नरनारायण सांगतात. हे नारदा, पूर्वी मी वराह अवतार घेऊन नष्ट झालेल्या पृथिवीचा उद्धार क-

रून स्वस्थानीं पृथिवीची स्थापना केली तेव्हां जळांतील चिखलानें माझें शरीर लिप्त झालें असतां अपराण्ह कालीं मी यथा विधीनें तीन पिंड करून कुशावर प्रोक्षण करून आपल्या शरीरांतून निघालेल्या घर्म बिंदुरूपतिलानीं युक्त केले ते संकल्पपूर्वक ते तीन पिंड पितरांस दिले कारण लोक मर्यादा स्थापनार्थ माझा अवतार आहे म्हणून मी बोललों कीं हे पितरहो, तुम्ही आजपासून पिंड रूप मूर्ति धारण करणारे व्हाल जशी विष्णूची मूर्ती शालग्राम तशी पितरांची मूर्ति पिंड होय यास्तव पुरुषानीं पिता, पितामह, प्रपितामह, त्या तीन पिंडांत विष्णू आहे असें जाणावें या प्रकारानें जे पुरुष पितर, देव, गुरू, अतिथी, गायी, ब्राम्हण, पृथिवी, यांची पूजा करितात त्यांस विष्णु पूजा केल्याचेंच पुण्य प्राप्त होतें हे नारदा, हा पूर्वोक्त सांगितलेला धर्म मीच केला आहे या कारणानें सर्वलोक आचरण करीत आहेत म्हणून सर्वभूतीं समान राहाणारा नारायण श्रेष्ठ आहे. असा वि. या अ. आहे.

१७२. अध्याय एकशें ब्याहात्तर.- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, नारदानीं नर व नारायण यांचें भाषण ऐकून अत्यंत भक्ति नारायणाचे ठायीं धरली आणि त्याचे ठायीं नारद एकांत भावास पावला. हे राजा, नरनारायणाश्रमीं सहस्त्रवर्षें वास करून तो नारद हिमवंत पर्वतीं आपल्या आश्रमास गेला. बदर्याश्रमीं नर व नारायण हे ऋषी लोकहितार्थ तप करीत आहेत, हे राजा, तूं धन्य आहेस कारण हें नारायणाचें आख्यान श्रवण केल्यानें तुझा देह पवित्र झाला आणि पांडवांचे कुलांचा उद्धार करणारा तूं होऊन कृतार्थ आहेस आतां जो पुरुष कर्म व मन, वाणी यानीं विष्णूशीं द्वेष करील त्याचे पितर नरकीं बहुत वर्षें पडतील आणि तो सर्व लोकीं द्वेषी होऊन आसूर योनीस पावेल या कारणास्तव सर्वांनीं हा विष्णु सर्वांचा आत्मा आहे असें जाणावें जो वेदव्यास हा आमचा गुरू आहे यास्तव त्यानें हें नारायणाचें महात्म्य मला सांगितलें मी तुला सांगितलें तेव्हां कृष्णद्वैपायन व्यास हे साक्षात् नारायण आहेत असें तूं जाण, कारण ज्यामध्यें नाना प्रकारचे धर्म वर्णन केलेले असें महाभारत ज्या व्यासानीं केलें त्या वांचून अन्य कोणी करणारा होणार नाहीं. आतां हे

जनमेजयराजा, तुझा संकल्पित अश्वमेध यज्ञ तूं आपला समाप्त करावास. सूत सांगतात हे शौनकादि ऋषीहो, त्या जनमेजयराजानें हें नारायणीय आख्यान श्रवण करून ऋषींसहित पूर्वी आरंभित अश्वमेध यज्ञ समाप्त केला आतां हें नारायणीय आख्यान कृष्ण, भीष्म, पांडव, ऋषी, हे श्रवण करीत असतां नारदानी पूर्वी आपल्या गुरूस सांगितलें असा अनंत गुणांचा समुद्र श्रीनारायण शेषशायी जास म्हणतात् त्यास तुम्हीं शरण जावें कारण त्याचें सूक्ष्म स्वरूप जें निर्गुण ब्रम्ह त्याचें ध्यान सांख्यज्ञानी करितात यास्तव तुम्हांसही त्याच्या प्रसादें करून साक्षात्कार होईल. असा विषय या अध्यायात आहे.

१७४. अध्याय एकशें चवऱ्याहात्तर.– शौनक प्रश्न करितात हे सूता, नर नारायणस्वरूपी भगवंताचें माहात्म्य व नारायणानीं महावराह अवतार घेऊन पितरास पिंड द्यावे म्हणून पिंडाची उत्पत्ती केली हें सर्व ऐकिलें आतां नारायणानीं हयशिरा अवतार घेतला हा कोणते कारणास्तव व ब्रम्हदेवाचें कार्य अवतार घेऊन काय केलें हें सर्व सांगा. असें ऐकून सूत सांगतात हे शौनक ऋषे, या विषयीं वेदतुल्य इतिहास वैशंपायनानीं जनमेजयराजास सांगितला तो तुम्हांस सांगतों. जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायन ऋषे, ब्रम्हदेवानीं भगवंताचा हयशिरा अवतार पाहिला तेव्हां तो अवतार नारायणानीं कोणते कारणास्तव घेतला हें सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, जगाची उत्पत्ती करणारा जो नारायण त्यानीं महाप्रलयीं योगनिद्रा धारण करून उदकांत शेषावर शयन केलें. पुढें त्यानीं सृष्टी उत्पन्न करावी असें चिंतन करतांच त्यांचे नाभीपासून सहस्त्रपत्रांचें कमल झालें त्यापासून ब्रम्हदेव झाला तेव्हां त्याच्या पूर्वीच त्या कमल पत्राच्या एकदेशीं नारायणानीं उदकाचे दोन बिंदु स्थापन केले होते त्यांत एक बिंदूपासून तमोगुणी मधुनामक व दुसऱ्या बिंदूपासून रजोगुणी कैटभनामें असे दोन दैत्य उत्पन्न झाले हे राजा, नंतर ते हस्तांत गदा घेऊन मोठे बलवंत असल्यानें ब्रम्हदेवावर धांवून आले आणि ब्रम्हदेवानी-

प्रथम मूर्तिमंत चार वेद उत्पन्न केलेले पाहून त्या उभयतां दैत्यांनीं उत्तम शरीरें धारण करणाऱ्या त्या चार वेदांस हरण करून ब्रम्हदेव पाहात असतां ते पातालीं निघून गेले नंतर ब्रम्हदेवास मोह उत्पन्न होऊन ते मनांतबोलतात अहो वेद हे माझे परमचक्षू, वेदपरमबल, वेदपरमस्वरूप, वेदांवांचून मी अंध झालों आहें असें बहुत बोलून नारायणाची स्तुती करतात. हे नारायणा, तुम्हीं सर्व लोकांत श्रेष्ठ, सांख्य व योग यांचे निधी, सर्वभूतांचा अंतरात्मा, इत्यादि बहुत गुणांनींयुक्त आहांत या प्रकारची ब्रम्हदेवानीं केलेली स्तुती ऐकून नारायण निद्रेंतून उठले आणि आपले ऐश्वर्य योगानें त्यानीं हयशिरस अवतार धारण केला आणि पातालींप्रवेश करून ज्या स्थानीं त्या दैत्यानीं वेद ठेविले होते त्या स्थानीं जाऊनते वेद ग्रहण केले आणि तेथून आणून ब्रम्हदेवास दिले नंतर ब्रम्हदेव संतोष पावला. इतक्यांत हरीनें वेद नेले हें जाणून मधु व कैटभ हे आपण पूर्वीं ज्यास्थानीं वेद ठेविले होते त्या स्थानीं जाऊन पाहातात तों तें स्थानशून्य आहे तेव्हां ते दानव मोठ्या वेगानें पातालाहून आले आणि उदकीं शेषावर निद्रा केलेल्या नारायणास पाहून मोठ्यानें हांसले आणि बोललेकीं, हा पुरुष जो निद्रा केलेला आहे याणें पूर्वीं आम्हीं हरण करून नेलेले वेद आणिले आहेत यास्तव त्या पुरुषाशीं युध्द करून वेद घेऊन जावे याहेतूनें त्या दानवानीं भगवंतास जागें केलें नंतर दोघान्नीं नारायणाचें युध्द प्रवृत्त झालें. त्या कालीं ब्रम्हदेवाच्या कल्याणार्थ त्या दोघां दानवांस भगवंतानी मारिलें नंतर ते मधुकैटभ मरण पावतांच ब्रम्हदेवानीं नारायणाची आज्ञा घेऊन स्थावर जंगमात्मक सर्व लोकांस उत्पन्न केलें. हे राजा, नंतर भगवान हरी तेथेंच अंतर्धान पावले या प्रकारानें भगवंतानीं हयशिरा अवतार घेऊन मधु व कैटभ या दानवांस मारिलें असें हें आख्यान जो ब्राम्हण श्रवण व पठण करील त्याचें केलेलें अध्ययन नष्ट होणार नाहीं आतां हे वेद, नारायणपर आहेत, तसेंच यज्ञ, तप, सत्य, धर्म, प्रवृत्ति लक्षणधर्म, इत्यादि सर्व नारायणात्मक आहे म्हणून सर्वांस आश्रयभूत विष्णु जाणावा. यास्तव या भगवंताची गती, ज्ञानानें संपन्न महर्षी पाहतात

त्यां वांचून कोणीही जाणत नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१७५. अध्याय एकशें पंचाहत्तर.— जनमेजय प्रश्न करितो हे वैशं पायना, ज्यांच्या वासना नष्ट झाल्या व जे केवल एकांत निष्कामभक्त ते गुरुसंप्रदायानें ज्ञान संपन्न होऊन अनिरुध्दादितीनगती ज्या त्यां ची उपासना नकरितां परम पदास जातात म्हणून तुम्हीं सांगितलें व उप निषदासहित सांग वेद विधियुक्त पठण करणाऱ्या पुरुषासतीगतीप्राप्त होत नाहीं तेव्हां हा धर्म कोणत्याऋषीनें किंवा देवानें कथन केला?हा स शय माझा दूर करावा.असें ऐकून वैशंपायन सांगतात. हे जनमेजयरा- जा, कुरुक्षेत्रीं युध्द करण्याविषयीं कौरव व पांडव यांचीं सैन्यें प्राप्त झालीं असतां त्या वेळीं अर्जुनास शोक उत्पन्न झाला. तेव्हां साक्षात् नारा यणानीं कर्म,उपासना आणि ज्ञान असें तीन कांडात्मक गीता शास्त्र अ- र्जुनास सांगितलें तें मी पूर्वींच तुला कथन केलें आहे. त्या शास्त्रांत जो ध र्म सांगितला तो धर्म आमचे गुरु वेदव्यास यांणीं कथन केलेला मी तुला सांगितला व जनक इत्यादिक राजानीं त्याच धर्माचें सेवन केलें असतां ही तूं जसा प्रश्न केलास असाच प्रश्न धर्मराजानें ऋषीमध्यें व श्रीकृष्ण आ- णि भीष्म हे श्रवण करीत असतां नारदास केला. त्यावेळीं नारदानीं धर्म राजास सांगितलें तें मी तुला सांगतों हे राजा, नारायणानीं वराह अ- वतार धारण करून दैविक व पित्र्य कर्मात्मक जो धर्म आचरण केला तो धर्म फेनपऋषी व वैखानस ऋषी यांणीं सेवन केला,पुढें कांहीं कालानें परंपरागत आलेला धर्म नष्ट झाला तेव्हां सृष्टी उत्पन्न करावी असें ना- रायणाचे मनांत आलें.तेव्हां त्यानीं प्रथम ब्रम्हदेवास उत्पन्न करूनहा धर्म त्यास सांगितला या क्रमानें चतुर्थ जन्मीं ब्रम्हदेवास नारायणा- नीं त्या धर्माचा उपदेश केला,ब्रम्हदेवानें मनूस सांगितला,मनूनें आप- ला पुत्र शंखपद यास,त्याणें स्ववर्णाभ पुत्रास या प्रमाणें ब्रम्हदेवाचे स- प्त जन्मीं जो धर्म नारायणापासून प्राप्त झाला तो धर्म ब्रम्हदेवानें दक्ष- प्रजापतीस सांगितला,त्याणें सूर्यास,सूर्यानें मनूस.मनूनें आपला पुत्र इक्ष्वाकू जो त्यास.या प्रमाणेंच पूर्वी भगवद्गीतेच्या चतुर्थ अध्यायीं श्रीभ-

गवंतानीं अर्जुनास हा धर्म सांगितला आहे, तो धर्म साक्षात्नारायणाप सून नारदास प्राप्त झाला यास्तव या धर्मास मुख्यपणा प्राप्त झाला आहे, म्हणून सात्वत भक्तानीं त्या धर्माचें सेवन केलें तो धर्म नारदानीं धर्म राजास सांगितला. असें ऐकून जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायनऋषे, या प्रकारचा उत्तम धर्म ऋषीनीं सेवन केला असतां नाना प्रकारचीं व्रतें करणारे विप्र तो धर्म सेवन कांकरीतनाहींत? तें कारण सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, सात्विकीवराजसी आणि तामसी अशा तीन प्रकारच्या प्रकृति जीवांस ईश्वरानें निर्मित आहेत तेव्हां त्यांत नारायणाची भक्ती करणारा सात्विक पुरुष मोक्षास पावतो इतर राजस व तामस हे पुरुष दोषयुक्त होतात यास्तव ते भगवद्धर्माचें सेवन करीत नाहींत. आतां हा सात्वतधर्म, पूर्वी नारदानीं व्यासास सांगितला. व्यासानीं धर्मराजास सांगितला, तो हा धर्म तुला सांगितला हे राजा, सर्व लोकांचें पालन, मोहन, आणि संहार करणारे हे श्रीकृष्ण आहेत असें तूं जाण. असा विषय या अध्यायांत आहे.

१७६. अध्याय एकशें शाहत्तर.- जन्मेजय प्रश्न करितो हे वैशंपायनऋषे, सांख्य, योग, पांचरात्र, वेद, आरण्यक, हीं ज्ञानस्वरूपीं एकनिष्ठेस पावलीं किंवा प्रवृत्तींत पृथक् भावास पावलीं, व वेदव्यासांचें जन्मनारायणापासून झालें म्हणून सांगतोस परंतु वसिष्ठ पुत्र शक्ती त्याचा पुत्र पराशर त्यापासून व्यास झाले असें तूं पूर्वीं सांगितलेंस तेव्हां या विषयीं निश्चयात्मक सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जन्मेजयराजा, पूर्वी सुमंतु, जैमिनी, पैल, चवथा मी वैशंपायन, पांचवा शुक इतक्यानीं आम्हीं व्यासास प्रश्न केला तेव्हां व्यासानीं आम्हांस ऋषिप्रणीत आख्यान सांगितलें तें असें कीं, नारायणानीं नाभीपासून कमल उत्पन्न करून त्यापासून ब्रम्हदेवास उत्पन्न केलें आणि भाषण केलें हे ब्रम्हदेवा, ही स्वस्थ धारण करणारी बुद्धी तुझ्या शरीरीं प्रवेश करील नंतर त्या बुद्धियोगानें तूं प्रजा उत्पन्न कर. असें ऐकून ब्रम्हदेवानीं बहुत बरें म्हणून ती आज्ञा नारायणाची शिरसा मान्य केली नंतर भगवान् तेथेंच अंतर्धान पावले.

हे पैलादिशिष्यहो, त्या ब्रम्हदेवानें भगवंताचे आज्ञेप्रमाणें प्रजाउत्पन्न केल्या.पुढें पृथिवी भाराक्रांत झाली व दैत्य, दानव, राक्षस, हे वरदाना-नें मत्त होऊन त्यानीं देवगणवतपोधन ऋषींस बाधाकेली.हें पाहून पृथ्वीचा भार दूर करावा. आणि देव, ऋषी, ब्राम्हण, यांचें रक्षण करावें या हेतूनें भगवंतानी वाराह, नारसिंह, वामन, मत्स्य, मानुष, हे अवतार धारण करून दैत्यांचा नाश करावा अशी योजना केली आणि सरस्वतीस हे सरस्वतीशब्दानें बोलावितांच तिजपासून सारस्वत अपांतरतमा, या नामाचा पुत्र उत्पन्न केला तो भूत, भव्य, भविष्य, यांस जाणणारा असून सत्यवादी झाला.त्या मुनीनें स्वायंभुव मन्वंतरींवेदांचा विभाग केला हें पाहून भगवान् संतोष पावले आणि त्यास वरप्रदान देतात कीं हे अपांतरतमऋषे, कलियुगाच्या आरंभीं तुझ्यापासून उत्पन्न होणारे कुरु या नामें भारतराजे पृथ्वीवर विख्यात होतील व त्यांच्या कुलांत भेद उत्पन्न होऊन ते परस्पर नाशपावतील हे ऋषे, तूं तपानें युक्त होऊन वेदांची व्याख्या करशील आणि तुला महेश्वर प्रसादानें रागशून्य असा परमात्मा पुत्र होईल व पुनः वसिष्ठ कुलांत पराशर या नामें ऋषी होईल त्या पासून पिवृकन्येचे गर्भीं तूं उत्पन्न होशील आणि तूं वेदव्यास असें नाम पावशील पुढें सहस्त्र युगे गेल्यावर चक्रधारण करणाऱ्या मला परमेश्वरास तूं पाहशील. असें बहुत प्रकारें भगवंतानीं मला सांगितलें त्या प्रमाणें हरीच्या आज्ञेनें मी अपांतरतमा नामक ऋषी झालों पुनः तोच मी वसिष्ठऋषीचे कुलांत वेदव्यास म्हणून विख्यात झालों.व्यास सांगतात हे शिष्यहो, हें मी आपले जन्माचें आख्यान तुम्हांस सांगितलें. वैशंपायन म्हणतात हे जन्मेजयराजा, आमचे गुरु व्यास त्यांचे पूर्व जन्माचें कथानक सांगितलें, आतां सांख्य ज्ञानाचा वक्ता कपिल महामुनी, योग जाणणारा हिरण्यगर्भ, वेदांचा आचार्य अपांतरतमा, पाशुपत ज्ञान कर्ता शंकर, सकल पांचरात्र विधीचा ज्ञाता भगवान् विष्णू स्वयमेव, या प्रकारानें ऋषीनीं सर्व जाणून हें विश्व नारायणात्मक आहे असें कथन केलें. अ. ३४९ प्र. आहे.

१७७. अध्याय एकशें सत्याहत्तर:- जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायनऋषे, पुरुष बहुत आहेत किंवा सर्वांस कारणभूत श्रेष्ठ एक पुरुष आहे हें सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, सांख्ययोग जाणणारे असें बोलतात कीं, बहुत पुरुषांस कारण एक पुरुष आहे ते व्हां एक पुरुषात्मक विश्व कसें या विषयीं मी आपले व्यासगुरूस नमस्कार करून सांगतों. पूर्वी वैजयंत पर्वतावर राहणाऱ्या ब्रम्हदेवास पाहून शंकर त्या स्थानीं गेले आणि त्याचे चरणावर मस्तक ठेवितांच ब्रह्मदेवानीं आपले सव्य हस्तानें शिवास उठविलें आणि ते त्यास बोलतात कीं, हे शंकरा, तूं चिरकालानें माझे दर्शनास आलास कुशल आहेसना? नंतर रुद्र बोलतात हे ब्रह्मदेवा, तुमच्या प्रसादें करून माझ्या तप व वेदाध्ययनाचें कुशल वर्तमान आहे; परंतु तुम्हांस विचारावयाचें आहे तें असें कीं तुम्हीं आपले ब्रम्ह लोकांचें स्थान सोडून एकाएकी या पर्वतावर येण्याचें कारण काय तें सांगा. असें ऐकून ब्रम्हदेव बोलतात हे शिवा, त्या पर्वतावर एकाग्रमनानें मी विराट पुरुषाचें चिंतन करीत आहें. असें ऐकून रुद्र बोलतात हे ब्रम्हदेवा, तूं बहुत पुरुष उत्पन्न केलेस त्या प्रमाणें अन्यही उत्पन्न करीत आहेत तेव्हां तूं एक पुरुषाचें चिंतन करीत आहेस. तो पुरुष कोणता हें सांगा. असें ऐकून ब्रम्हदेव बोलतात हे रुद्रा, बहुत पुरुषांस आधारभूत एक पुरुष आहे तो सर्वांस कारणभूत असल्यामुळें त्यास निर्गुणब्रह्म म्हणतात आणि निर्गुण पुरुष त्या ब्रम्हाचेठायीं प्रवेश करितात. अ. वि. या अ. आहे.

१७८. अध्याय एकशें अठ्याहत्तर:- ब्रम्हदेव सांगतात हे शंकरा, शाश्वत आणि कालत्रयीं नाशरहित पुरुष आहे तो तुला सांगतों. हे पुत्रा, त्या पुरुषास पाहण्याविषयीं तूं व मी अन्य कोणीही समर्थ नाहींत. केवल आपले भक्तजनांस ज्ञान दृष्टीनें तो पुरुष स्वयंप्रकाश दृश्य आहे आतां तो पुरुष कसा आहे याविषयीं विशेषणें देऊन सांगतात हे शंकरा. स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरीराहून भिन्न आहे, आकाशासारिखा लिप्त न होणारा, तुझ्या व माझ्या आणि अन्य सर्व जे आहेत

त्यांच्या अंतर्यामी साक्षिभूत, विश्वाचा मस्तक, विश्वभुज, विश्वाचे पाद व नेत्र, नासिका तोच, यथास्थानें छंदानें वागणारा, इत्यादि बहुत लक्षणें सांगून बोलतात हे रुद्रा, सगुण, निर्गुण, द्रष्टा, द्रष्टव्य, ज्ञाता, ज्ञेय, प्रधान, एकात्मा, परमात्मा, देव, मुनी, साधू आणि मी ब्रम्हदेव प्रजांचा ईश, तूं मजपासून झालेला, इत्यादि सर्व स्थावर जंगमात्मक विश्व व रहस्यासहित वेद, हे सर्व निर्गुण पुरुष परमात्मा नारायण आहे. हे पुत्रा, हें सर्व जग जें दिसतें ही त्याचीच क्रीडा आहे यास्तव मुमुक्षु पुरुषानीं भक्तीनें त्या वासुदेवास जाणावें म्हणजे ते जाणणारे पुरुष ज्ञानें करून भगवंतास पावतात. पुरुषांनीं या विषयीं संशय धरूं नये. अ. वि. या प्र. आहे.

१७९. अध्याय एकशें एकुणऐंशीं. – धर्मराज प्रश्न करितात हे भीष्मा, तुम्हीं मोक्षधर्माश्रित धर्म मला सांगितले, परंतु चार आश्रमामध्यें मोक्षहेतुभूत कोणता श्रेष्ठ धर्म आहे तो सांगा. असें ऐकून भीष्म सांगतात हे धर्मराजा, सर्व आश्रमांचे ठायीं शास्त्रोक्त जो धर्म सांगितला आहे तो स्वर्ग साधन असून सत्यफल व कांहीं एक बाधा न येतां तोच धर्म मोक्षाख्य फलास साधन भूत होतो; कारण धर्मांचीं यज्ञ, दान व तप इत्यादि द्वारें बहुत आहेत यास्तव पुरुषानीं केलेला धर्म विफल होणार नाहीं हे राजा, सर्व आश्रमांत स्वर्ग आणि मोक्ष हे आहेतच, त्या पुरुषाला ज्याची रुची आहे त्यानें तो करून कृत्य होतो दुसऱ्या धर्मास श्रेष्ठ मानीत नाहीं याविषयीं पूर्वी इंद्राचा आणि नारदाचा संवाद झाला तो सांगतो. कोणीएके वेळीं त्रैलोक्यांत मान्य असून वायू सारिखी अकुंठित ज्याची गती असा नारद इंद्रलोकीं गेला त्यास पाहून इंद्रानें आसनावर बसविलें आणि त्याचा सत्कार करून इंद्र बोलतो हे नारदऋषे, तूं सिद्धा सारिखा त्रैलोक्यांत साक्षिभूत संचार करितोस तेव्हां तुला लोकांत जें कांहीं होतें तें ठाऊक आहे यास्तव तूं अनुभवानें श्रुत किंवा दृष्ट असेल तें मला सांग. असें ऐकून हे धर्मराजा, नारदानीं इंद्रास जी कथा सांगितली ती तुला सांगतों. असा विषय या अध्यायांत आहे.

१८०. अध्याय एकशें ऐंशीं. – भीष्म सांगतात हे धर्मराजा, गंगेच्या

दक्षिण तीरीं महापद्म यानांवें नगर होतें त्यांत राहणारा कोणी एक ब्राह्मण होता तो वेदार्थ जाणणारा, धर्मपरायण, जितक्रोध, नित्यतृप्त, जितेंद्रिय, सज्जनांनीं मान्य केलेला, तप व वेदाध्ययन करणारा, न्यायानें जें द्रव्य मिळेल त्याणें निर्वाह करणारा, पुत्र संततीनें युक्त, वेदोक्त व शास्त्रोक्त या दोन्ही धर्मांचें सेवन करणारा, इत्यादि लक्षणांनीं युक्त असतां तो ब्राम्हण मनांत बोलतो कीं, मी कोणतें कर्म केल्यानें माझें कल्याण होईल किंवा याहून दुसरें श्रेष्ठ कर्म कोणतें करावें याविषयीं तो ब्राम्हण संशयांत पडून कांहीं निश्चय होईना इतक्यांत कोणी एक ब्राम्हण अतिथी त्याच्या गृहीं प्राप्त झाला. त्यास पाहून त्यानें त्या अतिथी ब्राम्हणाची सत्कार पूर्वक पूजा केली आणि त्यास आसनावर बसवून तो विश्रांत पावल्यावर त्यास प्रश्न केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८१. अध्याय एकशें एक्याऐंशीं:— ब्राम्हण म्हणतो हे अतिथी ब्राम्हणा, तुझ्या वाणीच्या माधुर्यानें मीं बंधन पावलों आणि तूं माझ्या मित्रपणास पावला आहेस यास्तव तुला विचारतों हे अतिथी, गृहस्थधर्मीं मी आजपावेतों राहून पुत्रादिकांनीं युक्त झालों; परंतु आतां असें वाटतें कीं, व्यर्थ या संसारांत आयुष्य घालवून कांहींच उपयोग नाहीं यासाठीं परमात्म्याचा आश्रय करावा; परंतु आत्मज्ञानावांचून परमात्मप्राप्त होणार नाहीं तेव्हां सन्यासाश्रम घ्यावा अशी मी इच्छा करितों. कारण विषय रूपाच्या पाशांनीं मी फार बद्ध झालों तेव्हां विषयाची इच्छा मी करीत नाहीं यास्तव आतां जों कालपर्यंत आयुष्य आहे त्या कालांत परलोकाचें साधन करावें अशी मी इच्छा करितों. कारण त्या मज्जांवर यमधर्माची रोगादि रूप पसरलेली दंडा सारिखी पताका पाहून माझें मन भोगा विषयीं परम निष्ठुर व वासना शून्य झालें आहे यास्तव ज्या धर्मानें मी मोक्ष रूपास पावेन तो धर्म तुम्हीं मला सांगा. असें त्याचें परमार्थयुक्त भाषण ऐकून तो अतिथी त्यास बोलतो हे ब्राम्हणा, जशी तुझी अवस्था झाली तशीच माझी अवस्था परमार्थ जाणण्या विषयीं प्रा-

सी आहे या साठीं मी पुष्कळ ऐकिलें परंतु निश्चय करवेना कारण कोणी मोक्षाची प्रशंसा करितात, कोणी यज्ञ फळाची कोणी ब्राम्हण वानप्रस्थाश्रमाची, कोणी गृहस्थाश्रमाची, तसेंच राजधर्माची, गुरुधर्म, वाणीचें नियमन, माता व पिता यांची सेवा, कोणी अहिंसा यांची प्रशंसा करितात, कोणी युध्दांत मरावें आणि स्वर्गी जावें अशी इच्छा करितात. या प्रकारें बहुत सांगून अतिथी बोलतो हे ब्राम्हणा, अशीं धर्माचीं द्वारें बहुत आहेत तेव्हां कोणतें करावें या विषयीं माझी ही बुद्धि भ्रम युक्त झाली आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१८२. अध्याय एकशें ब्याऐंशीं :- अतिथी बोलतो हे ब्राम्हणा, या विषयीं तुला उपदेश करितो. नैमिषारण्यांत गोमती नदीच्या तीरीं नागाव्हय म्हणून नगर आहे पूर्वी त्या स्थानीं समग्र देवांनी यज्ञादिकर्मे केलें व मांधाता राजाचें इंद्रानें रक्षण केलें त्या स्थानींच वसु भवा पद्मनाभ या नामाचा महा नाग प्रसिध्द आहे तो वाणी, मन व कर्म यानीं सर्व भूतांवर प्रसाद करितो आणि कर्म, उपासना व ज्ञान या तीन कांडत्रयात्मक शास्त्र आहे तें जाणणारा असून साम, भेद, दान, दंड, त्या चार उपायानीं प्रजांचें रक्षण करितो यास्तव त्याचे जवळ तूं जाऊन प्रश्न केला असतां तुला तो उत्तम सांगेल. कारण तो नाग बुद्धिशास्त्रांत निपुण, समस्त उत्तम गुणानीं युक्त, स्वभावानें निर्मळ, नित्य क्रमानें अध्ययन करणारा, तप व दम इत्यादिकानीं युक्त, यज्ञ करणारा, दान करणाऱ्यांत श्रेष्ठ, क्षमाशील, उत्तम वर्तणुकीनें राहणारा, सत्य भाषण करणारा. दुसऱ्याच्या गुणावर दोष न ठेवणारा, चांगल्या स्वभावानें युक्त, इंद्रियांचें नियमन करणारा, शेष अन्नाचें भोजन करणारा. आर्जवी, करावें कोणतें व न करावें कोणतें हें जाणणारा, सर्वां भूतां वैरशून्य, सर्व भूतांचें हित करणारा, इत्यादि गुणानीं युक्त आहे यास्तव त्याचें दर्शनास तूं जावेंस. असा विषय या अध्यायांत आहे.

१८३. अध्याय एकशें त्र्याऐंशीं :- ब्राम्हण बोलतो हे अतिथी, दुसऱ्याचा भार उतरून त्यास आश्वासन देण्याचें भाषण तुझें ऐकून मला

संतोष झाला कारण मार्गी श्रम पावलेल्या पुरुषास शयन मिळणें, तृषेनें व्याकुलितास उदक, क्षुधेनें पीडितास भोजन, वृध्द पुरुषास पुत्र झाल्याचा आनंद, मनानें चिंतीत कार्याचा लाभ होणें, इत्यादि लक्षणानीं युक्त तुमचें भाषण ऐकून मला ज्ञानाचा उपदेश झाला असें वाटलें आहे यास्तव तुम्हीं सांगितल्या प्रमाणें करितों. आतां ही रात्र तूं येथें घालवावीस नंतर हे अतिथी ब्राम्हणा, प्रातःकालीं सूर्योदय झाल्यावर मग आपण जावें. भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्या ब्राम्हणानें आतिथ्य केलेला तो अतिथी त्याच्या गृहीं एकरात्र राहून दोघे त्या रात्रींत मोक्ष धर्मी युक्त भाषणें बोलत असतां ती रात्र निघून गेली नंतर प्रातः कालीं त्या ब्राम्हणानें पूजन केलेला तो अतिथी प्रातःकालीं निघून गेल्यावर त्या ब्राम्हणानें निश्चय करून आपले स्वकीयजनांस विचारिलें आणि त्या अतिथीनें सांगितल्या प्रमाणें तो त्या भुजगेंद्राच्या आश्रमीं जाण्यास आपले गृहांतून निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८४. अध्याय एकशें चवऱ्याऐंशीं. - भीष्म सांगतात हे धर्मराजा, तो ब्राम्हण नानाप्रकारचीं वनें व तीर्थें तशींच सरोवरें पाहात पाहात क्रमानें त्या नागाव्हय नगराचा शोध करीत चालला असतां मार्गी कोणी एक मुनीची गांठ पडली. नंतर तो ब्राम्हण त्या मुनीस विचारतो कीं हे मुने, नागाव्हय नगर कोठें आहे तें सांगा. असें ऐकून त्या मुनीनें यथोद्देशें करून त्या ब्राम्हणास सांगितलें. त्या प्रमाणें तो ब्राम्हण विचारीत विचारीत यथा न्यायानें नागाव्हयनगरीं येऊन त्या नागाचे गृहीं आला आणि त्यानें हे नागेंद्रा म्हणून मोठ्यानें हाक मारिली तेव्हां त्याचें वचन ऐकून त्या नागाची स्त्री पतिव्रता बाहेर आली आणि त्या ब्राम्हणास पाहून तिनें त्यास आसनावर बसविलें नंतर त्या ब्राम्हणाची पूजा केली आणि स्वागत करून कोणते कारणानें आपलें येणें झालें तें सांगा म्हणून ती नागस्त्री ब्राम्हणास बोलली. तें ऐकून ब्राम्हण बोलतो हे नागपत्नी, तूं माझा सत्कार फार चांगला केलास त्या योगानें माझा श्रम परिहार झाला आतां नागास पाहावें म्हणोन मी येथें आलों आहें. असें ऐकून ती नागपत्नी बोलत्ये कीं हे ब्राम्हणा,

आर्य नामक माझा पती सूर्याचा रथ वोढावया करितां एक मास पर्यंत गेला आहे परंतु तो आजपासून सात किंवा आठवे दिवशीं येऊन तुला दर्शन देईल. असें ऐकून ब्राम्हण बोलतो हे पतिव्रते, फार उत्तम आहे मी त्या गोमतीनदीच्याकांठीं वाळवंटांत तो नाग येईल तों पावेतों रहातों असें बोलून तो ब्राम्हण त्या वाळवंटांत येऊन राहिला. असा वि· या अ· आहे.

१८५. अध्याय एकशें पंचाऐंशीं:– भीष्म सांगतात हे धर्मराजा, त्यानंतर तो ब्राम्हण निराहार करून त्या वाळवंटीं वास करीत असतां त्या नागाचे बांधव, पुत्र व भार्या हे सर्व त्या जपकरणाऱ्या ब्राम्हणा जवळ येऊन त्यानीं त्याचा सत्कार केला. आणि ती बोलतात हे ब्राम्हणा, तुला त्या वाळवंटींत राहून आज साहवा दिवस प्राप्त झाला तूं कांहीं भाषण करीत नाहींस व आहारही करीत नाहींस तेव्हां आमच्या निमित्त तुझें आगमन झालें असून आम्ही सकुटुंब तुमचें आतिथ्य करण्या करितां आलों आहों तर आतां मूल, फल, पर्ण, पय, किंवा अन्न, त्यांतील कोणतें भक्षण करण्याचें असेल तें घेऊन आहार करावा कारण तूं उपवासी असल्यामुळें बालवृद्ध यांसहित आम्ही धर्माच्या दोषास्तव पीडित झालों आहों. असें ऐकून तो ब्राम्हण बोलतो हे नागहो, तुमच्या नागापासून उपदेश मिळावा या हेतूनें मी आहार केला नाहीं तेव्हां आणखी दोनदिवसांनीं तो नाग येईल. जर आठवेरात्रींत तो न आला तर मी आहार करीन त्याच्या निमित्त हें व्रत मी धारण केलें आहे यास्तव तुम्ही संताप न करितां जसे आलांत तसेच जावें त्याच्या निमित्त माझ्या हेतूचा भंग करूं नका. या प्रकारानें त्या ब्राम्हणाचें भाषण ऐकून ते भुजंग आपापले गृहीं निघोन गेले. अ· वि· या अ· आहे.

१८६. अध्याय एकशें शाऐंशीं.– भीष्म सांगतात हे धर्मराजा, नंतर एकमास पूर्ण झाल्यावर सूर्यानें आज्ञा दिलेला तो भुजंग आपले गृहीं आला त्यास पाहून त्याच्या स्त्रियेनें पादशौच इत्यादि गुणें करून आपले पतीची सेवा केली नंतर नाग आपले साध्वीस प्रश्न करितो हे कल्याणी, तुला मी पूर्वी विधी सांगितला होता त्या प्रमाणें तूं देवता व अतिथी यांचें पू-

जन करीत होतीसना ? व माझ्या वियोगानें तुला कांहीं दुःख झालें नाहींना ! या प्रकारचें पतीचें भाषण ऐकून ती नागभार्या बोलत्ये हे नागेंद्रा, शिष्यानीं गुरुसेवा करावी, विप्रानीं वेद धारण करावे, सेवकानीं स्वामी वचन ऐकावें, राजानें प्रजा पालन करावें, क्षत्रियानीं सर्वभूतांचें रक्षण करावें, वैश्यानीं अतिथींस यज्ञ सामग्री विषयीं धन द्यावें, विप्र, क्षत्रिय व वैश्य यांची शूद्रानें सेवा करावी इत्यादि प्रकारचा हा गृहस्थधर्म तसेंच मी कोणाचा व कोठून आलों, कोण मी आणि माझे कोण आहेत या विषयीचें प्रयोजन नित्यपाहून गृहस्थाश्रम्यानें मोक्षाश्रमीं राहावें. आतां पतिव्रतापणा हा भार्येचा धर्म आहे यास्तव तुमच्याच उपदेशानें मी धर्मजाणणारी असून सन्मार्गाचें उल्लंघन व कुमार्गाचें सेवन कसें करीन ? आतां आज आठ दिवस झाले कोणी एक ब्राम्हण तुमचें दर्शन घेण्या करितां येऊन गोमती नदीच्या वाळवंटांत उपवासव्रत धारण करून बसला आहे, यास्तव तुम्हीं त्या ब्राम्हणास दर्शन द्यावें. असा विषय या अध्यायांत आहे.

१८७. अध्याय एकशें सत्याऐंशीं :– नाग बोलतो हे स्त्रिये, ब्राम्हण रूपानें जो आला आहे हा केवळ मानुष आहे किंवा विप्र व देव आहे हें सांग. कारण कोण मानुष मला पाहण्याविषयीं समर्थ होईल ! हे स्त्रिये, सुरासुर आणि देव ऋषी यांत आम्हीं नाग थोर असून वर देणारे आहोंत व वंदन करण्याविषयीं योग्य असे असतां विशेषें करून मनुष्यांच्या दृष्टी पडण्यास आम्हीं योग्य नाहीं असें मला वाटतें. असें ऐकून नागभार्या बोलत्ये हे पती, हा ब्राम्हण भक्तिमान् आणि आर्जवानें युक्त असा आहे, देव नव्हे तर उदकाची इच्छा करणारा जसा चातकपक्षी असतो तसा हा कांहीं कार्याची इच्छा करणारा आहे यास्तव तुम्हीं यास दर्शन द्यावें कारण कोणत्याही पुरुषाच्या आशेचा च्छेद केला तर त्यास भ्रूणहत्येचा दोष प्राप्त होतो असें धर्मशास्त्र जाणणारे पुरुष बोलतात तेव्हां मौन धारण केल्यानें ज्ञानाची प्राप्ती, दान केल्यानें यशःप्राप्ती, भूमीदान केल्यानें उत्तमगती. इत्यादिक स्व-

णाऱ्या पुरुषास उभयलोकीं जसें सुख होतें तसें ब्राम्हणाचे मनोरथ पूर्ण केले असतां सुख आहे, या प्रकारचें तिचें भाषण ऐकून नाग बोलतो हे स्त्रिये, मला अभिमान नाहीं परंतु आमच्या जातीचा रोष मोठा आहे; परंतु संकल्पापासून झालेल्या क्रोधाचें तूं निवारण केलेंस. हे साध्वि, पाहा. रावण क्रोधाच्या वश या स्मरणानें दाशरथी रामानीं त्यास रणीं मारिलें तसाच सहस्रार्जुन यास रोष झाल्यामुळें पुत्रासहित त्यास जामदग्न्य परशुरामानीं मारिलें तेव्हां पुरुषांचा घात करणारा हा क्रोध खरा आहे. यास्तव तुझ्या वचनें करून माझा क्रोध गेला आतां मी त्या ब्राम्हणाजवळ जातों म्हणजे तो कृतार्थ होऊन जाईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१९८. अध्याय एकशें अठ्याऐंशीं.— भीष्म सांगतात हे धर्मराजा, तो नागांचा पति नाग ज्या स्थानीं ब्राम्हण होता त्या स्थानीं येऊन त्यास बोलतो हे ब्राम्हणा, तुजवर मी रोष करीत नाहीं क्षमा करून तुला विचारतों. तूं त्या स्थानीं काय प्रयोजन योजून आला आहेस हें सांग. असें ऐकून ब्राम्हण बोलतो हे नागश्रेष्ठा, माझें नाम धर्मारण्य आहे मी त्या नागाह्वयनगरीं पद्मनाभ या नावें करून नाग राहातो त्याचें दर्शन घ्यावें या हेतूनें आलों आहें यास्तव जसा शेतकी करणारा पर्जन्याची प्रतीक्षा करितो तसा मी त्या नागाची प्रतीक्षा करीत आहें कारण त्याची गांठ पडल्यानें माझ्या क्लेशाचें निवारण होऊन श्रेष्ठ लाभ होईल या साठीं आलों आहें. असें ऐकून नाग बोलतो हे ब्राम्हणा, तुम्ही कल्याण वृत्ती असून तूं सज्जनांवर दया करणारा साधू आहेस आतां ज्या नागाच्या दर्शनाविषयीं तूं आला आहेस तो नाग मीच आहें. मी ही गृहीं आल्यावर स्वकीय जनापासून तुम्हीं येथें आल्याची वार्ता ऐकून तुम्हाजवळ आलों आहें. यास्तव तुमचें कार्य जें असेल तें सांग. असें ऐकून ब्राम्हण बोलतो हे भुजगा, तुझ्या दर्शनाविषयीं आलों याचें कारण असें कीं त्या जीवाचें विश्रांतिस्थान श्रेष्ठ आहे तेव्हां त्याचा शोध करीत असतां तुमची उपासना केली म्हणजे तुमचे पासून मला आत्मज्ञान प्राप्त होईल असें पूर्वी दुसऱ्यापासून ऐकून आलों आहे तर त्या प्रश्नाचें उत्तर सांगून माझा संशय

दूर करावा. असा विषय या अध्यायांत आहे.

१८९. अध्याय एकशें एकुणणवद.— ब्राम्हण बोलतो हे नागश्रेष्ठा, तूं सूर्याचा एक चक्र रथ वोढावयास जातोस तेव्हां तेथें कांहीं आश्चर्य झालेलें जर तूं पाहिलें असशील तर तें मला सांग. असें ऐकून नाग बोलतो हे ब्राम्हणा, अनेक प्रकारच्या आश्चर्यांची प्रतिष्ठा भगवान्‌सूर्य आहे कारण सूर्यापासून त्या सर्व भूतांची प्रवृत्ति होत्ये, तसेच, जसे वृक्षाच्या शाखांवर पक्षी आश्रय करून वास करितात तसे देवांसहीत सिद्ध झालेले मुनी ज्या सूर्याच्या सहस्र किरणाचा आश्रय करून वास करितात. आतां ज्या सूर्यापासून निघालेला वायू त्याच्या किरणांच्या आश्रयानें आकाशीं गमन करितो याहून आश्चर्य दुसरें काय सांगावें, प्रजांचा हिता साठीं जो सूर्य नारायण उदकाची वृष्टी करितो, ज्याच्या मंडलाच्या मध्यभागीं राहणारा ईश्वर असून तो सर्व लोकास पाहात आहे, जो सूर्य आपले किरणानीं आठ महिन्यांत ग्रहण केलेलें उदक वर्षाकालीं सोडतो, ज्या सूर्यापासून औषध उत्पन्न होतें व ज्याच्या सत्तेनें ही पृथ्वी स्थावर जंगमात्मक विश्व धारण करित्ये. हे ब्राम्हणा, ज्या सूर्याचे ठायीं पुरुषोत्तम देव राहातो, याहून आश्चर्य दुसरें काय सांगावें. या प्रकारें तो नाग आश्चर्यें त्यास सांगून बोलतो हे विप्रा. सर्व आश्चर्यांत एक मोठें आश्चर्य मी पाहिलें तें तुला सांगतों. पूर्वी स्वच्छ निर्मळ आकाश झालें तेव्हां मध्यान्ह समयीं सूर्य प्रकाशीत असतां प्रतिसूर्यासारिखा तेजस्वी असा पुरुष मी पाहिला आणि तो पुरुष आपले तेजानें सर्व लोकांस प्रकाश करणारा असून आकाशीं सूर्याभिमुख आला त्या कालीं द्वितीय सूर्यासारिखा देदीप्यमान दिसूं लागला. तो आपले जवळ आला हें पाहून सूर्यानें आपले हस्त त्याचे पुढें केले त्यावेळीं त्या पुरुषानेंही आपला दक्षिण हस्त त्या सूर्याच्या हस्तांत घातला त्याकालींच आकाश भेदून तो पुरुष सूर्य मंडलांत प्रविष्ट झाला. त्या समयीं क्षणांत दोन्ही तेजें एकरूप झालीं हे ब्राम्हणा, या प्रमाणें तो पुरुष आदित्य रूपास पावतांच त्याविषयीं संशय आम्हांस झाला. नंतर आम्हीं सूर्यास विचारिलें कीं, अहो सूर्यनारायणा, कोण हा पुरुष

आकाशीं येऊन द्वितीय सूर्यो सारिख्या तेजानें आपले मंडलांत प्रविष्ट झाला हें सांगा. असा विषय या अध्यायांत आहे.

१९०. अध्याय एकशेंनव्वद.— सूर्य सांगतात हे भुजंगहो, तुम्ही पाह्या सारिख्या तेजानें युक्त जो पुरुष पाहिला तो देव. ऋषि. असुर, सर्प, इत्यादिकांतील कोणी नव्हे तर हा मुनी उंछ वृत्ति म्हणून व्रत आहे त्यानें सिद्ध होऊन तो स्वर्गास पावला. कारण त्या मुनीनें मूलें. फलें. गळलेलीं पर्णे. उदक. वायू. यांचें भक्षण करून तप केलें व शंकराची आराधना करून स्तुति केली आणि तो ब्राम्हण संगती शून्य. वासनारहित. नित्य पडलेल्या कणांचें भक्षण करणारा. सर्व भूतांचे हिता विषयीं तत्पर असणारा. इत्यादिकारणानीं तो विप्र स्वर्गी पावला. हे भुजंगहो. अशा रीतीनें उत्तम गतीस पावणाऱ्या पुरुषांस देव व गंधर्व इत्यादिकांचें कांहीं एक चालत नाहीं. नाग बोलतो हे ब्राम्हणा. त्या प्रकारचें आश्चर्य मी पाहिलें. तेव्हां तो मानुषविप्र असून सिद्धीस पावला आणि सूर्यासहित फिरत आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१९१. अध्याय एकशें एक्याण्णव.— ब्राम्हण बोलतो हे भुजंगा, निःसंशय आश्चर्य खरें आहे. तुम्हीं भाषणें ऐकून मी संतुष्ट झालों. कारण तुझ्या वाक्यानीं मला मोक्ष मार्ग दाखविला या कारणानें तुझें कल्याण असो. वारंवार तुझें स्मरण मला होईल आतां मी जातों. असें ऐकून नाग बोलतो हे ब्राम्हणा, ज्या कार्याकरितां तूं आलास तें कार्य मनांत ठेवून जातोस हें योग्य नव्हे. कारण तूं प्रश्न करावास आणि त्या प्रश्नाचें उत्तर मीद्यावें म्हणजे तुझें येण्याचें सार्थक होईल या करितां तूं कार्य मला सांग. नंतर माझी आज्ञा घेऊन जा हे विप्रा, मी तुझे ठायीं भक्तिमान् आहें ते. व्हां मी विप्र असतां तुला चिंता कोणतीही नाहीं यास्तव सांग. असें ऐकून ब्राम्हण बोलतो हे भुजंगा, तुझ्याहून देव अधिक नाहींत जो सूर्यप्रुषीं परमात्मा आहे तोच तूं. तोच मी जो मी. तोच तूं, मी व तूं आणि हीं भूतें प्रलय कालीं जेथें लय पावतात तेंच ब्रम्ह आहे असें मी जाणलें तेव्हां माझें कार्य राहिलें नाहीं यी उंछव्रताचें आचरण करून कृतार्थ हो-

र्टन. हे भुजंगा, आतां मी जातों. असा विषय या अध्यायांत आहे.

१९२. अध्याय एकशें ब्याण्णव.– भीष्म सांगतात हे धर्मराजा, तो ब्राम्हण त्या नागश्रेष्ठास विचारून निघाला तो उंछ व्रताची दीक्षा घ्यावी म्हणून च्यवन भार्गवाच्या आश्रमी आला, नंतर च्यवन भार्गवानीं त्याब्राम्हणास त्या धर्माचा संस्कार पूर्वक अधिकार दिला मग त्या ब्राम्हणानें त्या उंछव्रतास आरंभ केला या प्रमाणें ही कथा जनक राजाच्या गृहीं भार्गवानें नारद ऋषीस सांगितली. नंतर नारदानीं इंद्र भुवनीं जाऊन इंद्रास सांगितली, इंद्रानें समस्त श्रेष्ठ ब्राम्हणांस सांगितली, ती कथा ज्या काळीं परशुरामाशीं माझें युध्द झालें त्यावेळीं अष्टवसूनींही कथा मला सांगितली, तीही पुण्यकारक कथा तूं प्रश्न केलास या कारणानें तुलासांगितली. हे धर्मराजा, जितेंद्रिय पुरुषानें स्वकर्म निष्काम बुद्धीनें करावें म्हण जे तोच त्याचा धर्म होतो. आतां निश्चय केलेला तो द्विज भुजंगपतीनें दाखविलेलें आत्म कृत्य जाणून अहिंसादि यम व शौचादि नि. मयांचें सेवन करणारा असा तो वनामध्यें गेला आणि तेथें कणसादिकांचें भक्षण करून नागानें जी उंछवृत्ती ब्राम्हणास गती झालेली सांगितली त्या गतीस हा ब्राम्हण पावला. असा विषय या अध्यायांत आहे.

